# दुटप्पी कीं दुहेरी



लेखक :
कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,
बी.ए., एलएल.बी.

---

प्रकाशक :
नवयुग प्रकाशन, पुणें २

आवृत्ति दुसरी ] १९४१ [ मूल्य दीड रुपया

# दुटप्पी कीं दुहेरी

## प्रकरण १ लें

नाशिक येथील ‘ प्रकाश ’ या प्रसिद्ध साप्ताहिकाच्या एका अंकांत ‘ गृह्य संस्कार ’ या सदराखालीं खालील मजकूर प्रसिद्ध झाला:—

“ या साप्ताहिकाचे संपादक श्री. हरिहर विद्याधर जोशी यांच्या पत्नी सौ० सुभद्राबाई या ता.,...... रोजीं आपल्या पतीस व पांच वर्षांच्या अजाण बालकास विरहांत लोटून स्वर्गवासी झाल्या. ”

यानंतर दोन आठवड्यांनीं त्याच साप्ताहिकाच्या अंकांत ‘ पाहिजे ’ या सदराखालीं खालील जाहिरात प्रसिद्ध झाली:—

“ एका अल्पवयी व मातृविहीन बालकाचें संगोपन करण्यास व त्यास शिक्षण देण्यास एक सुविद्य, सुशील व सुस्वभावी बाई पाहिजे. पगार दरमहा पन्नास रुपये मिळेल. शिवाय रहावयास जागा व अन्न-वस्त्रही मिळेल. पत्रव्यवहार ‘प्रकाशा’ च्या संपादकाच्या नांवें करावा.”

बाई खुद्द संपादकाच्याच मुलाकरितां पाहिजे होती हें सदरहू दोन मजकूर वाचणाराच्या सहज लक्षांत येण्यासारखें होतें.

लवकरच संपादकांकडे गरजू बायांचीं पत्रें येण्यास सुरवात झाली. कित्येकींनीं आपल्या पत्रांत स्वतःच्या विद्येची व शीलाची भरपूर प्रशंसा केली असून सोबत शिफारसपत्रेंही पाठविलीं होतीं, पण पगाराच्या कमीपणाबद्दल असमाधान व्यक्त केलें होतें. कित्येक विद्याशीलसंपन्न स्त्रियांची पगाराबद्दल जरी कुरकुर नव्हती तरी त्यांनीं दिवसांतून तीन वेळां चहा मिळाला पाहिजे, वाटेल तितक्या वेळां नाटकांस जाण्याची मोकळीक पाहिजे, उंची लुगडीं नेसावयास मिळालीं पाहिजेत अशा अनेक अटी घातल्या होत्या. कांहींजणींचें अक्षर सुंदर व वाक्यरचना निर्दोष असून स्वभाव मात्र तेढा असावा असें त्यांच्या पत्रांवरून अनु-

शिष्यासमोर कित्त्यादाखल मांडलीं जाण्याचा संभव नव्हता, आणि शब्दांचीं रूपें व वाक्यरचना इतकी अशुद्ध होती कीं, त्यांचीं पत्रें त्या-समोर अशुद्धें सुधारण्याकरितांच ठेवणें शक्य होतें. तथापि वळणदार अक्षरांतील व नमुनेदार भाषेंतील त्यांचीं उणीव त्यांच्या कुरेंबाज चेह-ऱ्यांनीं व झोंकदार नेपथ्यनैपुण्यानें बरीच भरून निघेल असा त्यांनीं पाठविलेल्या फोटोंवरून अजमास होत होता. अल्पवयी बालकाबरोबर त्याच्या पित्याचेंही संगोपन आपणाकडेच यावयाचें आहे असा त्या स्त्रियांनीं कयास बांधिला होता कीं काय न कळे ! असो.

लवकरच हरिहररावांजवळ असे पुष्कळ फोटो जमले. त्यांतील बऱ्याच स्त्रियांचें चेहरे चित्ताकर्षक होते. पण एका चेहऱ्यावर गर्विष्ठपणा तर दुसऱ्यावर दैन्य, एकावर हेकेखोरपणा तर दुसऱ्यावर चंचलपणा, एकावर अेरावीपणा तर दुसऱ्यावर परावलंबन. एकावर निष्ठुरपणा तर दुसऱ्यावर भेंकडपणा, एकावर मायावीपणा तर दुसऱ्यावर खुळचट-पणा, एकावर स्वार्थबुद्धि तर दुसऱ्यावर अदूरदर्शित्व, एकावर फाजील चौकसबुद्धि तर दुसऱ्यावर पाषाणतुल्य निर्विकारता, याप्रमाणें कोण-ताना कोणता तरी दोष दिसून येई. फोटो काढतेवेळीं धारण केलेलें हास्य प्रत्येक चेहऱ्यावर झळकत होतें पण ज्याप्रमाणें चलचित्रपटाच्या एकाच प्रकाशित भागावर अनेक भिन्न प्रकृतींच्या व्यक्ति व्यक्त होऊं शकतात त्याप्रमाणें एकच हास्य निरनिराळया फोटोंत अहंकार, खुनशीपणा, कपट, तामसी महत्त्वाकांक्षा इत्यादि भिन्न भिन्न दुर्गुणांचें द्वार बनलें होतें. कांहीं चेहरे तर कोल्ह्याचा धूर्तपणा, सापाचा खुनशी-पणा, लांडग्याचा क्रूरपणा, गिधाडाचा अधाशीपणा इत्यादि अनेक पाशव दुर्गुणांचे पिंजरेच वाटत. अशा स्त्रियांच्या स्वाधीन आपला आवडता बाबू करण्यापेक्षां तो आपल्या अडाणी नोकरांच्या संगतींत आहे तसाच पुढेंही राहिला तरी पुरवला असें हरिहररावांस वाटे. चेहऱ्याप्रमाणें अक्षराच्या वळणावरून स्वभाव ओळखण्याची कलाही त्यांच्या अंगीं अनेक वर्षांच्या अनुभवावरून आली होती, आणि त्यांजकडे आलेल्या पत्रांच्या अक्षरांवरून कोणती स्त्री मोकळया स्वभा-वाची व कोणती कपटी, कोणती व्यवस्थित व कोणती अव्यवस्थित,

कोणती उदार व कोणती कंजुष, कोणती डौली व कोणती साधी हें त्यांनीं ताबडतोब पारखून ठेविलें. आपल्या प्रिय अपत्याची जबाबदारी निर्धास्तपणें सोंपविण्यासारखी एकही स्त्री त्यांस दिसून येईना.

बिचाऱ्या बाबूस मातृवियोगानें झालेल्या आपल्या हानीची फारशी जाणीव नव्हती. तो दिवसभर आपल्या खेळांतच निमग्न असे. रात्र झाली म्हणजे मात्र त्यास चुकल्याचुकल्यासारखे होऊन तो रडूं लागे, व त्याची कितीहि समजूत घातली तरी त्याचें रडें थांबत नसे. एके दिवशीं संध्याकाळीं हरिहरराव आपलें संपादकीय काम आटोपून व बाबूस जवळ घेऊन त्याच्या विवंचनेंत बसले असतां पोस्टाच्या शिपायानें त्यांच्या नांवाचीं पत्रें आणून दिली. त्यांतील एकावरील पत्त्याचें अक्षर अगदीं अपरिचित होतें. हें पत्र जाहिरातीनंतर लौकरच आलें असतें तर तें त्यांनीं प्रथमच फोडलें असतें. पण हा वेळपर्यंत अपरिचित अक्षरांच्या इतक्या पत्रांनीं त्यांचीं निराशा केली होती कीं, तशा पत्रांचा त्यांना कांहींसा वीटच आला होता. त्यांनीं तें पत्र कांहींसें अनादरानेंच बाजूस सारिलें व बाकीचीं पत्रें वाचावयास पुढें ओढिलीं. त्यांपैकीं कांहींत लेखांचा स्वीकार करण्याबद्दल विनंति, कांहींत लेखांचा स्वीकार केल्याबद्दल कृतज्ञताप्रदर्शन व इतरांत लेखांचा अव्हेर केल्याबद्दल शिव्याशाप होते पण भटास ज्याप्रमाणें बारशाचा आनंद व बाराव्याचें दुःख नसतें, जन्माची व मृत्यूची खबर पोंचविणाऱ्या टपालवाल्यास ज्याप्रमाणें तिचें सुखदुःख बाधा करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें आशाळभूत, कृतज्ञ व निराश लेखकांच्या याचना, आभार व शाप सरावलेल्या संपादकाचा चित्तक्षोभ करूं शकत नाहींत; व हरिहररावांइतका आपल्या कामांत वाकबगार संपादक त्या काळीं महाराष्ट्रांत एकादाच सांपडला असता. सर्व पत्रें वाचून झाल्यावर त्यांची दृष्टि त्यांच्या उपेक्षेस पात्र होऊन एकीकडे पडलेल्या त्या पत्राकडे वळली; व त्याचा विनाकारण अपमान केल्याबद्दल पश्चात्ताप वाटूनच कीं काय, त्यांनीं तें पत्र आदरानें वर उचललें व हलक्या हातानें फोडिलें. तें वाचीत असतां त्यांची मुद्रा कुतूहल, आश्चर्य, आनंद इत्यादि विकारांनीं वारंवार बदलत होती. पत्र संपतांच

तिजवर समाधान स्थिरावल्यासारखें दिसलें. पत्रांतील मजकूर याप्रमाणें होताः—

सा. न. वि. वि.

हें पत्र आपणांकडे जरा उशीरांच जात आहे. आपल्या चिरंजीवास संभाळण्याचें काम पत्करण्याचा विचारच उशिरानें सुचला, व तो आपणांपाशीं प्रकट करण्यापूर्वी वडिलांची अनुमति घ्यावी लागली; यामुळेंच या पत्रास इतका उशीर लागला. आपण आपल्या मुलाकरितां यापूर्वीच बाई ठेविली नसेल तरच हें पत्र वाचून पहावें. ठेविली असल्यास हें न वाचतां फाडून टाकावें.

आपल्या मुलाची सर्वतोपरी जोपासना करण्यास मी तयार आहे. त्यास बौद्धिक शिक्षण देण्याइतकें ज्ञान मीं संपादन केलें आहे त्यास धार्मिक व नैतिक शिक्षण देण्याची माझ्यांत पात्रता आहे कीं काय याचा निर्णय अनुभवाअंतींच होणार आहे. आपण देऊ केलेला पगार एका दृष्टीनें फारच मोठा तर दुसऱ्या दृष्टीनें अगदींच अपुरा आहे. माझ्या रहाणीच्या मानानें तो फार मोठा आहे, व मी जें शिक्षण देणार त्याचें मोल कोणत्याही रकमेपेक्षां मोठें असल्यामुळें तो पगार फारच कमी आहे. शिक्षणाचा योग्य मोबदला शिक्षणच होय. लेखन–कलेंत मला शिष्यीण मानून प्रवीण करण्याचें आपण कबूल करीत असाल तरच मी आपल्या मुलास शिक्षण देण्यास तयार आहें. अन्नवस्त्रासंबंधानें मी एक तडजोडीची अट सुचवितेंः—मीं स्वतःची वस्त्रें स्वतःच्या खर्चानें पुरवावींत व पाकसिद्धीसारख्या गृहकृत्यांत मदत करून आपल्या घरीं जेवावें. ही अट आपणांस मान्य होण्यास हरकत नाहीं. माझी आणखींही एक अट आहे, व ती फारच महत्त्वाची आहे. मी कोण, माझें पूर्वचरित्र कसें गेलें व भावी काळाबद्दल माझ्या आकांक्षा कोणत्या आहेत याबद्दल मुळींच चौकशी न करण्याचे आपण अभिवचन दिलें पाहिजे. 'प्रकाशा'च्या पुढील अंकांत आपली जाहिरात आली नाहीं तर आपणांस माझ्या अटी कबूल आहेत असें मी समजेन, व त्या अंकाच्या दुसऱ्याच

दिवशीं सकाळीं मुंबईकडून येणाऱ्या गाडीनें मी आपणांकडे येईन. कळावे हें विनंति.

लेखनकलेंत आपली शिष्यीण होऊं इच्छिणारी

**एक अज्ञात तरुणी**

पत्राचें अक्षर सुंदर व रेखीव असून त्यावरून लेखिकेचे टापटीप, स्वच्छता, साधेपणा हे गुण दिसत होते. मजकुरावरून आज्ञाधारकपणा, निःस्वार्थीपणा, मार्मिकता, भिडस्तपणा, उद्योगशीलता, गृहकार्यनिपुणता, चातुर्य, वक्तशीरपणा हे गुण उघड होत होते. पत्राचा कागद स्वदेशी वापरला होता, त्यावरून लेखिकेची स्वदेशभक्तिही जाज्वल्य असावी असें दिसत होतें. टीचभर पत्रांत आपल्या अंगचे बहुतेक गुण व्यक्त करणारी ही तरुणी ती अजून आपणास अज्ञात आहे असेंच समजत आहे का ? समजत असल्यास त्या गुणांच्या यादींत भोळसरपणा हाही एक गुण दाखल करावा लागेल.

पत्रासोबत लेखिकेच्या बाह्यांगाचा फोटो जरी नसला तरी पत्रांत उमटलेला अंतरंगाचा फोटो इतका चित्ताकर्षक होता कीं, हरिहररावांना पत्रासंबंधानें निर्णय करावयास मुळींच वेळ लागला नाहीं. 'प्रकाशा' च्या पुढील अंकांत जाहिरात आली नाहीं त्याच्या दुसऱ्या दिवशीं ते मुंबईकडून येणाऱ्या गाडीची उत्कंठेनें वाट पहात बसले. पत्राखालीं सही नसल्यामुळें त्यांना स्टेशनावर स्वतः जाऊन फायदा नव्हता, सबब ते घरींच राहिले होते. आज बाई येणार म्हणून बाबू आनंदानें उड्या मारीत होता. इतक्यांत दाराशीं एक टांगा उभा राहिला, व त्यांतून एक तरुणी उतरली. हरिहरराव घाईघाईनें पुढें होतात तोंच तिनें सामान खालीं उतरवून टांगेवाल्यास भाड्याचे पैसे देऊन रवाना केलें. हा प्रकार इतक्या अकल्पितपणें व शीघ्रतेनें झाला कीं, गड्यास हाक मारण्यास हरिहररावांस सवडच मिळाली नाहीं. पाहुणीनें वळकटी आंत आणण्यासाठीं हातीं घेतली तें पाहून त्यांनीं ती आपल्या हातांत देण्याबद्दल तिला खुणाविलें; पण ती स्वतःच आंत नेण्याचा तिचा निर्धार दिसतांच त्यांनीं तिची ट्रंक हातीं घेतली, व पुढें होऊन तिला माजघराची वाट दाखविली. टांगा दाराशीं

येऊन थडकल्याबरोबर बाबू लाजेनें आंत पळून गेला होता; परंतु लौकरच लाजेवर जिज्ञासेचा वरपगडा होऊन तो दबकत दबकत पाहुणीच्या समोर कांहीं अंतरावर येऊन उभा राहिला होता. हरिहरराव त्यांस पकडण्याचा निष्फळ प्रयत्न करीत म्हणाले, "हाच तुमचा शिष्य." पाहुणीनें वाक्य पुरें करीत म्हटलें, "आणि माझा धाकटा भाऊही. होय ना, बाळ ? ये पाहूं इकडे!"

लहान मुलेंही आपल्यापरीं मानी असतात. त्यांना बोलाविल्याखेरीज तीं सहसा परक्यापाशीं जावयाचीं नाहींत. पण एकदां कां त्यांना नांवाला निमत्रण दिलें म्हणजे तीं फारसें ओढून चंद्रबळ आणीत नाहींत. आई देवबाप्पाच्या घरीं गेल्यापासून बाबूच्या कानांवर प्रेमळ व मजुळ शब्द पडला नव्हता. तो पडतांच त्यानें शिष्टाचाराची पर्वा न करतां धांवत धांवत पाहुणीबाईजवळ जाऊन तिच्या गळयास मिठी मारिली, व ज्या सुंदर मुखांतून ते मंजुळ शब्द पडले होते त्याकडे तो वारंवार निरखून पाहूं लागला.

खरोखर पाहुणीचा चेहरा तिच्या स्वराइतकाच व तिचा स्वर तिच्या चेहऱ्याइतकाच मोहक होता. चेहऱ्यावर निकोप प्रकृतीचें तेज व अकृतिम हास्य खेळत होतें. त्यावरून तिचें निष्कलंक पूर्वचरित्र अनुमीत होत होतें. हिंदु मुलीच्या ललाटावरील रेषेवरून तिच्या वैवाहिक भाग्याची अटकळ करावयास भविष्यवादीच लागतो असें नाहीं. पाहुणीच्या भव्य भालाकाशांत कुंकुमतिलकरूपी पूर्ण चंद्रमा चमकत असलेला पाहून ही वैधव्यांधकारांत चांचपडणारी गतभर्तृका नाहीं हें स्पष्टच होत होतें. तसेंच गळयांत मंगळसूत्र नव्हतें यावरून ही अद्याप विवाहपाशांत पड-लेली नाहीं हेंहि उघड होत होतें. विवाह म्हणजे स्त्रीचें जीवनसर्वस्व. तत्संबंधींचें रहस्य याप्रमाणें ललाटावरून व गळयावरून उघड होत असतां आपलें पूर्व चरित्र येथील कोणासही माहीत नाहीं अशीच तिची समजूत असावी ना ?

हा चेहरा आपण पूर्वी कधीं पाहिला असावा अशी हरिहररावांस एकदां शंका आली. पण सुंदर चेहरा प्रथमदर्शनींच मनांत ठसून स्मृति-भूमींत इतका खोल जाऊन बसतो कीं तिच्या बालपणींच्या थराशीं

त्याचा संबंध असावा असें वाटूं लागतें, असें त्यांनीं आपल्या शकेचें समाधान करून घेतलें.

पाहुणीबाईची यजमानांशीं व त्यांच्या मुलाशीं ओळख होते न होते तोंच घरांतून स्वयंपाकीण बाळूबाई व गडी बजाबा ही बाहेर आलीं. ज्या काळांत स्वामिसेवकसंबंध वंशपरंपरा चाले त्या काळचा तीं अवशेष होतीं ते संबंध संकेतसिद्ध नसून जन्मसिद्ध असल्यामुळें सेवकांना यजमानांच्या कुटुंबाबद्दल आपलेपणा वाटे, व प्रसंगीं ते त्याजवर हुकमतही गाजवीत. हरिहररावांच्या वृद्ध सेवकांनीं त्यांचें व त्यांच्या वडिलांचें बालपण पाहिलें होतें, त्यांनीं हरिहररावांस अंगाखांद्यावर खेळविलें होतें, आणि बाबूचें संगोपन व संवर्धन करण्याचा हक्कही भोगवट्यानें आपणाकडेच आला आहे असा त्यांचा समज होता सुभद्राबाई निवर्तल्यापासून घरचा सारा कारभार त्यांच्याच हातीं आला होता, व तो दुसऱ्याच्या हातीं मुकाट्यानें जाऊं देण्याचा त्यांचा विचार नव्हता. त्यांना साक्षरतेचा गंध नसून कानांनीं ऐकूंही येत नव्हतें, यामुळें त्यांच्या कानीं जाहिरातीची वार्ताहि गेली नव्हती आपल्या घरांत ही नवखी बाई बाबूस कुरवाळीत आहे हें पाहून त्यांना प्रथम आश्चर्य वाटलें; पण यजमानाकडून त्या सलगीचें कारण कळल्यानंतर तिचा मनापासून राग आला. त्याच्या भरांत तीं दोघें हातवारे करून तोंडास येईल ते बडबडूं लागलीं. सुदैवानें दोघांच्याही तोंडांचीं दांत पडून बोळकीं झालेलीं असल्यामुळें कठिण पदार्थ चावण्याच्या कामीं जसा त्या तोंडाचा उपयोग नव्हत_ तसा मृदु अंतःकरणाचा चावा घेण्याच्या कामींहि नव्हता. मनोगत दुसऱ्यापाशीं प्रकट करणें हें बहिर्मुख कार्य जरी त्यांजकडून होत नव्हतें तरी राग ओकून मनास हलकें वाटावयास लावण्याचें अंतर्मुख कार्य त्यांजकडून चांगल्या प्रकारें होई. यामुळें रागाचा रोख श्रोत्यांस कळण्यापूर्वीच तो राग शांत होई. दुसरें असें कीं, उभयतांची बोबडी बडबड एकदम चालू रहात असल्यामुळें समोरासमोरून धडधडत येणाऱ्या दोन वणव्यांप्रमाणें त्यांचे भडिमार इतरांना होण्यापेक्षां परस्परांसच मारक होत असत. त्यांचा इतरांवर होणारा परिणाम बहुधा हास्याच्या रूपानें

बाहेर पडत असे. त्या दोघांचा पाहुणीवरील निष्फळ राग पाहून बाबू खदखदां हंसूं लागला, व "पाहुणीणबाई, आमच्या बाळूबाईची आणि बजाबाची गमत आहे कीं नाहीं?" असें म्हणून आळीपाळीनें दोघांचीं तोंडें दाबून धरूं लागला. सर्कशींतील गुरगुरणारे सिंह एकाद्या अर्भकाची सलगी जशी निमूटपणें सहन करितात त्याप्रमाणें आपल्या मोठ्या यजमानास न बधणारीं म्हाताराम्हातारी आपल्या चिमुकल्या यजमानाच्या लडिवाळ लीलांस तेव्हांच वश झालीं. दोघें कानांनीं बहिरीं असल्यामुळें त्यांचीं तोंडें बंद करण्याचे कामीं युक्तिवादाचा कांहींच उपयोग होत नसे. बाबूनें तीं दाबून धरितांच मात्र तीं आपोआप बंद होत. या खेपेसही नेहमींच्या प्रकाराचीच पुनरावृत्ति झाली. बाबूच्या मध्यस्थीनें लवकरच तरुण पाहुणीचा आणि वृद्ध नोकरांचा पूर्ण सलोखा झाला, आणि तें लहानसें कुटुंब नेहमींप्रमाणें शांततेचा अनुभव घेऊं लागलें.

---

# प्रकरण २ रें.

एकंदर शिक्षणांत शारीरिक शिक्षणाचें किती महत्त्व आहे याची 'बाई' स ( हें कुटुंबांतील मंडळींनीं पाहुणीस दिलेलें नांव असून तिचें खरें नांव कळेपर्यंत आपणही तिला याच नांवानें ओळखूं. ) पूर्ण जाणीव होतीसें दिसलें. ती बाबूकडून रोज सकाळीं बारा नमस्काराचा व संध्याकाळीं खेळाचा व्यायाम नियमानें करून घेई. खेळांत ती स्वतः भाग घेत असल्यामुळें तिलाही व्यायाम होई. तिला शुद्ध हवेचें महत्त्वही चांगलें कळत होतें. म्हणून ती बजाबास बरोबर घेऊन सकाळ संध्याकाळ बाबूसह गोदातटाकीं किंवा गांवाबाहेर मोकळ्या हवेंत फिरावयास जाई. कधीं कधीं त्या त्रिकूटाबरोबर हरिहररावही सहल करावयास जात. अशा वेळीं नागरिकांचा त्यांजविषयींचा आदर अनेक प्रकारें प्रकट होई. हरिहरराव त्या काळचे प्रसिद्ध सुधारक होते. त्यांचें साप्ताहिक सामाजिक सुधारणेलाच सर्वस्वीं वाहिलेलें असे. आरंभीं आरंभीं इतर सुधारकांप्रमाणें त्यांनाही समाजाकडून त्रास झाला. पण त्यांचें पवित्र आचरण,

तत्त्वनिष्ठा, लहानथोरांशीं होणारें मोकळें व प्रेमळ वर्तन, त्यांजकडून गोरगरिबांस सढळ हातानें होणारी मदत इत्यादि गोष्टींचा हळू हळू समाजावर योग्य तोच परिणाम होत जाऊन हल्लीं ते शहरांतील एक वजनदार गृहस्थ म्हणून गणिले गेले होते. दुसऱ्या एकाद्या सुधारकाबरोबर अशी सौंदर्यसंपन्न तरुणी जातांना दिसली असती तर लोकांनीं त्यांजबद्दल कुशंका घेऊन ती नेत्रसंकेतांच्या, हास्याच्या व कुत्सित उद्गारांच्याही द्वारा व्यक्त करण्यास कमी केलें नसतें. पण त्यांचा हरिहररावांबद्दल इतका आदर होता कीं, 'बाई' चें सांनिध्य हरिहररावांच्या कुचेष्टेला कारणीभूत होण्याऐवजीं हरिहररावांचें सांनिध्य तिजबद्दल आदर वाटावयास मात्र कारणीभूत होऊं लागलें. हें 'बाई'च्या लक्ष्यांत आल्यावांचून राहिलें नाहीं. कुत्सित भावाप्रमाणें आदरभावही सांसर्गिक असतो. समाजाचा आदर 'बाई' च्या संस्कारक्षम अंतःकरणावर सपाट्यानें संक्रांत होऊं लागला, व थोड्याच दिवसांत तो तेथें दृढमूल होऊन बसला.

नित्याच्या आहारांत सेवण्यांत येणारीं खाद्यपेयें सात्विक असलीं पाहिजेत यावर 'बाई'चा विशेष कटाक्ष असे. प्रथम विषारी द्रव्यांचा जठरांत प्रवेश होऊं देऊन नंतर त्यांचे दुष्परिणाम नाहींसे करण्याकरितां जलाल औषधांचें सेवन करणें सर्वथा अनिष्ट आहे असें तिचें मत होतें. तिनें हरिहररावांकडे आल्यावर लौकरच स्वयंपाकाचें काम आपणाकडे घेतल्यामुळें कुटुंबाच्या आरोग्याची किल्लीच तिच्या हातीं आल्यासारखी झाली. वातुळ व इतर प्रकारच्या अपायकारक पदार्थावर तिनें पूर्ण बहिष्कार घातला. तेलांत तळलेले किंवा विशेष तिखट किंवा आंबट पदार्थ ती मुळींच करीनाशी झाली. तेलकटपणानें, तिखटपणानें किंवा आंबटपणानें पदार्थ रुचकर करण्यापेक्षां त्याच्या घटकावयवांचें प्रमाण योग्य योजून किंवा त्यास योग्य आंच देऊन त्याला रुचि किंवा खरपूसपणा आणण्याची कला तिला अवगत होती. अन्नाची गोडी त्याच्या अंतर्गत माधुर्यापेक्षां भुकेच्या प्रखरपणावर व चर्वणावर अवलंबून असते हें तत्त्व तिच्या ठायीं पूर्णपणें बिंबलें होतें, व त्याचा ती व्यवहारांत नेहमीं उपयोग करी. मुलांच्या जठरांवर अत्त्याचार करण्याचा

वेडेपणा अनेक आयांकडून अज्ञानामुळें होतो, तो तिनें कधीं केला नाहीं. चर्वण सावकाशीनें व्हावें म्हणून ती जेवणाच्या वेळीं रुचकर पदार्थांबरोबर स्वादिष्ट भाषणाचाही लाभ जेवणारास देत असे. त्यामुळें जेवण सावकाश व आनदांत होई पुष्कळदां हरिहरराव तोंडानें खाद्य पदार्थांचें व मनानें 'बाई'च्या भाषणाचें चर्वण करीत घटका घटका बसत. तिचा स्वर इतका मधुर होता कीं, ज्याप्रमाणें शब्दमाधुर्यानें साध्या काव्यासही अनिर्वचनीय गोडी येते त्याप्रमाणें तिच्या स्वरामुळें तिच्या साध्या विधानासही येत असे. पण तिच्या भाषणांत नादमाधुर्याबरोबर व्यंजनाही असे, व त्यांतील खुबीचा आस्वाद हरिहरराव खऱ्या रसिकाप्रमाणें घेत असत. आजपर्यंत त्यांना जेवणाचें फारसें महत्व वाटत नसे. पण आता तें नित्यक्रमांतील एक महत्वाची बाब होऊन बसलें. आतां त्याना बाळूबाईच्या हातचा स्वैंपाक मुळींच गोड लागेनासा झाला. तथापि जेवणांत तिचा मुळींच भाग नसे असें मात्र नाहीं कारण जेवणाच्या वेळीं 'बाई' ज्या मौजेच्या गोष्टी सांगे त्यांतील बहुतेकींचे विषय बाळूबाई व बजाबा यांचा भोळसरपणा, भ्रमिष्टपणा, छांदिष्टपणा, शीघ्रकोपीपणा हे असत. ज्याप्रमाणें एकाच डोक्यांत प्रखर बुद्धिमत्ता व मानसिक दौर्बल्य पुष्कळदां दिसून येतात त्याप्रमाणें त्या घरांत मालकाचे प्रागतिक व नोकरांचे प्रतिगामी विचार गुण्यागोविंदानें एकत्र रहात होते. कोणत्याही गोष्टीविषयीं हरिहररावांची खात्री होण्यास बलवत्तर प्रमाणें लागत, तर त्यांच्या नोकरांची खात्री शिंकेनें किंवा वड्याळाच्या ठोक्यानेंही होत असे. हरीहरराव अंगीकृत कार्याच्या सिद्धीचा मार्ग पर्वतप्राय संकटांतूनही काढीत, तर त्यांचे नोकर मांजर आडवें गेल्यासही अपशकून मानून माघार घेत कार्यसिद्धीकरितां हरिहरराव तर्कशुद्ध उपायाचा अवलंब करीत व प्रयत्नांत यश न आल्यास विषाद न मानितां कर्तव्य केल्याचें समाधान मानीत, तर त्यांचे नोकर कार्याशीं पूर्णपणें असबद्ध अशा मत्रतंत्रादि उपायांची योजना करीत व त्यांनीं अपेश आल्यास तळमळ करीत बसत. याप्रमाणें उभयतांच्या आचारविचारांत जमीनअस्मानाचें अंतर असलें तरी हरिहरराव आपल्या वृद्ध नोकरांना साहिष्णुतेनें किंबहुन

वृद्धांस योग्य अशा आदरानेंच वागवीत असत. ते त्यांच्या दोषांचा तिटकारा न करितां अपरिहार्य म्हणून स्वीकार करीत व कधीं कधीं तर त्यांचा स्वतःच्या कार्यास उपयोगही करून घेत. त्यांच्या अनेक लेखांना प्रेरणा व साहित्य त्यांच्या नोकरांपासूनच मिळें. 'बाई' आल्यापासून त्यांची त्यांजमुळें करमणूकही बरीच होऊं लागली. 'बाई'नें हरिहरराव व बाबू यांजवर जशी आपली छाप बसविली होती तशी नोकरांवरही बसविली होती. तिचा सौम्य अधिकार ते आनंदानें मानूं लागले होते आळीपाळीनें वर्चस्व उपभोगणाऱ्या राजास व प्रजेस एकाद्या परकीय सत्तेनें आपल्या अंमलाखालीं आणून त्यांजवर आपला अधिकार चालवावा तसाच प्रकार त्या गृहराज्यांत झाला होता. इतर परक्या अंमलाप्रमाणें हा अंमल जुलमी वाटत नव्हता येवढाच काय तो त्यांत विशेष होता.

लेखन, वाचन, गणित, इतिहास, भूगोल, ज्योतिष, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान इत्यादि सर्व शास्त्रांतील मूलतत्वें शिकविण्यास 'बाई'नें एकदमच आरंभ केला. पण तिची शिकविण्याची पद्धतच इतकी मनोरंजक असे कीं, बाबूस शिकण्याचे श्रम न वाटतां त्यांत खेळाइतकीच गोडी वाटूं लागली. ती ज्ञानाची रोजच्या व्यवहाराशीं बेमालूम सांगड घाली, यामुळें बाबूस ज्ञानाचा उपयोग कळे. ती कोणताही विषय शिकविताना आपल्या शिष्याच्या बुद्धीस व कल्पनेस एकदम चलन देऊन ज्ञान, गोष्टी, दृष्टांत, प्रयोग यांचें असें बेमालूम मिश्रण करी कीं, तो विषय त्याच्या स्मृतीवर ठसून त्याच्या विवेकबुद्धीसही पटे. प्रत्येक विषयाचें विश्वाच्या घडामोडींत काय महत्व आहे हें ती वेळींच समजावून देत असल्यामुळें व भिन्न भिन्न शास्त्रांचा परस्पर संबंध स्पष्ट करीत असल्यामुळें त्याच्या ज्ञानास एकांगीपणा व बेडौलपणा येण्याची भीति रहात नसे. बरीच माहिती ती त्याच्या तर्कशक्तीच्या साहाय्यानें त्याच्या मुखांतूनच काढून घेत असल्यामुळें त्यास तिच्यांत आपलेपणा वाटे. याप्रमाणें त्यास ज्ञानाचें बाळकडू मिळत गेल्यामुळें तें त्याच्या रक्तांत भिनूं लागलें.

कवि, गायक यांप्रमाणें शिक्षकही उपजतच असावा लागतो, व 'बाई' अशा उपजत शिक्षकांपैकींच होती.

सत्य जाणण्याची इच्छा ही जशी ज्ञानाची जननी आहे तशी सत्य बोलण्याची आवड ही नीतीची व संकल्प किंवा वचन आचरणांत उतरण्याची तळमळ ही पुरुषार्थाची जननी आहे हें 'बाई'स चांगलें अवगत असल्यामुळें ती बाबूच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न करण्याची आणि सत्यवक्तेपणाचें व करारीपणाचें महत्व बिंबविण्याची एकही संधि वायां दवडीत नसे. उत्साहाचा व सामर्थ्याचा निरर्थक होणारा व्यय वांचवून उद्योग सफळ करण्याचे कामीं शिस्तवारपणाचा किती उपयोग असतो हेंही तिला माहीत असल्यामुळें तिनें बाबूच्या आयुःक्रमास शिस्तीचें वळण लावून दिलें. त्याच्या दैनिक कार्यक्रमाची प्रत्येक बाब घड्याळाच्या कांट्याच्या चलनवलनाप्रमाणें नियमित वेळीं व नियमित गतीनें होऊं लागली. अखेरीस त्याच्या अंगीं वक्तशीरपणा इतका बिंबला कीं, त्याच्या क्रियांचें नियमन घड्याळावरून होण्याऐवजीं घड्याळाचेंच नियमन होऊं लागलें.

मनुष्य कितीहि बुद्धिमान्, ज्ञानी, नीतिमान् व करारी असला तरी त्याला श्रद्धेचें बळ असल्यावांचून त्याजकडून कोणतेंही महत्कृत्य होत नाहीं अशी 'बाई'ची दृढ निष्ठा होती. यामुळें या विश्वाचें नियंत्रण करणारी एक सर्वसमर्थ शक्ति असून ती प्रत्येक व्यक्तीकडून तिच्या योग्यतेप्रमाणें लहानमोठ्या कर्तव्याची अपेक्षा करिते व तिला प्रत्येक सत्कार्यात मदत करिते अशी शिकवण ती बाबूस नित्य देत असे. या शिकवणींत तिजकडून बाबूस मिळणाऱ्या बहुतेक सर्व धार्मिक शिक्षणाचा अंतर्भाव झाला होता. याशिवाय तो रात्रीं झोंपीं जाण्यापूर्वी अर्धा तास ती त्याजकडून पेटीच्या सुरांवर तुकारामाचे अभंग, मोरोपंतांच्या कांहीं केका व मध्वमुनीश्वरासारख्यांचीं कांहीं पदें आळीपाळीनें म्हणवून घेत असे. या परिपाठामुळें ईश्वरभक्तीबरोबर त्याची गायनाभिरुचिही वृद्धिंगत होत चालली.

बाबू रात्रीं नऊ वाजतां निजे. त्यानंतर दोन तास 'बाई' आपलें गुरूचें नातें बाजूस ठेवून शिष्यिणीचें नातें धारण करी. या अवधींत

जरुरीशिवाय एकही इंग्रजी शब्द उच्चारावयाचा नाहीं असा तिजमध्यें व तिच्या गुरूमध्यें संकेत ठरला होता. 'बाई'स इंग्रजी भाषेचा चांगलाच परिचय आहे असें थोड्याच दिवसाच्या अनुभवानें हरिहररावांस कळून चुकलें होतें. इंग्रजी भाषेच्या सूक्ष्म परिचयानें तिची मातृभाषेची ओळख बरीच बुजून गेली आहे हेंही त्याबरोबरच त्यांच्या लक्षांत आलें होतें, व म्हणूनच त्यांनीं हा संकेत केला होता. असो; आरंभीं हरिहररावानी तिला जुन्या मराठी कवितेचा मार्मिक परिचय करून दिला त्यांनीं 'नवनीता'च्या धर्तीवर पण त्यापेक्षां बराच मोठा असा प्राचीन कवितेचा एक संग्रह तयार केला असून त्यांतील दुर्बोध स्थलांच्या विशदीकरणार्थ बाजूस टीपाही दिल्या होत्या. तो त्यांनीं 'बाई'कडून वाचवून घेतला. वाचन चालू असतां ते तिला पूर्वी मराठी भाषा किती समृद्ध व समर्थ होती आणि हल्लीं तिची कशी दैना झाली आहे हें स्पष्ट करून दाखवीत; आणि जुन्या कवितेंतील जे शब्द व प्रयोग हल्ली रूढीतून गेले असून जीर्णोद्धारास योग्य आहेत त्यांकडे तिचें लक्ष वेधीत. ज्ञानेश्वरांपासून रामजोश्यांपर्यंत मराठी शब्दांच्या घटनेंत कोणते फेरफार झाले ते वाचनाच्या ओघांतच ते तिला समजावून सांगत. संतकवींकडून धर्मात व भाषेंत सुधारणा होत असतां त्यांच्या समकालीन मुत्सद्यांकडून व योद्ध्यांकडून राजकारणाच्या व समरांगणाच्या आखाड्यांत कोणते पराक्रम घडत होते याचेंही ते चटकदार वर्णन करीत. यामुळें 'बाई'च्या अंगीं स्वधर्माच्या व स्वभाषेच्या अभिमानाबरोबर स्वदेशाभिमानही दृढ होई. तत्कालीन राजकीय स्थितीचें चित्र वठवितांना ते जुन्या बखरींतील उतारे वाचून दाखवीत. काव्यवाङ्मय धर्माच्या उच्च वातावरणांत गीर्वाणवेषांत तरगत असल्यामुळें व गद्यवाङ्मय भूपृष्ठावरील सामान्य व्यवहारांत यावनी वेषानें सरपटत असल्यामुळें त्यांस एकांगीपणा कसा आला याचेंही ते प्रसंगानुरोधानें स्पष्टीकरण करीत.

प्राचीन मराठी वाङ्मयाशीं पुरेसा परिचय करून दिल्यावर हरिहररावांनीं आपला रोख अर्वाचीन वाङ्मयाकडे वळविला. इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयानें मराठी काव्यास व्यवहाराची व मराठी गद्यास लालि-

त्याची जोड मिळून त्यांचा एकांगीपणा कसा नाहींसा झाला याचें त्यांनीं उत्तम विवेचन केलें. अव्वल इंग्रजींतील मराठी ग्रंथकारांच्या साध्या भाषेंतील सौंदर्य त्यांनीं तिच्या नजरेस आणिलें. त्या काळीं इंग्रजी भाषेच्या अनुकरणानें मराठी भाषेंत घुसलेले बोजड व हेंगाडे प्रकार त्यांनीं तिच्या दृष्टोत्पत्तीस आणून त्यांचा उपसर्ग मराठी भाषेस पोहचू नये याविषयीं योग्य खबरदारी घेण्याची आवश्यकता तिला पटवून दिली. बालपणीं संस्कृत भाषेवर व तारुण्यांत इंग्रजी भाषेवर टेंकण्याची संवय लागल्यामुळें परावलंबी बनलेल्या मराठी भाषेस आपल्या पायांनीं चालण्यास व गुर्वर्थभार वहाण्यास ज्या ग्रंथकारांनीं समर्थ केलें त्यांचा त्यांनीं कृतज्ञतापूर्वक निर्देश केला अर्वाचीन गद्य-जनकाची व काव्यजनकाची तर त्यांनीं फारच प्रसंशा केली. त्यानंतर-च्या गद्य ग्रंथकारांची व कवींची सुद्धां त्यांनीं योग्य शब्दांनीं संभावना केली.

याप्रमाणें मराठी भाषेच्या जन्मापासून तो सांप्रतच्या प्रौढावस्थेपर्य-तचा समग्र इतिहास त्यांनीं आपल्या हुशार व जिज्ञासु शिष्यिणीस नीट रीतीनें समजाऊन दिला. त्याच्या भिन्न भिन्न भागांचें स्पष्टीकरण करण्याकरितां ते स्वतःच्या ग्रंथसंग्रहांतून अनेक पुस्तकें आणून त्यांतील वेंचक उतारे तिला वाचून दाखवीत. तिजकरितां त्यांस जे श्रम पडत त्यांनीं त्यांस त्रास न होतां आनंदच होत असे असें त्यांच्या चर्येवरून व वर्तनावरून उघड होई.

त्यांनीं मराठी भाषेचा इतिहास सांगतांना प्रमुख विद्यमान ग्रंथका-रांची व त्यांच्या ग्रंथांची माहिती देऊन त्यांच्या गुणदोषांची यथायोग्य चर्चाही केली. पण तसें करितांना त्यांनीं दोन प्रमुख व्यक्तींचीं नांवें वगळलीं हें चाणाक्ष 'बाई'च्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. त्या-पैकीं एक व्यक्ति म्हणजे खुद्द हरिहररावच. त्यांनीं आपली तेजस्वी वाणी सामाजिक सुधारणेस वाहिली असून लेखनकौशल्याबद्दल मोठी कीर्ति संपादन केली होती. त्यांनीं आपलें नांव वगळण्यास स्वाभाविक विनयच कारण झाला असावा. दुसऱ्या व्यक्तीचा नामनिर्देश न कर-ण्यांत अंतस्थ द्वेषाचें अंग असावें असा 'बाई'स संशय आला. ही

दुसरी व्यक्ति मुंबई येथील ‘ चंद्रिका ’ नांवाच्या मासिकांत ‘ कौन्तेय ’ या टोपणनांवानें राजकीय विषयांवर अत्यत ओजस्वी लेख लिहीत असे. पण तिचें खरें नांव अजून गुलदस्तांतच राहिलें होतें. सामाजिक विषयांपेक्षां राजकीय विषय समाजास जात्याच अधिक प्रिय म्हणून म्हणा किंवा हरिहररावांच्यापेक्षां ‘ कौन्तेया ’ चें लेखनचातुर्य अधिक म्हणून म्हणा, त्याच्या ‘ चंद्रिकें ’ तील लेखांनीं त्या काळीं ‘प्रकाशां’-तील लेखांपेक्षां पुष्कळच अधिक लोकप्रियता मिळविली होती हरिहर-रावांच्या लेखांत प्रखर युक्तिवादाचा व नाजूक उपहासाचा उपयोग केलेला असे तर ‘ कौन्तेया ’ चा लेखांचा कल्पनेवर व आवेशावर भर असे. पूर्वोक्त लेखांचा परिणाम बहुधा विघटनात्मक असे तर उत्तरोक्त लेखांचा घटकात्मक असे. हरिहरराव स्वदेशाच्या व परदेशांच्या सद्यः-स्थितींची तुलना करून स्वदोषांची तीव्र जाणीव व ते दूर करण्याची तीव्र तळमळ उत्पन्न करीत, तर ‘ कौन्तेय ’ आपली प्राचीन काळांतील ऊर्जितावस्था व सांप्रतची महत्पदपात्रता वर्णून महत्वाकांक्षा उत्पन्न व जागृत करीत. हरिहररावांच्या लेखांनीं वाचकांस आपल्या हीन स्थिती-ची लाज वाटून तद्द्वारा उत्कर्षेच्छा उत्पन्न होई तर ‘ कौन्तेया ’ च्या लेखांनीं त्यांचा स्वाभिमान जागृत होऊन तद्द्वारा होई. याप्रमाणें ते लेखक एकमेकांचे पूरक होते असे म्हणण्यास हरकत नाहीं. समाजास त्या दोघांची आवश्यकता जरी सारखीच होती तरी तिची जाणीव मात्र त्यास नसे. त्यास हरिहररावांबद्दल आदर तर ‘ कौन्तेया ’ बद्दल प्रेम वाटे. याप्रमाणें ‘ कौन्तेया ’ बद्दल मत्सर वाटावयास हरिहररावांस बरेंच सबळ कारण होतें. पण त्यांस त्याचा द्वेष वाटावयासही उभयतांच्या पूर्व चरित्रांत एक मोठें कारण झालें होतें; व त्यास जरी दहा वर्षांचा अवधि लोटला तरी दोन्ही लेखक समाजापुढें लेखरूपानें हमेशा वावरत असल्यामुळें तें कारणही समाजाच्या स्मरणांत ताजेंच होतें. तें कारण असें:—

त्या वेळीं हरिहरराव नुक्तेच पदवीधर झाले असून त्यांनीं आपल्या आवडत्या लेखनव्यवसायास एका सामाजिक कादंबरीनें आरंभही केला होता. होतकरू वकिलाची भावी कीर्ति त्यानें हातीं घेतलेल्या पहिल्या

मोकद्दम्याचा अनुकूल निकाल होण्यावर व होतकरू वैद्याची त्यानें हातीं धरिलेल्या पहिल्या रोग्याचा निकाल न होण्यावर अवलंबून असते, त्याप्रमाणें होतकरू ग्रंथकाराची त्याच्या पहिल्या कृतीच्या यशस्वितेवर अवलंबुन असते. हरिहररावांची प्रतिमा उच्च प्रकारची कादंबरीविषय त्यांच्या आवडीचा व तिजवर त्यांनीं घेतलेले परिश्रमही अविश्रांत, असा त्रिवेणीसंगम झाल्यावर कादंबरी उत्कृष्ट वठली यांत नवल वाटण्यासारखें कांहींच नव्हतें. ती बाहेर पडते न पडते तोंच तिजवर वाचकांच्या उड्या पडूं लागल्या, दुसऱ्यांच्या मालकीच्यां पुस्तकांवरच आपली वाचनाची तलफ भागविणाऱ्या फुकट्यांनीं सुद्धां त्या कादंबरीच्या प्रती भारी किंमतीस विकत घेऊन आपल्या संग्रही ठेवल्या, या एकाच गोष्टीवरून तिची लोकप्रियता अजमावितां येईल. मराठी वाङ्मयाकाशाच्या क्षितिजावर एका नवीन व उज्ज्वल ताऱ्याचा उदय झाल्याचें प्रसिद्ध ग्रंथकारांनीं प्रांजलपणें कबूल केलें. कादबरी प्रसिद्ध होण्याच्या आदल्या दिवशी हे हरिहरराव कीर्तिमंदीराच्या प्रवेशद्वाराशीं हजारों होतकरू लेखकांच्या गर्दींत आशाळभूतपणें निष्ठत उभे होते ते ती प्रसिद्ध होतांच त्या मंदिराच्या गाभाऱ्यांतील उच्चासनावर विराजमान झाले. थोड्याच अवकाशांत त्यांच्या पुस्तकाच्या अनेक आवृत्ति निघून हां हां म्हणतां खपून गेल्या. पुस्तकाच्या उत्पन्नांतून त्यांनीं नाशिक येथें 'प्रकाश' छापखाना उभारून 'प्रकाश' हें साप्ताहिक सुरूं केलें. याप्रमाणें त्यांच्या लेखनव्यवसायाच्या आरंभींच त्यांस यश जसें अकल्पित व अपूर्व मिळालें तसें त्या यशास विघ्नही अचानक व भारी उपस्थित झालें. त्यांच्या कादंबरींत दांडगी कल्पकता, उद्दाम भावना, असामान्य भाषाप्रभुत्व इत्यादि अनेक प्रतिभा-सुलभ गुण एकत्रित झाले होते. परंतु सरावलेल्या लेखकास केवळ दीर्घ अनुभवाच्या व अभ्यासाच्या बळावर जे दोष सहज टाळितां येतात अशा दोषांचीही त्या कादंबरींत त्या गुणांबरोबर खिचडी झाली होती. हिच्या कथानकांत व पात्रांच्या स्वभांत चमत्कृति भरपूर होती; पण स्वाभाविकपणा मुळींच नव्हता; वैचित्र्य विपुल होतें, पण एकसूत्रीपणा मुळींच नव्हता. तिच्यांतील विधानांत अपूर्वता बरीच होती, पण सत्य फारच कमी

होतें. तिच्या भाषेंत लालित्य मुबलक होतें, पण समर्पकपणा कमी होता. तिच्या वाक्यरचनेंत विविधता पुष्कळ होती, पण ओघ मुळींच नव्हता. या दोषांचा पूर्ण फायदा घेऊन एका टीकाकारानें त्या कादंबरीवर झणझणीत टीका लिहिली व ती 'कौंतेय' या नावानें 'चंद्रिका' मासिकांत प्रसिद्ध केली. टीकाविषयीभूत कादंबरी अत्यंत लोकप्रिय असल्यामुळें तिजवरील टीकेनेंही सर्व साक्षर महाराष्ट्राचें चित्त आपणाकडे वेधून घेतलें. टीकाकार कादबरीलेखकापेक्षांहीं अधिक लेखनपटु आहे असे उद्गार चोहोंकडे निघूं लागले, व कादंबरीच्या चहात्यांसही ती गोष्ट प्रांजलपणें कबूल करावी लागली. 'चंद्रिके'च्या ज्या अकांत टीका आली त्या अंकाच्या अनेक आवृत्ति निघून खलास झाल्या, आणि त्या मासिकाचे मालक व संपादक अमृतराव कुळकर्णी यांस त्यापासून फायदाही पुष्कळ झाला. त्यांनीं त्यापूर्वी आपलें मासिक लोकप्रिय करण्यास चित्रें, बक्षिसें, खास अक इत्यादि अनेक उपाय योजून पाहिले होते, पण त्यांत त्यांना तादृश यश मिळालें नव्हतें. 'कौंतेया'च्या टीकेनें मात्र त्यांचा जो जम बसला तो कायमचाच. तेव्हांपासून त्या लेखकानें प्रत्येक अंकांत राजकीय विषयावर एक झणझणीत लेख प्रसिद्ध करण्याचा उपक्रम करून तो दहा वर्षें अव्याहत कायम ठेविला. राजकीय सुधारकांचें सामाजिक सुधारकांशीं जें हमेशा वैर असलेलें दिसून येतें त्यापासूनच बहुधा 'कौन्तेया'स हरिहररावांच्या सामाजिक कादंबरीचीं शकलें उडविण्यास प्रेरणा मिळाली असावी. त्याच्या लेखणीनें अमृतरावांच्या उत्कर्षाचा मार्ग मोकळा करून त्यांचें अपरिमित कल्याण जसें केलें तसें त्यांचें व हरिहररावांचें कायमचें वितुष्ट पाडून अमरिमित नुकसानही केलें. ते हरिहररावांपेक्षां पंधरावीस वर्षांनीं वडील होते तरी त्यांचा बऱ्याच दिवसांचा अकृत्रिम स्नेह असून हरिहररावांनीं त्यांस विद्यालयांतून मोकळें होतांच त्यांच्या मासिकास लेखनसाहाय्य करण्याचें विद्यार्थिदशेंत अभिवचन दिलें होतें. त्यांनीं लिहिलेल्या कादंबरीची चोहोंकडे जी वहावा झाली तिजवरून त्या साहाय्याची किंमत अमृतरावांस कळली होती. पण ती कळावयास व तें साहाय्य एका विलक्षण योगायोगानें हातून कायमचें जावयास एकच गांठ पडली! ती हानि पत्करण्यावांचून त्यांस गत्यंतर नव्हतें. ज्याप्र-

माणें एका म्यानांत दोन तरवारी राहूं शकत नाहींत त्याप्रमाणें एका मासिकांत हरिहररावांसारखा निःसीम सुधारक व ‘कौंतेया’सारखा कट्टा राष्ट्रीय यांचा समावेश होणें शक्य नव्हतें. हरिहररावांसारखा खंबीर लेखक हातचा गेल्यामुळें ‘चंद्रिके’ची द्रव्यदृष्ट्या जी हानि झाली ती ‘कौंतेया’च्या लेखाचा सारखा पुरवठा होत गेल्यामुळें पूर्ण-पणें भरून निघाली; पण त्यांच्या स्नेहास अंतरल्यामुळें अमृतरावांची जी आत्मिक हानि झाली ती कशानेंही भरून येणें शक्य नव्हतें.

‘कौंतेय’ हें टोपणनांव धारण करणारी व्यक्ति कोण याबद्दल अनेकांचे अनेक तर्क होते. त्या काळीं जी एक प्रसिद्ध व्यक्ति महाराष्ट्रीय राजकारणाचीं सूत्रें चालवीत होती तिनेंच हें नांव घेतलें असावें असा कित्येकांचा तर्क होता पण त्या व्यक्तीच्या ठायीं असलेला कल्पकतेचा पूर्ण अभाव त्या तर्काशीं विसंगत होता. बहुतेकांचें अनुमान ‘कौंतेय’ म्हणजे खुद्द अमृतरावच असें होतें, व तें खरें ठरण्याचा बराच संभव होता. अमृतरावांनीं ‘चंद्रिके’च्या लेखकांचें संख्याबाहुल्य दाखविण्या-करितां पूर्वी अनेकदां ‘मार्गण’, ‘सव्यसाची’, ‘पाशुपत’, ‘धन्वी’ इत्यादि अनेक अवतार घेऊन अनेक विषयांवर लेख लिहिले होते. ‘कौंतेय’ हा त्यांचा नवा अवतार असणें अशक्य नव्हतें. आतां येवढें खरें कीं, त्यांच्या पूर्वीच्या एकाही लेखांत ‘कौंतेया’ची दिव्यदृष्टि, विशाल कल्पना व जोमदारपणा हे गुण दिसण्यासारखे नव्हते. पण प्रत्येक लेखकाची गति सर्वच विषयांत सारखी चालते असें थोडेंच आहे! ज्या अमृतरावांस अर्थशास्त्र, पदार्थविज्ञानादि भौतिकशास्त्रें; शेतकी, धार्मिक संस्था, स्थानिक स्वराज्य इत्यादि विषयांशीं तद्रूप होतां आलें नाहीं त्यांस ललित कलेंतील एखाद्या कृतीपासून किंवा प्रचलित राजकारणापासून स्फूर्ति मिळून उत्तम ग्रंथरचना करतां येणें पूर्णपणें शक्य होतें. निदान समाजाचें बहुमत तरी या तर्कास अनुकूल होतें. ‘बाई’चें मत त्या तर्कास प्रतिकूल होतें. त्यासंबंधानें हरिहर-रावांचें काय मत आहे हें जाणण्याची तिला फार उत्कंठा होती. पण तो विषय काढिल्यास हरिहररावांची पूर्वस्मृति जागृत होऊन त्यांस विनाकारण दुःख होईल असें वाटून तिनें ती बरेच दिवस मनांतल्या मनांत दाबून ठेवली.

---

# प्रकरण ३ रें

हरिहरराव आपल्या सुंदर शिष्यिणीस शिकविण्यास एका माजघर-वजा प्रशस्त खोलींत बसत. तिच्याशिवाय त्यांस बाळूबाई व बजाबा हेही श्रोते—किंवा प्रेक्षक म्हटल्यास अधिक शोभेल—मिळाले होते. ते हरिहररावांच्या शिकवणीस सारखेच बधिर असल्यामुळें त्यांचें तिजकडे मुळींच लक्ष्य नसे. ते बाह्यात्कारीं वातींचें किंवा शिवण्याचें काम करीत, पण मनांतून 'बाई'ची सुभद्राबाइशीं तुलना करीत व हरिहररावांचें तिच्याशीं लग्न झाल्यास त्यांची गृहस्थिति किती सुखपूर्ण होईल याचा विचार करीत मुकाट्यानें बसत. खुद्द हरिहररावांच्या मनांत तसे विचार घोळत असत कीं काय हें सांगणें कठिण आहे. 'बाई' नें प्रथमपासूनच त्यांचें मन आकर्षित केलें होतें हें वरवर पहाणारासही दिसण्यासारखें होतें. तिनें बाबूच्या शिक्षणाचें काम सर्वतोपरी समाधानकारक रीतीनें चालविल्यापासून त्यांचें मन तिजविषयीं कृतज्ञतेनें भरून गेलें होतें. केवळ मुलाच्या संगोपनाच्याच बाबतींत नव्हे, तर खाण्यापिण्याच्या बाबतींतही आपण या पाहुणीच्या आहारीं कसे जात आहोंत हें त्यांच्या लक्षांत येण्यास उशीर लागला नाहीं. त्यांचा जो वेळ संपादकीय खुर्चीवर जाई त्या वेळांतही त्यांचें अवधान 'बाई' कडे लागलेलें असे. हा लेख तिला कितपत पसंत पडेल, तो लेख तिला नापसंत तर पडणार नाहींना अशा विचारचक्रावर आरूढ होऊन त्यांचें मन सारखें भ्रमण करीत राही. तिला शिकविण्याच्या वेळेची तर ते चातकप्रमाणें वाट पहात. तिला उपकृत कसें करावें, आपणाला अवगत असलेलें सर्व ज्ञान शक्य तितक्या शीघ्रतेनें तिच्या मनांत संक्रांत कसें करावें, तिच्या ओंठांवर स्मिताची छाया आणण्या-करितां कोणत्या शब्दांची योजना करावी या विवंचनेंत ते गढून जाऊं लागले. हीं सर्व उघड उघड प्रेमाचीं लक्षणें होतीं. जेथें जेथें म्हणून खरें प्रेम दिसून येतें तेथें तेथें प्रेमविषयीभूत वस्तूच्या उत्कर्षासाठीं सर्वस्वसमर्पण-आत्मसमर्पणही-करण्याची तयारी दिसून येते. प्रेमभेदा-प्रमाणें उद्दिष्ट उत्कर्षाच्या स्वरूपामध्यें भिन्नता दिसून येते इतकेंच काय

तें. आपल्या कलेवर खरें प्रेम करणारा कारागीर आपल्या कृतींत सौंदर्याचा परिपोष करण्यास खपतो तर आपल्या वल्लभेवर निस्सीम प्रेम करणारा वल्लभ तिच्या ठायीं संतोष उत्पन्न व्हावा म्हणून कायावाचा-मनेंकरून झटतो, व आपल्या शिष्यावर अकृत्रिम प्रेम करणारा गुरु त्याच्या ठायीं ज्ञानाचा परिपोष करण्याचा जिवापाड प्रयत्न करितो. हरिहररावांकडे परिस्थितिबलानें जें गुरूचें नातें आलें होतें त्याचें या-प्रमाणें वल्लभाच्या नात्याशीं साहश्य होतें. ‘ बाई ’ला शिकवतांना आपल्या अध्यापनकौशल्याची पराकाष्ठा करण्यांत हरिहररावांचा उद्देश तिला ज्ञानप्राप्ति व्हावी येवढाच केवळ नसून तिला आनंदाचा लाभ व्हावा असाही असल्यामुळें त्यांजमध्यें गुरूचें व वल्लभाचें अशीं दोन्ही नातीं एवकटलेलीं होतीं असेंही म्हटलें तरी चालेल. त्यांचा मुलगा ‘ बाई ’चा शिष्य असल्यामुळें या संयुक्त नात्यास एक प्रकारची पुष्टिच मिळाल्यासारखी झाली होती. आपणामध्यें गुरूस पित्याच्या ठायीं मानण्याची जी रूढि आहे तिचें अनुकरण करून अध्यापिकेस जननीच्या ठायीं मानिलें तर ‘ बाई ’ हरिहररावांची शिष्या या दृष्टीनें मुलगी होती तशी त्यांच्या पुत्राची गुरु व माता या दृष्टीनें त्यांची पत्नी होती. या नात्यानें निर्विकल्पज्ञान त्यांना कधींही न होणें असंभवनीय होतें. कधीं कधीं बाळूबाई व बजाबा यांचे त्यांजकडे व ‘बाई’कडे पाहून परस्परांमध्यें जे नेत्रसकेत चालत ते न कळण्याइतकें तरी त्यांचें मन निर्लेप नसलें पाहिजे खास. याप्रमाणें जरी त्यांचा आपल्या मनावरील ताबा सपा-ट्यानें नाहींसा होत चालला होता तरी ते आपली मनः-स्थिति तिजपासून गुप्त ठेवण्याची फारच खबरदारी घेत हें कबूल केलें पाहिजे. प्राचीन कवींच्या शृंगारिक व प्रेमविषयक कविता ‘ बाई ’च्या अवलोकनांत येऊं न देण्याची ते इतकी दक्षता बाळगीत कीं, तिजवरून एखाद्यास त्यांच्या मनःस्थितीबद्दल संशय यावा. आपल्या घरीं ‘ बाई ’ एकटी, असहाय व सर्वस्वीं आपल्या कह्यांत असतां तिला आपल्या मनाचा एकाद्या कृतीनें, उद्गारानें किंवा चर्येनें सुगावा लागूं देणें म्हणजे तिच्या परावलंबनाचा व विश्वासाचा अनुचित फायदा घेण्यासारखें होईल असें त्यांचें संस्कृत मन त्यांस सांगत असावें. त्यांचें तिच्याशीं

बाह्यतः वर्तन एकाद्या प्रेमळ पित्याचें एकुलत्या एक मुलीशीं असावें तसेंच असे. तथापि कधीं कधीं स्पष्टीकरणाच्या भरांत त्यांजकडून पतिपत्नीसंबंधाचा निर्देश होणें अपरिहार्य होतें. संस्कृत साहित्य-शास्त्रांत काव्याचे जे अनेक उपयोग सांगितले आहेत त्यांपैकीं ' कांतेच्याप्रमाणें मधुर उपदेशाची प्राप्ति ' यांचें विवरण करितांना त्यांच्या स्वरास एकदम मार्दव आलें. त्यांस गतपत्नीची आठवण झाली असावी असे ' बाई ' स साहजिकच वाटलें. स्वर-विकाराबरोबर दुःखाचें एकही चिन्ह दिसलें नाहीं यावरून त्यांच्या कल्पनेसमोर गतपत्नीच्या ऐवजीं भावी पत्नीचेंच चित्र उभें राहिलें आहे असा तिला पुसट संशय तरी यावयास पाहिजे होता. पण आपण आपल्या गुरुच्या हृदयावर केवढी मोठी सत्ता स्थापित केली आहे याचें तिला पूर्ण अज्ञान असल्यामुळें तिला तो संशय शिवलाही नाहीं. संस्कृत साहित्यशास्त्र्यांनीं कवितेस स्त्री कल्पून तिच्या आवश्यक व आगंतुक अंगांना रस, वृत्ति, गुण, अलंकार हीं नावें देण्यांत किती औचित्य दाखविलें आहे हें विशद करितांना त्यांचा स्वर किंचित् काल नेहमींपेक्षां जरा अधिक उत्तेजित झाल्यासारखा दिसला. पण लौकरच त्यांस त्याची लाज वाटून त्यांनीं आपला नित्याचा स्वर धारण केला. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं पूर्वीच्या साध्या मराठीस उंची वस्त्रालंकार लेववून कसें नटविलें याचें रसभरित वर्णन करीत असतांना त्यांची दृष्टि ज्याप्रकारें ' बाई ' वर किंचित् स्थिरावली त्यावरून त्या क्षणीं त्यांच्या कल्पनेसमोर मराठी भाषा ' बाई ' च्याच रूपानें आली असावी असें वाटण्यास बरेंच सबळ कारण मिळण्यासारखें होतें. या अव्यक्त प्रेमाबरोबर आपणासारखा विधुर ' बाई ' सारख्या नव बालिकेस मुळींच योग्य नाहीं ही जाणीव व आपलें प्रेम तिच्या नजरेस आल्यास ती रागावून निघून जाईल ही भीतिही त्यांच्या मनांत गुप्तपणें वसत असली पाहिजे. तिच्याशीं विवाहग्रंथीनें दृढ व कायमचें बद्ध होण्याची आशा त्यांस मुळींच नसून गुरुशिष्यांच्यासारख्या अल्पकालीन व शिथिल संबंधांत मिळणाऱ्या सहवाससुखावरच ते संतुष्ट होते; व त्या

सुखाची दीर्घता त्यांचें प्रेम गुप्त रहाण्यावरच अवलंबून होती. तें गुप्त ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न आतांपर्यंत बराच यशस्वी झाला होता

'बाई' चें मनोगत हरिहररावांच्यापेक्षाही दुर्ज्ञेय होतें. पुरुषांच्यापेक्षां स्त्रियांचें आचारस्वातंत्र्य मर्यादित असल्यामुळें व त्यांच्या क्षुल्लक कृतींवर कुतर्कांचें अवाढव्य जाळें रचिलें जाण्याचा संभव असल्यामुळें गौप्यगोपनाचें त्यांना बाळकडूच मिळत असतें. त्यांतून 'बाई' चें व हरिहररावांचें नातेंही रहस्यरक्षणास अत्यंत अनुकूल होतें ती त्यांचा सतेज व रुबाबदार चेहरा सतृष्ण दृष्टीनें पहात किंवा त्यांचें भाषण अतृप्त कर्णांनीं ऐकत घटका घटका जरी बसली तरी त्यांत गुरूच्या पाठाकडे एकाग्रतेनें अवधान देणाऱ्या शिष्यिणीस न शोभण्यासारखें कांहींच नसे बरें, हरिहररावांची दृष्टि तिजकडे लागलेली दिसल्यामुळें तिची दृष्टि अवनत व गाल आरक्त झाले तर तें स्त्रीसुलभ शालीनतेस शोभण्यासारखेंच होतें. त्यांस एकच पुस्तक एका वेळीं वाचण्याचे जे अनेक प्रसंग येत, त्या प्रसंगीं उभयतांचीं तोंडें जवळ जवळ आल्यामुळें जरी तिच्या शरीरास रोमांच येऊन कंप सुटला तरी हरिहररावांचे डोळे व लक्ष्य पुस्तकाकडे लागलेलें असल्यामुळें तें त्यांच्या लक्ष्यांत येण्याचें कारण नसे. त्यांच्या किंवा नोकरांच्या दृष्टिपातांच्या माऱ्यापासून स्वतःचा बचाव करितांना तिला पुस्तकाचा ढालीसारखा उपयोग करून घेण्यास नेहमींच मोकळीक् असे.

याप्रमाणें स्वतःचा भाव लपविण्यांत तिला कितीही यश आलें तरी तिचें मन तिच्या कह्यांतून निघून हरिहररावाच्या काबूंत सपाट्यानें जात असल्याचें सूक्ष्म दृष्टीच्या चाणाक्ष निरीक्षकाच्या लक्षांत येण्यासारखें होतें. त्याला कारणेंही तशींच सबळ होतीं. प्रेमात नेहमीं आदर व कींव या परस्परविरुद्ध भावांचें मिश्रण आढळून येतें. हरिहररावांचें गुण व परिस्थिति ते भाव जागृत करण्यासारखींच होतीं. महाराष्ट्रांतील अत्यंत नांवाजलेले लेखक म्हणून त्यांजबद्दल 'बाई' स त्यांचें दर्शन होण्यापूर्वींपासूनच मनस्वी आदर होता. ती त्यांच्या वरीं रहावयास आल्यापासून त्या आदरांत भरच पडत गेली. त्यांच्या अंगीं

लेखनकौशल्याशिवाय इतरही अनेक गुणांचें वास्तव्य असल्याचें तिच्या दृष्टोत्पत्तीस आलें. परोपकाराच्या व्रताचें त्यांजकडून किती कर्तव्यनिष्ठेनें किंबहुना प्रेमानें पालन होई हें अहर्निश तिच्या निदर्शनास येई. शहरात कोणाही दीनदुबळ्यास औषधोपचाराची किंवा पैशाची गरज पडली कीं ती भागविण्याकरितां त्यानें हक्कानें त्यांजडे मागणी करावी असा प्रघातच पडून गेला होता. रोग्याच्या उपयोगासाठीं त्यांनीं वैद्यकीचें कामापुरतें ज्ञान करून घेतलें असून औषधांचा तात्पुरता संग्रहही बाळगिला होता. त्याकरितां व इतर धर्मार्थ कार्यासाठीं ते कधीं कधीं आपल्या शक्तीबाहेर खर्च करीत. एकादा स्नेही संकटांत पडला म्हणजे त्यास त्यांतून मुक्त करण्याकरितां ते स्वतःच्या अडचणीकडे न पहातां प्रयत्नांची पराकाष्ठा करीत. कधीं कधीं ते एकाद्या आजारी स्नेह्याच्या उशाशीं रात्रभर जागून सकाळीं आपल्या नित्यकृत्यांस नेहमींच्या उत्साहानें लागलेले तिला दिसत. त्यांचे बाहेरच्या माणसांशीं जसें नमुनेदार वर्तन असे तसें घरच्या माणसांशींही असे. नोकरमाणसांस ते आप्तप्रमाणेंच वागवीत, बाबूच्या कल्याणासाठीं त्यांनीं दरमहा पन्नास रुपये पगार व अन्नवस्त्र देण्याची आपल्या मगदुराबाहेरची तयारी दाखविली होती; आणि जरी 'बाई'नें अन्नखर्चाबद्दल गृहकृत्यें करण्याचें पत्करून व पगार घेण्याचें नाकारून त्यांना पैशाच्या खर्चांतून वांचविलें होतें तरी तिच्या शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च होणारा त्यांचा वेळ त्याच्याइतक्याच किंबहुना त्याच्यापेक्षांही अधिक किंमतीचा होता. तितक्या वेळांत त्यांना ग्रंथरचना करून तिजवर विपुल द्रव्य मिळवितां आलें असतें खुद्द तिच्याशीं त्यांची वागणूक अत्यंत सभ्य व प्रेमळपणाची असे. तिनें स्वयंपाकासारखीं कष्टाचीं कामें जरी स्वतःवर आपखुषीनें लादून घेतलीं होतीं व बाळूबाईच्या हातच्यापेक्षां तिच्याच हातचें अन्न व करणें सवरणें त्यांना आवडे तरी तिच्या कामाचा बोजा शक्य तितका हलका करण्याची त्यांनीं बाळूबाईस सक्त ताकीद दिली होती. तिचें एकादेवेळीं कपाळ दुखूं लागलें कीं, त्यांचा जीव अगदीं घाबरा होऊन जाई, व तिच्या प्रकृतीची चौकशी करण्याकरितां कार्यालयांतून माजघरांत त्यांच्या कितीतरी वेरझारा होत. तिला ते मराठी

भाषेचें व वाङ्मयाचें शिक्षण देत तें देतांनाही तिजकडून बाबूला होणाऱ्या लाभाच्या मोबदल्याचें भरपूर माप तिच्या पदरांत पडावें याकडे त्यांचें नेहमीं लक्ष असे. तिच्या मनाचें पावित्र्य निष्कलंक ठेवण्यासाठीं ते किती जपत हें मागें आलेंच आहे. ज्या व्यक्तीबद्दल आपणांस मोठा आदर वाटतो ती संकटांत पडली असतां तिजबद्दल आपणांस वाटणाऱ्या अनुकंपेचेंही प्रमाण मोठेंच असतें. 'बाई' प्रथम या घरीं आली त्यावेळीं हरिहररावांचे गृहिणीच्या अभावीं जेवण्या-खाण्याच्या व इतर बाबतींत चांगलेच हाल चालले होते. ते कमी व शक्य तर नाहींसे करण्याकडे तिनें आपलें लक्ष्य पुरविलें. आपल्या हातच्या सात्विक व मधुर अन्नानें व भोजनसमयींच्या सात्विक व मधुर भाषणानें तिनें हरिहररावांच्या भोजनांतील उणीव नाहींशी केली. घराची मालकीण मृत झाल्यापासून त्यांत चोहोंकडे अव्यवस्था माजली होती 'बाई' येतांच त्यांत पुन्हां सुव्यवस्था नांदूं लागली. गृह-व्यवस्थेकडे लक्ष द्यावे लागून हरिहररावांचा जो चित्तविक्षेप होई तो 'बाई' आल्यापासून बंद झाला. नोकरचाकरांवरील धाक नाहींसा झाल्यापासून जी बेबंदशाही माजली होती तिलाही तिच्या योगानें आळा बसला. बाबूस वेळेवर उठविणें, त्याजकडून प्रातर्विधि, अभ्यास, स्नानखानपानादि व्यवहार वगैरे नित्य कृत्यें वेळेवर करवून घेणें, त्याच्या कपड्यालत्त्यांची नीट व्यवस्था ठेवणें, त्याच्या मनाची करमणूक करणें या गोष्टी आतां तिजकडून बिनबोभाट होऊं लागल्या-मुळें त्यांची विवंचना बाळगण्याचें हरिहररावांस कारण उरलें नाहीं. घराच्या आंतील व्यवस्था बायकांकडे व बाहेरची पुरुषांकडे ही त्यांच्या पत्नीच्या वेळची वहिवाट आतांही निर्वेधपणें चालूं लागली. इतकेंच नाहीं, तर हरिहररावांच्या मागचा त्रास कमी व्हावा म्हणून 'बाई' लेखनव्यवसायाची पूर्व तयारी करण्याचें निमित्त दाखवून त्यांच्या संपादकीय कर्तव्यांपैकींही कांहीं त्यांच्या परवानगीनें अंगावर घेऊन पार पाडूं लागली. ती त्यांच्या लेखांचीं स्थूल मुद्रितें तपासून मुद्रणदोष दुरुस्त करूं लागली, व कधीं कधीं तर त्यांचे लिहिण्याचे श्रम वांचावे म्हणून त्यांच्या लेखांचा त्यांच्या मुखावाटे निघणारा मजकूर त्यांज-

करितां कागदावर उतरून घेऊं लागली. तिचें लेखन इतकें शुद्ध व सुवाच्य असे कीं तें काम तिजकडून करविण्याला हरिहररावांची प्रतिकूलता नाहींशी होऊन उलट तत्परता दिसूं लागली. ती जवळ असतां त्यांच्या विचारांस व कल्पनेस जोराचें चलन मिळून त्यांचे लेख अन्यथा उतरत त्यापेक्षां पुष्कळच सरस उतरत, हाही या योजनेपासून एक लाभ होई. याप्रमाणें 'बाई'च्या हातून गृहाची संपूर्ण अंतर्व्यवस्था व बाह्यव्यवस्थेपैकींही कांहीं भाग होऊं लागला, आणि हक्काच्या मागोमाग जबाबदारी जशी येते त्याप्रमाणें जबाबदारीच्या मागोमाग हक्कही येत असल्यामुळें तिजकडे हळू हळू गृहिणीच्या कर्तव्याबरोबर तिचा अधिकारही यावयास लागला. स्त्रीचें पतीच्या घराशीं असलेलें निकटचें नातें 'गृहिणी' या शब्दानें दर्शविण्यांत येतें. पत्नी ही गृहिणी असते त्याप्रमाणें अर्धांगीही असते. यामुळें त्या दोन कल्पनांची सांगड आपल्या मनांत इतकी दृढ झालेली आहे कीं, त्यांपैकीं एक मनांत येतांच तिजकडून दुसरीचीही आपोआप सूचना होते. 'बाई' कडून सुगृहिणीचीं कर्तव्यें समाधानकारक रीतीनें होऊं लागल्यापासून तीच हरिहररावांची अर्धांगी होणार अशी वृद्ध सेवकांची खात्री झाली. ती कल्पना खुद्द यजमानांच्या व 'बाई'च्याही मनांत कधीं कधीं येई पण ते जशी तिला अशक्यकोटींतील व त्याज्य समजत तशी 'बाई' ही समजत असावी असें तिच्या खिन्नतेवरून वाटे. तिच्या दृष्टीनें उभयतांच्या विवाहास कोणती आडकाठी होती, हें तिच्या पूर्व चरित्राच्या ज्ञानाच्या अभावीं सांगणें कठिणच होतें.

एकाद्या सामान्य सुधारकावर विधुरावस्थेची आपत्ति येते तेव्हां त्यास पुराणाभिमानी लोकांकडून अनेक कुत्सित सूचना करण्यांत येतात. "आजपर्यंत यांनीं विधवाविवाह, मिश्रविवाह इत्यादि ज्या अनेक सुधारणांचें जोरानें समर्थन केलें त्यांतील एकादी आचरणांत आणण्याची सुसंधि आयती चालत आलेली आहे. ती साधून यांनीं समाजास धडा घालून दिला पाहिजे. न दिल्यास इतर सुधारकांच्याप्रमाणें यांच्याही माथीं 'बोलघेवडे' हा शिक्का बसल्यावांचून राहणार नाहीं." हेंच बहुधा त्यांच्या सूचनांचें तात्पर्य असतें. परंतु हरिहररावांबद्दल सुधा-

रकांप्रमाणें पुराणाभिमान्यांनाही आदरभाव असल्यामुळें त्यांच्या पत्नींच्या निधनाबद्दल वृत्तपत्रांतून आलेले सर्व लेख सारखेच सहानुभूतीपर होते एकांतही त्यांना पुढें स्वीकारावयाच्या मार्गाबद्दल सूचना केलेली नव्हती. त्यांचा स्वभाव गंभीर व संकोची असल्यामुळें पत्नीनिधनानंतर योग्य काळ लोटल्यावरही त्यांच्यापाशीं त्यासंबंधानें गोष्ट काढण्याचा कोणाचा धीर होईना. हरिहररावांचें वय जवळ जवळ प्रथम वराच्याइतकेंच असल्यामुळें उपवर मुलींच्या पित्यांचे मात्र त्यांच्या घरीं हेलपाटे सुरू झाले. त्या सर्वांच्या प्रश्नांस त्यांचें "माझी पत्नी नुकतीच गत झाली आहे" असें एकच ठराविक उत्तर असे. त्यावर "म्हणूनच तर आपणांपाशीं ही गोष्ट काढली." असें म्हणून 'गरजवंताला अक्कल नसते' या म्हणीची यथार्थता जर कोणी सिद्ध केलीच तर ते "मला मुळीं लग्नच करावयाचें नाहीं." असें तुसडेपणाचें उत्तर देऊन त्याची बोळवण करीत. त्यांना लग्नाच्या बाबतींत कळकळीचा सल्ला देण्यासारखा त्यांचा एक स्नेही नोकरीच्या निमित्तानें एका दूरच्या प्रांतांत रहात होता त्यास हरिहररावांना द्वितीय विवाहाचा आग्रह समक्षासमक्ष कितो निर्भीडपणें करवला असता याची शंकाच आहे. पण जें काम जिभेस साधत नाहीं तें द्विजिव्ह लेखणीस फारच सुकर जात असल्यामुळें त्यानें त्यांजपाशीं आपला मानस एका लांबलचक पत्राच्या मध्यस्थीनें व्यक्त केला "विधुरास स्त्रीनिधनामुळें येणारा खिन्नपणा स्मशानवैराग्यासारखा असतो. कधींही लग्न न करण्याचा विचार बाजूस ठेवून पुन्हां गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्याशिवाय त्यास गत्यंतर नसतें. आपणाकडे मुलीं फार काळपर्यंत अविवाहित स्थितींत रहात नसल्यामुळें त्यानें आपला द्वितिय विवाह लांबणीवर टाकणें म्हणजे वधूच्या निवडीच्या क्षेत्राचा संकोच करणें होय." असा त्या पत्राचा आशय होता. हरिहररावांनीं पत्र वाचून झाल्यावर तें 'बाई' स वाचण्यास दिलें. तिचें वाचन संपल्यावर ते म्हणाले, 'माझा व या गृहस्थांचा अकृत्रिम स्नेह आहे, त्या अर्थी त्यांनीं ही सूचना शुद्ध बुद्धीनेंच केली आहे यांत शंका नाहीं. पण ग्रंथकाराच्या व टीकाकाराच्या दृष्टींत जें अंतर असतें तेंच

अशा सूचना करणाऱ्यांच्या व विधुरांच्या दृष्टिकोनांत असतें. विधुरांच्या मनःस्थितीची त्यांना नीटशी जाणीव नसते."

ग्रंथकार व टीकाकार यांच्या उपमेची खोंच 'बाई' च्या पूर्णपणें लक्ष्यांत आली. ती म्हणाली "प्रथम पत्नीची आठवण बुजेपर्यंत तरी अशा सूचना करूं नयेत."

ती पूर्णपणें बुजणें कधींच शक्य नाही. ती जितकी बुजणें शक्य आहे तितकी यापूर्वीच बुजली आहे. गृहव्यवस्था, अपत्यसगोपन, नोकराचाकरांवरील देखरेख यांपैकीं एकाही बाबतींत असमाधान मानायला मला जागा नाहीं मीं विवाह केल्यानें या गोष्टी सुधारण्याऐवजीं बिघडण्याचाच विशेष संभव अशा स्थितींत हातचें सोडून पळत्याच्या पाठीस न लागण्यांतच शहाणपणा आहे. शिवाय मीं प्रथमविवाह केला तेव्हां त्याकडे केवळ स्वहिताच्याच दृष्टीनें पाहण्यास मोकळा होतो, पण आतां मला बाबूच्या व 'प्रकाशा' च्या हिताकडेच विशेष लक्ष दिलें पाहिजे. या माझ्या दोन अपत्यांच्या कल्याणाची जबाबदारी शिरावर घेण्यास योग्य अशी स्त्री मिळेल तरच मी लग्नास तयार होणें योग्य होईल."

"आपणांसारख्या प्रसिद्ध पुरुषास अशी स्त्री मिळणें दुरापास्त नाहीं. तिचा ज्या दिवशीं येथें गृहप्रवेश होईल त्याच दिवशीं घराची आणि बाबूची व्यवस्था तिच्या स्वाधीन करण्यास मी तयार आहे."

"तुम्ही तयार असाल; पण बाबूची त्या अधिकारसंक्रमणास संमति मिळेल कीं काय हें नको का पहावयाला ? शिवाय बाबुच्या शिक्षणाच्या मोबदल्यांत मीं तुम्हांला लेखनकलेचें शिक्षण देण्याला स्वतःला बांधून घेतलें आहे. तें शिक्षण पुरें होईपर्यंत तरी मला लग्न करतां येणार नाहीं; आणि माझें जें मत तसेंच बाबुचेंहि असणार यांत शंका नको. तो आल्या प्रेमळ 'बाई' चा अंमल सोडून सावत्र आईचा अंमल बसवून घेण्याला कधींहि तयार होणार नाहीं. याची परीक्षा पहावयाला लांब जावयास नको. आपण बाबूलाच विचारूं म्हणजे झालें."

असें म्हणून ते बाबूच्या खोलींत गेले. मागाहून 'बाई' ही गेली.

हरिहरराव बाबूस म्हणाले, "बाबू, तुला नवी आई पाहिजे कीं 'बाई' पाहिजेत?"

बाबू घाबरलेल्या मुद्रेनें म्हणाला, "नवी आई आलीतर 'बाई' मला सोडून जाणार कीं काय?"

'बाई' नें म्हटलें, "अर्थातच."

"मग मला 'बाई' च पाहिजे."

हें ऐकून 'बाई' नें त्यास जवळ ओढून त्याच्या गालाचा पापा घेतला. बाबू किंचित् थां॒न म्हणाला, "पण बाबा, आपल्या बाळूबाई आणि बजाबा म्हणतात त्याप्रमाणें 'बाई' लाच नाहीं का आई होतां येणार? 'बाई' या शब्दांत 'आई' हा शब्दही येतोचना?"

"वाः! तूं तर मोठा पंडितच झाला आहेस कीं!" असें म्हणून हरिहररावांनीं बाबूच्या दुसऱ्या गालाचा पापा घेतला. त्यांनीं व 'बाई'नें याप्रमाणें एकाच्या अपत्याच्या भिन्न गालांचें भिन्न कालीं चुंबन घेण्या-ऐवजीं उभयतांच्या आपत्याच्या एकाच गालाचें एकसमयावच्छेदेंकरून चुंबन घेण्याचा योग कधीं तरी येईल का कुणीं सांगावें?

---

# प्रकरण ४ थें

एके दिवशीं 'बाई'नें एक लहानशी कविता रचून हरिहररावांना दाखविण्यास आणिली. अपत्याच्या तोंडवळ्यांत ज्याप्रमाणें मातेच्या अत्यंत आवडत्या माणसाचें प्रतिबिंब वठतें त्याप्रमाणें त्या कवितेच्या विषयांत व रचनेंत बाबूचें सादृश्य दिसत होतें. कवितेचें नांव 'आमचा लाडका जयंत' हें असून तिच्यांत एका मुलाच्या बाललीला वर्णिल्या होत्या. कवितेची रचनाही मुलाप्रमाणें साधी, अकृत्रिम व मनोहर अशीच होती. कविता वाचून हरिहरराव प्रसन्न झाले. कवितेच्या नांवांतील 'आमचा' या शब्दानें तर त्यांच्या अंगावर हर्षाचे रोमांच

उभे केले तथापि त्यांनीं आपला आनंद दाबून कवितेवर टीका करण्यास सुरुवात केली. ते म्हणाले, "पहिला प्रयत्न या दृष्टीनें तर तुमची कविता चांगली झाली आहेच. पण स्वतंत्र दृष्टीनेंही तिची चांगल्या कवितांत गणना होण्यास हरकत नाहीं. राष्ट्राच्या वाङ्मयांत ज्याप्रमाणें गद्यापूर्वी पद्याचा प्रादुर्भाव दिसून येतो, त्याप्रमाणें लेखकाच्या लेखनसंसारांतही दिसून येतो. काव्य म्हणजे भावनांच्या उत्कटतेचें व्यक्त स्वरूप. अपक्व वयांत बुद्धि जरी अपरिपक्व असली तरी भावना त्याच कारणामुळें उच्छृंखल असतात, व यामुळें कवितेचा मुख्य मालमसाला बाळपणींच तयार असतो. पण त्यास व्यक्त व व्यवस्थित स्वरूप देण्यास जी बुद्धि आवश्य असते तिचा उदय जरा उशिरानें होत असल्यामुळें काव्यशक्तीचा उत्कर्ष अगदीं बालवयांत होऊ शकत नाहीं. कवीस सृष्टीचा गायक म्हणतात, व तें लाक्षणिक अर्थानें खरेंही आहे पण गायनापेक्षां काव्यास बुद्धीची जरूर पुष्कळच अधिक असते. अनेक बालगायकांत एकादा बालगंधर्व असूं शकेल; पण हजारों बाल-पद्यलेखकांत एक तरी बालकवि आढळेल कीं काय याची शंका वाटते एकाद्या मुलास 'बालकवि' ही पदवी अर्पण करितांना आपण बहुधा 'बाल्य' शब्दाच्या व्याप्तीचा विस्तार किंवा कवीच्या आवश्यक गुणांचा संकोच करीत असतों. कवीस कल्पनासृष्टींत यथेच्छ विहार करण्याची मोकळीक असल्यामुळें स्वातंत्र्य जसें विपुल असतें त्याप्रमाणें स्वतःची कृति रसिकांच्या ग्रहणशक्तीच्या आटोक्यांत आणणें किंबहुना त्यांस शक्य तितकी प्रिय वाटण्यासारखी करणें भाग असल्यामुळें बंधनेंही भारी असतात. शब्द गाळण्याची किंवा त्यांचीं रूपें व क्रम बदलण्याची त्यास मोकळीक असली तरी त्यास अक्षरांची योजना नादबद्ध व तालबद्ध रचनेस पोषक म्हणजे कर्णमधुर व वृत्तानुकूल करावी लागते. सत्यसृष्टींतील नियम जरी त्यानें झुगारून दिले तरी कल्पनासृष्टींतील नियम त्याला पाळावे लागतात. त्यानें निर्माण केलेली सृष्टि कितीही काल्पनिक असली तरी त्यास तिच्या सत्यत्वाबद्दल रसिकाच्या चित्तांत प्रत्यय उत्पन्न करावयाचा असल्यामुळें त्यानें कल्पिलेल्या व्यक्तींच्या प्रकृति, वृत्ति व कृति रसिकचित्तास पटण्यासारख्या स्वाभाविक असाव्या

लागतात. त्यानें रंगविलेलीं पात्रें कितीही दैवी किंवा राक्षसीस्वभावांचीं असलीं तरी त्यांची परीक्षा करणारा रसिक या जगांतीलच असल्यामुळें त्यांचें वर्तन निसर्गनियमांस सोडून असतां कामा नये. सारांश कवीस आपल्या कल्पनास्वातंत्र्यास औचित्याचा पायबंद घालावा लागतो. याशिवाय भाषाशुद्धि, पूर्वापरसंबंध, दूरान्वयाचा व असंबद्धतेचा अभाव, पुनरुक्तिराहित्य, शब्दांची काटकसर, त्यांची कांटेतोल योजना, कल्पनांचा ग्रहणानुकूल क्रम इत्यादि गोष्टी गद्यलेखांत जशा साधाव्या लागतात, तशा काव्यांतही साधाव्या लागतात ज्याप्रमाणें शरीर सुदृढ किंवा सुदर होण्यापूर्वी निरामय असणें जरूर असतें त्याप्रमाणें काव्य सालंकार व सरस होण्यापूर्वी निर्दोष असणें इष्ट असते स्फूर्तीच्या उसळीसरसें बाहेर आलेल्या काव्यांत दोष राहिलेच पाहिजेत असें म्हणण्यांत अर्थ नाहीं स्फूर्तीची लहर कितीही अल्पजीवी असली तरी त्या अल्प अवधींत तिला वृत्तांचीं व अनुप्रासांचीं बंधनें पाळितां येतात हे निर्विवाद आहे मग दोष काढून टाकणेंच कां जड जावें ? बरें, तितकी फुरसद त्या लग्नघाईंत मिळण्यासारखी नसते असें जरी घटकाभर कबूल केलें, तरी मागाहून सावकाशीनें तें काम करण्यास तरी मुळींच हरकत नसावी. जे दोष थोड्याशा श्रमाअंतीं इतरांस दूर करतां येतात ते खुद्द कवीस दूर करणें कां जड जावें ? गुणाच्या नाहीं तर दोषांच्या तरी आधिक्यावरून आपल्या स्फूर्तीबद्दल लोक अनुमान करितील ही आशा व्यर्थ आहे. त्या आधिक्यावरून स्फूर्तीच्या अभावाबरोबर दक्षतेचा व चिकाटीचा अभाव मात्र दिसून पडतो. जुन्या कवींच्या रचनेंत ते दोष खपतात म्हणून ते आपल्याही रचनेंत खपतील असा कवीनें स्वतःचा समज करून घेतां कामा नये. एक तर त्या कवींनीं ते दोष जाणूनबुजून राहूं दिलेले नसतात. दुसरें असें कीं, त्या काळच्या कवींत व रसिकांत शिक्षणाचें व संस्कृतीचें सरासरीनें जें प्रमाण होतें त्यापेक्षां सांप्रतच्या कवींत व रसिकांत अधिक असल्यामुळें सांप्रतच्या कवींपासून सांप्रतचे रसिक अपेक्षांहि अधिक करितात. तुल्य योग्यतेच्या दोन काव्यांत जे अधिक निर्दोष तेंच अधिक दीर्घजीवि होणार हेंही कवीनें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आम्ही स्वतंत्र

असून आम्हांस रसिकांशीं कांहीं कर्तव्य नाहीं असें जे कवि म्हणतात ते स्वतःची फसवणूक करून घेतात असें समजावें. स्वतःची कविता प्रसिद्ध करण्याची त्यांना जी घाई सुटते तिजवरून ही गोष्ट उत्तम रीतीनें सिद्ध होते. इतर कलांप्रमाणें काव्य हेंही रसिकोपजीवि आहे. गाण्याच्या बैठकींत गवई श्रोत्यांकडे पाठ करून गाऊं लागला तर तें जसें शोभणार नाहीं तसें कवीनें रसिकांकडे कानाडोळा करणेंही शोभणार नाहीं. या सूचना मी तुम्हांस तुमच्या आवडीच्या व्यवसायाच्या सुरुवातीस केवळ इशाऱ्यादाखल करीत आहे. या सूचनांना तुमची कविता कारण झाली असा समज होऊ देऊं नका. ती कविता पुष्कळच निर्दोष आहे. पण निर्दोष कविता लिहिणाऱ्या कवीस यश मिळत गेलें म्हणजे त्याच्या ठायीं जी एक प्रकारची बेपर्वाई उत्पन्न होत असते तिचा संपर्क तुम्हांस होऊं नये याच उद्देशानें या सूचना मी करीत आहें. इतकी प्रस्तावना केल्यानतर आतां तुमच्या कवितेंतील दोष जरा निर्भीडपणें दाखविले तर तुम्हांला राग येण्याचें कारण नाहीं." इतकें बोलून त्यांनीं 'बाई 'च्या कवितेंतील अनेक दोष तिच्या मनावर ठसावेत म्हणून जरा विस्तारपूर्वकच सांगितले. दोषाविष्करणाच्या मानानें गुणवर्णन कमी झालेलें पाहून 'बाई' जरा खिन्न झाली. तें पाहून हरिहरराव म्हणाले, "एका हितचिंतकानें नाजूक रीतीनें केलेली खाजगी टीका जर तुम्ही इतकी मनाला लावून घेऊं लागलां तर उद्यां एखाद्या मत्सरग्रस्त टीकाकारानें जाहीरपणें केलेली झणझणीत टीका कशी सहन कराल? शस्त्रवैद्याकडून सद्‌बुद्धीनें व नाजूक हातानें होणाऱ्या शस्त्रक्रियेस ज्या इसमाची तयारी नाहीं तो रणांगणावर शत्रूकडून अपकारबुद्धीनें होणाऱ्या प्रहारांना कसा टिकणार? प्रत्येक होतकरू लेखकानें आपलें मन टीकाकारांच्या निर्दय हल्ल्यांस दाद न देण्याइतकें खबीर बनविलें पाहिजे. केवळ प्रकृतीच्या नाजूकपणामुळेंच अनेक मुग्ध प्रतिभा टीकांच्या विषारास बळी पडल्या आहेत."

शेवटच्या वाक्यांतील स्वारस्य 'बाई' च्या पूर्णपणें लक्ष्यांत आलें. तिनें जरा भीतभीतच विचारिलें, "आपणांस ही कविता प्रसिद्धीस योग्य वाटते कां?"

" ग्रंथकारानें प्रसिद्धीची फाजील घाई करू नये असें माझें मत आहे. तशी मला माझ्या गुरूकडून शिकवणच मिळाली आहे म्हणाना! तथापि मीं दर्शविलेले दोष काढून टाकिल्यास ही कविता छापण्यास हरकत नाहीं असेंही मला वाटतें. तसें पाहूं गेलें तर लेखकानें आपले सरसकट सर्वच लेख छापण्यास हरकत नाहीं. त्यांतील सरस असतील ते टिकतील, नादान असतील ते नामशेष होतील. एवंच त्यांच्या प्रसिद्धींत हानि कोणतीच नसून लाभ मात्र खात्रीचा असतो."

" पण मोठ्या ग्रंथकाराच्या चांगल्या ग्रंथाबरोबर वाईट ग्रथही केवळ नाममाहात्म्याच्या जोरावर काळाशीं यशस्वी रीतीनें टक्कर देतांना कधीं कधीं दिसतातच ना ? "

" तें खरें, व त्याबद्दल त्या ग्रथकारांना वाईटही वाटतें पण ती आपत्ति तुम्हांआम्हांसारख्या लेखकांवर येण्याची भीति नाहीं."

" माझ्याबरोबर आपण कशाला विनाकारण आपणांकडे कमीपणा घेतां ? "

" तुम्हांआम्हांमध्यें अंतर असलेंच तर तें प्रकाराचें नसून प्रमाणाचें आहे. तुमच्यापेक्षां मीं लेखनावर पुष्कळच अधिक काळ व उत्साह खर्च केला आहे. तेव्हां असें अंतर असणारच पण तें अंतर बाल व तरुण यांमधील अंतराहून भिन्न नाहीं. तुमची कविता प्रसिद्ध झाल्यावर तिचा रसिकांकडून जो सत्कार होईल त्यावरून तुम्हांला आपल्या सामर्थ्याचा अंदाज बांधितां येईल."

" समकालीन समाजाचें अशा बाबतींतील मत कधीं कधीं चुकतें असें म्हणतात, तें खरें नाहीं कां ? "

" समाजाचे पूर्वग्रह, लेखकाचे वैयक्तिक गुणदोष, तत्कालीन परिस्थिति अशा अवांतर कारणांनीं समकालीन समाजाचें मत दूषित होत असतें ही गोष्ट खरी आहे. पण तें मत कधीं कधीं चुकत असलें तरी पुष्कळदां खरेंही असतें. कधीं कधीं मात्र चालू पिढीची अभिरुचि मागील किंवा पुढील पिढीपेक्षां बिघडलेली असण्याचा व यामुळें तिचें मतही चुकीचें असण्याचा संभव असतो तथापि समाजाच्या मताहून अचूक

कसोटी आपणापाशीं नसल्यामुळें आपणास त्यावरच निर्वाह करणें भाग पडतें. व्यक्तीच्यापेक्षां समाजाचें, एका देशातील समाजाच्यापेक्षां अनेक देशांतील समाजांचें व एका काळांतील समाजांच्यापेक्षां अनेक काळांतील समाजांचें मत निःसंशय ग्राह्य असते. पर देशस्थ रसिक इकडील पूर्वग्रहांपासून अलिप्त असल्यामुळें त्यांचें मत इकडील रसिकांच्यापेक्षां अधिक निःपक्षपातीपणाचें असतें पण त्यांस इकडील चालीरीतींची माहिती नसल्यामुळें पूर्ण रसास्वाद घेण्याची पात्रताही नसते म्हणून अन्य देशांतील मतापेक्षां अन्य काळांतील मतच या बाबतींत आदरणीय असतें जो ग्रंथ अनेक देशांच्या व अनेक कालांच्या कसोटीस उतरतो त्याचें महत्व देशकालांतीत समजावयास हरकत नाहीं. पण दुसऱ्या देशाचें मत दुष्प्राप्य व भविष्यकालीन मत अप्राप्य असल्यामुळें आपल्या देशांतील सद्यःकालीन समाजाचेंच मत अपणास मान्य धरून चाललें पाहिजे. तें मत जितक्या मोठ्या समाजाचें मिळेल तितकी त्या मताची किंमत अधिक हेंही ओघानेंच आलें. ज्या नियतकालीकाचा खप सर्वांत अधिक तेंच लेखाच्या प्रसिद्धीकरितां निवडावें हें बरें."

"ही कविता 'प्रकाशां' त देण्याला आपली कांहीं हरकत आहे का ?"

"मी ती मोठ्या आनदानें देईन. पण वृत्तपत्रांत येणारे लेख तात्पुरत्या महत्वाचे असतात. यामुळें काव्यासारखे वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचे लेख त्यांत येणें अनुचितही आहे व नुकसानीचेंही आहे. असे लेख मासिकांतच आले पाहिजेत. स्थानमाहात्म्यानें मासिकांतल्या गचाळ लेखालाही जें महत्त्व येतें तें वृत्तपत्रांतील रसाळ लेखालाही येत नाहीं. लोकांस वारंवार घडणाऱ्या चंद्रग्रहणापेक्षां एकाद्या वेळींच होणाऱ्या सूर्यग्रहणाचें महत्त्व साहजिकच अधिक वाटतें. त्याच न्यायानें रोज किंवा आठवड्यानें निघणाऱ्या वृत्तापत्रापेक्षां अधिक अंतरानें निघणारें मासिक किंवा त्रैमासिक अधिक योग्यतेचें वाटल्यास नवल नाहीं."

या वाक्यांत भासमान होणारी तीव्रता 'चंद्रिके' वरील रागामुळेंच उत्पन्न झाली आहे असा संशय 'बाई' स एक क्षणभर आल्यावांचून

राहिला नाहीं ती म्हणाली, " सर्वांत अधिक खप ' चद्रिका ' मासिकाचा आहे. तेव्हां त्याच मासिकांत कविता देणें इष्ट होईल, नाहीं ? "

" निःसशंय ' चद्रिकें ' त कविता छापविण्याच्या बाबतींत मला मदत करितां आली असती तर मी आनंदानें केली असती पण कांहीं कारणामुळें मला ती करतां येत नाहीं ही प्रसिद्ध होण्याला वशिल्याची मुळींच जरूर नाहीं ही समाधानाची गोष्ट आहे. "

" वशीला लागला तर तोही मिळण्यासारखा आहे. " इतकें बोलून ' बाई ' नें जीभ चावली.

" हरिहरराव आश्चर्यानें म्हणाले, " म्हणजे ? तुमची किंवा तुमच्या एकाद्या आप्ताची संपादकाशीं प्रत्यक्ष ओळख आहे कीं काय ? पण मी चुकलों. तुमच्या पूर्व चरित्राची चौकशी करावयाची नाहीं ही अट मला शब्दशः पाळिली पाहिजे. "

' बाई ' किंचित् हंसून म्हणाली, " कविता प्रसिद्ध करावयाची ती एकाद्या टोपणनांवानें करणेंच योग्य होईल, नाहीं ? "

" स्वतःचें नांव गांव माझ्यापासून गुप्त ठेवण्याची तुमची इच्छा आहे, तेव्हां तुम्हांला ती स्वतःच्या नांवानें प्रसिद्ध करितां येतच नाहीं. तुम्हांला एकादें टोपणनांवच घ्यावें लागेल. तें घेतांना कविता रचणारें माणूस पुरुष कीं स्त्री याचा वाचकांस पत्ता लागू नये अशी खबरदारी मात्र जरूर घ्यावी; म्हणजे तिजवर प्रकट होणारीं मतें केवळ स्त्रीदाक्षिण्यामुळें अनुकूल आलीं असें म्हणण्यास जागा रहाणार नाहीं. परीक्षेंत पुरुषजातीच्या उमेदवारांपेक्षां स्त्रीजातीचे उमेदवार अधिक यशस्वी होतात, यास स्त्रियांची नैसर्गिक बुद्धिमत्ता कारण होत असेल; पण त्याचें श्रेय मत्सरग्रस्त पुरुषांकडून तरी परीक्षकांच्या स्त्रीदाक्षिण्यास देण्यांत येतें. वाङ्मयाच्या बाबतींतही तोच प्रकार होण्याचा संभव आहे. पूर्व चरित्र गुप्त ठेवण्याची तुमची इच्छा नसती तर तुमच्या वडिलांच्या किंवा मातेच्या नांवाला ' अपत्य ' हा शब्द जोडून टोपणनांव तयार करण्याची मीं तुम्हांला शिफारस केली असती. माता, पिता, बंधु, मित्र यांवरून टोपणनांवें घेण्यांत त्यांजबद्दल आदर व्यक्त होऊन आपलें खरें नांव गुप्तही रहातें. "

" 'कौंतेय' या नांवावरून लेखकाची आई ' कुंती ' नांवाची होती असें अनुमान काढणें रास्त होईल का ? "

" मला वाटतें आपण हा विषयच सोडून द्यावा. तूर्त आपणास तुमच्याच टोपणनांवाशीं कर्तव्य आहे. "

हरिहरराव आपल्या प्रतिस्पर्ध्याचें नांवही न खपण्याइतके खुनशी असतील अशी ' बाई ' ची कल्पना नव्हती ती म्हणाली, " 'शरद्' हें टोपणनांव आपणास हवें तसें संदिग्ध स्वरूपाचें होईल नाहीं ? त्याचा अर्थ ' शरत्कुमार ' याप्रमाणें 'शरत्कुमारी' हा सुद्धा होईल. "

" पसंत ! अगदीं पूर्णपणें पसंत ! हा शरच्चंद्रिकायोग मनोहर व अपूर्व आहे खराच. "

' बाई ' कडून कविता निर्दोष होऊन ' चंद्रिके ' चे सपादक अमृतराव यांजकडे पाठविण्यांत आली, आणि चमत्काराची गोष्ट ही कीं, कवयित्री नवशिकी असतांही तिची कविता संपादकांनीं आढेवेढे न घेतां जशीची तशीच प्रसिद्ध केली. त्यानंतर तिजवर अनेक नियतकालिकांत प्रशंसात्मक अभिप्राय आले. पण खुद्द ' चंद्रिकें ' त ' कौंतेया ' चा जो पद्यात्मक अभिप्राय आला तो सर्वात खुबीदार व मार्मिक होता. त्यांत आरंभींच कविता स्त्रीनें लिहिलेली असली पाहिजे असें निश्चयात्मक विधान होतें. त्यापुढें अशा प्रेमळ मातेच्या कवितारूपी कन्या ज्याप्रमाणें सद्वृत्त, सद्गुणी व सरस निपजावयाच्या त्याप्रमाणें कन्यारूपी कविताही निपजावयाच्या हा सिद्धांत दिलेला असून " ईश्वर करो व कवयित्रीस उभयविध संतति विपुल होऊन तिच्या कीर्तिपरिमलानें आखिल महाराष्ट्रदेश भरून जावो " या अर्थाच्या वाक्यांनीं उपसहार केला होता. ' बाई ' नें कवितेबरोबर पाठविलेल्या पत्रावरून ती स्त्रीनेंच लिहिली असल्याचें ' चंद्रिके ' च्या सपादकांस ज्ञान झालें होतें. ' कौंतेया ' च्या अभिप्रायावरून तें ज्ञान त्यासही होतें हें उघड होऊन अमृतराव व ' कौंतेय ' हे एकच हें बहुजनसमाजाचें मतच तिला खरें वाटूं लागलें.

कविता निर्दोष होण्यास हरिहररावांच्या सूचनाच कारणीभूत झाल्या

होत्या. पण त्या सूचना ज्या विकारशून्य स्वरानें करण्यांत आल्या होत्या तो ‘ बाई ’ स ‘ कौंतेया ’ च्या अभिप्रायांत प्रतीत होणाऱ्या कळकळीच्या मानानें निर्दयपणाचा वाटूं लागला; व तिला ‘ कौंतेया ’ बद्दल कृतज्ञता जशी वाटूं लागली तसा हरिहररावांबद्दल एक प्रकारचा असंतोषही वाटूं लागला. त्या असंतोषाचें स्वरूप अजून ऋणात्मकच होतें. त्याला द्वेषाचें धनात्मक स्वरूप आलें नव्हतें.

---

## प्रकरण ५ वें

कवितालेखन आपणास कितपत साधतें याची अटकळ बांधल्यावर ‘ बाई ’ ने आपलें चित्त गद्यरचनेकडे वळविलें. तिनें दोन तीन महिने सारखा विचार करून एक कथानक तयार केलें, व पंधरा वीस दिवसात त्यावर एक लघुकथा लिहून काढिली. तिला कोणत्याही पुस्तकाचा आधार नसून तिचे भिन्न भिन्न भाग लेखिकेनें स्वतःच्याच चरित्रावरून घेतले होते. प्रत्येक लेखक आपल्या लेखाचें साहित्य जुळवितांना उसनवारीच करीत असतो, मग तो लेखक स्वयंप्रकाशी असो किंवा परप्रकाशित असो. पूर्वोक्त प्रकारच्या लेखकाची उसनवारी खुद्द निसर्गातून केलेली असते व उपरोक्त प्रकारच्या लेखकाची निसर्गाच्या चित्रांतून केलेली असते इतकाच काय तो दोघांमध्यें फरक असतो. पण तो फरक फार महत्त्वाचा असतो. कारण त्या फरकामुळेंच एकाच्या रचनेंत प्रत्यक्ष अनुभवाचें जिवंत पाणी झुळझुळतांना दिसतें व दुसऱ्याच्या रचनेंत शब्द परंपरेनें सांचलेल्या व हजारों जिवंत कृमींनीं बुजबुजलेल्या स्थिर पाण्याचें डबकें दिसतें. ‘ बाई ’ च्या कथेचा नायक एका मासिकाचा संपादक असून तो आपल्या संपादकीय लेखांशिवाय एका टोपणनांवानें आपल्याच मासिकांत सुंदर व ओजस्वी लेखहि लिहित असे. त्यानें टोपणनांवाखालीं लिहिलेले लेख नायिकेस इतके आवडले कीं, तिनें त्या अमूर्त लेखांवरून लेखकाची एक त्यांच्याइतकीच सुदर व तेजस्वी मूर्ति कल्पनेनें निर्माण केली, व ती त्या मूर्तीची नित्य नेमानें मानसपूजा करूं लागली.

कथेचा नायक व मासिकाचा संपादक स्वतः अत्यंत कुरूप होता. पण त्याची पत्नी अत्यंत सुरूप असून तिजपासून त्यास एक तिच्यासारखेंच मोहक बालक झालें होतें. दुर्दैवानें ती तारुण्यांतच कालवश झाली, व तिचें बालक उघडें पडलें. एके दिवशीं तें बापासह रस्त्यांतून जात असतां दोघांची चुकामूक झाली. तें कावरेंबावरें होऊन एकटेंच भटकत असतां नायिकेस सांपडलें, व त्यांचे तिनें प्रेमानें संगोपन केलें. कांहीं दिवसांनीं त्याचा पिता त्यास शोधीत तिच्या घरीं आला, व त्यास तिजकडून इत्थंभूत प्रकार कळला. त्यानें कृतज्ञतेनें तिला लग्नाची मागणी घातली, पण तिनें त्याचें वाईट रूप लक्षांत घेऊन ती झिटकारून टाकिली. त्यानें अव्हेराचें कारण विचारिलें असतां तिला आपलें मन पूर्वींच एका आज्ञात लेखकावर बसलेलें असल्याबद्दल त्यास सांगावें लागलें. तिजकडून त्याचें टोपणनांव कळतांच त्यानें तिला प्रश्न केला, "त्या सुंदर लेखांचा जनक माझ्याइतकाच कुरूप असला तरी सुद्धां तुम्ही त्याला माळ घालायला तयार आहांत का?" तिनें उत्तर दिलें, "अर्थात्च. प्रेम बाह्य रूपावर अवलंबून नसून अंतर्गत गुणांवर असतें." त्यानें तिला पुन्हां म्हटलें, "त्या सुंदर लेखांची माता म्हणजे अर्थातच त्या अज्ञात लेखकाची प्रतिमा सुंदर व सतेज होती म्हणूनच त्या लेखांस तसें रूप प्राप्त झालें; त्याप्रमाणेंच या बालकाची माता सुंदर होती म्हणूनच यास असें मोहक रूप प्राप्त झालें आहे. तुम्ही त्या लेखांकरितां त्यांच्या कुरूप जनकाचा स्वीकार करण्याला कबूल असाल तर या सुंदर बालकाकरितां माझा स्वीकार करण्याला काय हरकत आहे?" तिनें यावर "तुमच्या अंगीं अंतर्गत गुण नसून नुसतें वाईट रूप आहे." असें म्हटल्याबरोबर त्यानें आपणच अज्ञात लेखक असल्याबद्दल तिची खात्री केली आणि या रीतीनें स्वतःकरितां प्रथम पत्नीइतकीच सुंदर व बालकाकरितां त्याच्या मातेइतकीच प्रेमळ स्त्री संपादन केली. याप्रमाणें त्या गोष्टीचें तात्पर्य होतें.

'बाई' नें हरिहररावांस ही गोष्ट दाखविली तेव्हां तिच्यांत लेखिकेचें अंतरंग निर्मळ आरशांतल्याप्रमाणें स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेलें त्यांस दिसून आलें. तिचें प्रेम 'कौंतेया' वर बसलें असून शक्य

असल्यास त्याच्याशीं विवाहानें बद्ध होण्याचीही तिची तयारी आहे; आपणाबद्दलची तिची भावना नायकाचें व अज्ञात लेखकाचें तादात्म्य कळण्यापूर्वी नायिकेची नायकाबद्दल जी भावना होती तिच्याशीं सदृश आहे, तिला 'प्रीति' हें नांव देतां येणार नाहीं, आपले लेख तिला 'कौंतेया'च्या लेखांच्या मानानें हिणकस वाटतात, आपण तिला लग्नाची मागणी घातल्यास ती तिचा ताबडतोब धिक्कार करील; उलट पक्षीं 'कौंतेय' हें टोपणनांव धारण करणाऱ्या लेखकाचें खरें नांव कळेपर्यंत व तें कधींच न कळल्यास आमरण सुद्धां कौमार्यावस्थेंत रहाण्यास ती तयार आहे; हे विचार हरिहररावांच्या मनांत घोळत असता त्यांच्या चर्येवर गाढ उद्विग्नता पसरलेली दिसत होती.

ती 'बाई'च्या लक्ष्यांत येण्यास उशीर लागला नाहीं. तिनें आपल्या कथेंत स्वानुभव व कल्पना यांचा मिलाफ इतक्या चातुर्यानें केला होता कीं, त्यामधील साधा पूर्ण परिचयाच्या मनुष्यास सुद्धां सहसा उमगणें शक्य नव्हतें. कथाभागांतील कोणता भाग स्वचरित्रांतील व कोणता काल्पनिक याबद्दल हरिहररावांची दिशाभूल होईल अशी तिचीही अपेक्षा असल्यामुळें तिनें ती गोष्ट हरिहररावांच्या हातीं भीतभीतच दिली होती. आपली अपेक्षा अटकळीपलीकडे खरी ठरलेली पाहून तिला वाईट वाटलें. त्यांचें आपणावर निःस्सीम प्रेम आहे हें तिच्या निदर्शनास आज जसें स्पष्टपणें आलें तसें पूर्वी कधींही आलें नव्हतें. पण इतकें प्रेम असूनही उपयोग काय ? त्यांस ज्या दिवशीं आपलें पूर्वचरित्र कळेल त्या दिवशीं त्यांना आपलें प्रेम बाजूस ठेवून आपला त्यागच करावा लागेल; कदाचित् आपण आपलें खरें स्वरूप गुप्त ठेवून फसविल्याबद्दल त्यांना आपला तिटकाराही वाटेल. त्यापेक्षां आपलें प्रेम अन्य स्थळीं बसल्याबद्दल त्यांचा गैरसमज होऊन आजच त्यांचे डोळे उघडले तर त्यांत काय बिघडलें ? उलट ती इष्टापत्तिच आहे. अशा विचारांनीं तिनें आपल्या उदास मनाचें सांत्वन करून घेतलें.

हरिहररावांनीं आपल्या निराशेचा पहिला आवेश आवरून व अंगीं उसना शांतपणा आणून कृत्रिम गांभीर्यानें म्हटलें, "तुमच्या कवितेनें तुमचें जन्मसिद्ध कवित्व जसें निर्विवादपणें सिद्ध केलें तसें या गोष्टीनें

गद्यलेखक या दृष्टीनें असणारी तुमची योग्यता सिद्ध केली आहे. लेखकानें आपला लेख सजवितांना दुसऱ्याच्या उष्ट्या विचारांवर व कल्पनांवर भिस्त न ठेवतां स्वतःच्या अनुभवावर व कल्पनेवर ठेविली पाहिजे, या नियमाचें तुम्हांला बाळकडूच मिळाल्यासारखें दिसतें शास्त्रीय ग्रंथांत दुसऱ्याच्या वचनाचा दाखला देणें क्षम्य असतें, किंबहुना तसा दाखला दिल्यानें तशा ग्रंथाची योग्यता अधिक मानण्यांत येते. पण ललित वाङ्मय शास्त्रीय वाङ्मयाहून अगदीं भिन्न असल्यामुळें त्याची कसोटीहा निराळी असते. एखादी गोष्ट अनेकांच्या अनुभवास एकाच स्वरूपांत आली म्हणजे ती शास्त्रीय वाङ्मयांत नमूद केली जाते; व त्या एकरूप अनुभव आलेल्या इसमांच्या संख्येस महत्त्व येतें पण एकाद्या गोष्टीस ललित वाङ्मयांत स्थान मिळावयास तिचा प्रत्यक्ष अनुभव कथन करणाऱ्या व्यक्तीस इतर व्यक्तींच्या अनुभवांतल्यापेक्षां भिन्न स्वरूपांत आला असला पाहिजे शास्त्रीय ग्रथ वाचतांना वाचकांचें लक्ष्य सृष्टपदार्थांचें वास्तविक स्वरूप माहीत करून घेण्याकडे असतें, व ललित वाङ्मय वाचतांना त्यांचें लक्ष्य तें वाङ्मय निर्माण करणाऱ्या व्यक्तीच्या अतःस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून घेण्याकडे असतें अनेक व्यक्तीस समान असणाऱ्या अवलोकनानुमानादिसामर्थ्याच्या जोरावर एकाद्या वस्तूचें होणारें एकरूप ज्ञान शास्त्रीय वाङ्मयाचा आत्मा असतें, व त्यांस एकाच वस्तूचें कल्पकताशीलादिकांतील भेदांमुळें भिन्न स्वरूपांत होणारें ज्ञान ललित वाङ्मयाचा आत्मा असतें. शास्त्रीय वाङ्मयांत आढळणारें वैचित्र्य वस्तुविषयक असतें, व ललितवाङ्मयांत आढळणारें वैचित्र्य व्यक्तिविषयक असतें. शास्त्रीय व ललित वाङ्मयांमध्यें ज्ञानाच्या स्वरूपामध्यें जसा फरक असतो तसा वर्णनासंबंधानें सुद्धा असतो पूर्वोक्त वाङ्मयांत सृष्ट पदार्थांमधील संबंधांचें एकरूप वर्णन असतें, व उपरोक्त वाङ्मयांत सृष्टिसिद्ध किंवा काल्पनिक पदार्थांमधील सबंधाचें लेखकभेदानुसारें भिन्नभिन्न वर्णन असतें 'वैयक्तिक दृष्टीनें पाहिलेली व वर्णिलेली सृष्टि' असें ललित वाङ्मयाचें थोडक्यांत वर्णन करतां येईल. वाङ्मयांत उत्तमोत्तम म्हणून नावाजलेलीं पुस्तकें बहुधा कर्त्यांचीं सौंदर्यबुद्धीनें सुव्यवस्थित केलेलीं आत्मचरित्रेंच असतात असें म्हणावयास हरकत

नाहीं. याप्रमाणें ललित वाङ्मयांत व्यक्तीसच महत्त्व असल्यामुळें लेखनकलेंत एका व्यक्तीनें दुसरीचें सर्वस्वीं अनुकरण करणें कधींही शक्य व इष्ट नसतें. एका रंगाच्या चष्म्यांतून पहाणाऱ्या इसमानें दुसऱ्या रंगाचा चष्मा वापरणाऱ्या इसमाचा अनुभव उसना घेऊन समाजास सादर केला तर त्यांत आत्मप्रत्ययाचें तेज नसल्यामुळें तो समाजास मिळमिळीत वाटून त्याचा त्यावर कांहींच परिणाम होणार नाहीं. दुसऱ्या लेखकाचें अनुकरण करूं पाहणाऱ्या लेखकास त्याच्या गुणांचें अनुकरण त्यांस सहसा साधत नाहीं. साधलेंच तर बाह्य गुणांचें मात्र साधतें, गूढ गुणांचें साधत नाहीं. ज्या लेखकाच्या लेखनकलेचीं सारीं अंगें अनुकरणसुलभ असतात त्यांत अनुकरणीय असें कांहींच नसतें असें खुशाल समजावें. जो लेखक दुसऱ्याची बेमालूम नक्कल केल्याची बढाई मारतो तो व त्यानें कित्त्यादाखल पुढें ठेवलेला लेखक असे दोघेही बहुधा सारखेच निर्गुण व मिळमिळीत असतात."

हरिहररावांस आपली तीव्र निराशा मनांतल्या मनांत दाबून ठेवण्यास इतकी दीर्घ प्रस्तावना दडपण म्हणून जरूरच होती. त्यांनीं वरील विचार व्यक्त केल्यावर त्यांच्या चित्तास व स्वरास बरेंच स्थैर्य आलें, आणि 'बाई' च्या गोष्टींतील ज्या कथासूत्रांनीं त्यांच्या हृदयास अकल्पित रीतीनें हलवून व्यग्र केलें होतें त्यांचा अक्षुब्ध चित्तानें विचार करण्याची त्यांची तयारी झाली इतक्यांत 'बाई' नें मोठ्या ग्रंथकारांच्या अनुकरणानें होतकरू लेखकांस जर अनिष्ट वळण लागतें तर त्यांचें अध्ययन करण्याची शिफारस कां करण्यांत येते?" असा प्रश्न विचारला, त्यास उत्तर द्यावें लागल्यामुळें त्यांच्या चित्तस्थैर्याचा खुंटा हलवून बळकट केल्यासारखा झाला. ते म्हणाले "कोणाही ग्रंथकाराचें बुद्धिपूर्वक व सर्वस्वीं अनुकरण करणें गैर असतें एवढाच माझ्या म्हणण्याचा भावार्थ होता. नकळत व अंशतः अनुकरण सर्वच ग्रंथकारांकडून होत असतें. होतकरू लेखकाची जी विशिष्ट मनोरचना असते तिच्याशीं सर्वस्वीं जुळण्यासारखी मनोघटना जरी एकाही प्रसिद्ध ग्रंथकाराची सांपडली नाहीं तरी तिच्याशीं अंशतः जुळणाऱ्या मनोघटना अनेक ग्रंथकारांच्या सांपडतील. त्या ग्रंथकारांचे ग्रंथ वाचनांत आल्यास

मनाच्या भिन्नभिन्न अंगांचें पोषण भिन्नभिन्न ग्रथांकडून होतें, व त्याच्या वैशिष्ट्याचा विकास होतो. अशा ग्रंथांतील जे गुण मनाच्या वैशिष्ट्यास पोषक असतात त्यांचा त्याजकडून स्वीकार होतो व इतरांचा त्याग होतो. याप्रमाणें विशिष्ट मनोरचना तयार झाली म्हणजे तिला कल्पनारूप किंवा शब्दरूप रचनेचा कोणता प्रकार झेपण्यासारखा आहे व कोणता नाहीं, कोणता साधण्यासारखा आहे व कोणता नाहीं याचा अंदाज काढण्याकरितां अनेक रचना प्रकारांवर आपली बुद्धि चालवून पाहिली पाहिजे. मनोरचनेस प्रतिकूल अशा रचनाप्रकारांत डांबून टाकिल्यामुळें चांगल्या लेखनकौशल्याची व लेखनसामर्थ्याची माती झाली आहे. ज्याप्रमाणें उत्तम गणकास रणांगणावर सोडिलें असतां त्याचा शेंदाडशिपाई बनतो व रणशूर वीरास रंगभूमीवर सोडिलें असतां त्याचा दिवाभीत सोंगाड्या बनतो त्याप्रमाणें रचनाप्रकाराच्या अयोग्य निवडीमुळें उत्तम गद्यग्रंथकार अधम कवि ठरतो, उत्कृष्ट कादंबरीकार निकृष्ट नाटककार ठरतो व उच्च प्रतीचा इतिहासकार हीन प्रतीचा निबंधलेखक ठरतो. योग्य रचनाप्रकाराची निवड वाङ्मयसंसाराच्या आरंभींच झाल्यास कालाचा व उत्साहाचा वृथा व्यय होत नाहीं तुम्हीं काव्य व कथा या दोन प्रमुख प्रकारांशीं तुमची मनोरचना कितपत जुळण्यासारखी आहे हें अजमावून पहाण्यांत वेळ दवडला नाहीं हें चांगलें झालें. याप्रमाणेंच नाटक, निबंध, इतिहास इत्यादि रचनांचें व तुमच्या मनोरचनेचें गणगोत कितीसें जुळतें हें पाहिलें पाहिजे, आणि ज्या रचनेशीं तें सर्वांत अधिक जुळेल तिला मुख्य व्यवसाय ठरवून बाकीच्या रचनांचा त्यांच्या कमीअधिक जुळतेपणाच्या मानानें फावल्या वेळीं कमीअधिक परामर्श घेतला पाहिजे.पण भिन्न भिन्न रचनाप्रकारांतून स्वतःस योग्य प्रकार निवडून काढण्यापूर्वी त्या रचनांचें सूक्ष्म ज्ञान झालें पाहिजे, व तें वाचनानेंच साध्य असतें. याप्रमाणें रचनाप्रकाराची निवड करण्याच्या कामीं जरी वाचनाची मदत झाली तरी ग्रंथाचें कच्चें साहित्य गोळा करण्याकरितां तुम्हांला सृष्टीच्या, व्यवहाराच्या व मनुष्य स्वभावाच्या अवलोकनावरच भिस्त ठेविली पाहिजे. अवलोकनाचें क्षेत्र जितकें विस्तृत आणि तें अवलोकन जितकें एकाग्र, दीर्घ व मार्मिक

तितकें अधिक वैचित्र्य व सत्य तुमच्या रचनेंत दिसून येईल. वैचित्र्य हें सौंदर्याचेंच दुसरें नांव आहे. सौंदर्यानें मनाच्या भावनात्मक अंगाचें व सत्यानें त्याच्या बौद्धिक अंगाचें पूर्ण समाधान होऊन त्यास आनंद होतो, आणि आनंद हेंच ललित वाङ्मयाचें साध्य असतें. पण आनंदाचा पूर्णावस्थेंत लाभ होण्यास मनाच्या नैतिक अंगाचेंहि समाधान झालें पाहिजे सौन्दर्यप्रतीति, सत्यप्रतीति व कर्तव्यप्रतीति झाल्या-शिवाय रसिकास काव्यानंदाचा खरा आस्वाद मिळत नाहीं, या सत्याचें ज्ञान तुम्हांला व्यक्त रूपानें जरी झालें नसलें तरी अव्यक्त रूपानें तें तुमच्या मनावर ठसलें असून या गोष्टींत वठलेंही आहे. मनुष्यानें आपली दृष्टि रूपाच्या सौंदर्याकडे न ठेवितां गुणांच्या सौन्दर्याकडेच ठेविली पाहिजे हा नीतिबोध या कथेचा पायाच आहे, व तो रसिकांना पूर्णपणें पटण्यासारखा आहे. पत्नी व प्रतिभा यांमधील सादृश्य, पत्नी व बालक या जोडीचें मूर्त सौन्दर्य आणि प्रतिभा व काव्य या जोडीचें अमूर्त सौन्दर्य यांमधील साम्य आणि त्यांचें सौन्दर्य व नायकाचें वाईटरूप यांमधील विरोध हीं चमत्कृतिजनक व अर्थात्‌च आल्हादजनक आहेत. नायिकेची अज्ञात लेखकावरील भक्ति व बालकासंबधाचें वात्सल्य यांचें वर्णन इतकें हुबे-हुब साधलें आहे कीं, त्यांचा लेखिकेस प्रत्यक्ष परिचय झाला असला पाहिजे. तुम्हांला 'कौन्तेया' बद्दल वाटणारा आदर त्या भक्तींत व बाबूबद्दल वाटणारें प्रेम त्या वात्सल्यांत प्रतिबिंबित झालें आहे. बालका-वर अ लेला प्रसंग बाबूवरच आला आहे कीं काय असें क्षणभर वाटून मी त्या प्रसंगाच्या वर्णनाशीं तन्मय होऊन गेलों. बालकाची माता गत झाली असून त्याचें संगोपन नायिकेकडून होतें यावरून त्याच्या पित्याची कल्पना तुम्हांस मजवरूनच सुचलेली दिसते. त्याचें रूप तुम्हीं हिडिस दाखविलें आहे, तें लाक्षणिक अर्थानें तुम्हांस खरें वाटत असलें पाहिजे. माझें रूप हिडिस नसलें तरी आचरण कधीं कधीं हिडिस वाटण्यासारखें होतें हें मला प्रांजलपणें कबुल केलें पाहिजे. तुम्हांस तुमच्या कवितेंतील दोष दाखवितांना मला तुमच्या कल्याणा-करितां वाजवीपेक्षां जरा अधिक कठोरपणा दाखवावा लागला. त्याची 'कौंतेया' च्या प्रशंसेशीं तुलना होऊन तो तुम्हांला केवळ निर्दयपणा-

चाच वाटला असला पाहिजे. पण त्या कठोरपणाच्या मुळाशीं तुम्हां-बद्दलची कळकळ होती; व तुम्हांबद्दल मला जी कळकळ वाटते तिचा शतांशही ' कौंतेया ' स वाटणें शक्य नाहीं. मला ' कौंतेया ' बद्दल एक प्रकारचा मत्सर वाटू लागला आहे हें मला कबुल केलें पाहिजे. बाकी बालकाचा पिता व अज्ञात लेखक एकच असें कल्पून तुम्हीं मज-बद्दल वाटणाऱ्या रोषाचें केलेलें गोपन अत्यंत चातुर्याचें आहे यांत संशय नाहीं. चांगल्या कलेचा एक नमुना या दृष्टीनेंही त्याचें महत्त्व आहेच. व्यवहारांत घडलेल्या गोष्टी जशाच्या तशाच वाचकांपुढें मांडिल्या तर त्यांत सत्याची प्रतीति होईल, पण सौंदर्याची होणार नाहीं. म्हणून उत्तम कसबी ग्रंथकार त्यांची सांगड घालण्याकरितां अनु-भवाच्या जोडीस कल्पनेचें साहाय्य घेत असतात; व तुम्हीही त्याच युक्तीचा अवलंब केला आहे."

"मीं अनुभवाचा व कल्पनेचा उपयोग कोठेंकोठें केला आहे. याचें आपण केलेलें अनुमान चुकल्यामुळें आपला मजबद्दल कांहीं बाबतींत गैरसमज झाला आहे मला ' कौंतेया ' बद्दल जसा आदर वाटतो तसा आपणां-बद्दलही वाटतो उभयतांबद्दल वाटणारा आदर एकाच स्वरूपाचा आहे. उभयतांचें तादात्म्य मीं कल्पनेच्या साह्यानें घडविलें व उभयतांबद्दलच्या माझ्या भावातील विरोध मात्र काल्पनिक नसून वास्तविक आहे असा समज आपण कां करून घ्यावा? माझा आपल्या गुरूबद्दल सद्भाव नाहीं असें होईल तरी कसें ?"

"तुमचा मजबद्दल सद्भाव असला तर तें स्वाभाविक आहे.पण 'कौंतेया' बद्दल कां असावा हें एक मला मोठेंच गूढ पडलें आहे. निनांवी पत्र खासगी रीतीनें आलें तर त्याच्या लेखकाबद्दल तिटकारा वाटावा, पण एकाद्या लेखकानें खोटेंच नांव घेऊन आपले लेख जाहीर रीतीनें प्रसिद्ध केले तर मात्र त्याबद्दल आदर वाटावा हा मनुष्यस्वभावांतल्या विसंग-तपणाचाच एक मासला म्हटला पाहिजे."

" 'कौंतेया 'च्या लेखांस जो न्याय लागूं करावयाचा तो माझ्या कवितेसही लागूं करितां येणार नाहीं का ?"

" तुमची अजून नवशिक्या लेखकांत गणना आहे. आत्मविश्वासाचा अभाव व आपल्या कृतीचा रसिकाकडून कसा स्वीकार होतो याबद्दलची भीति हींच तुमच्या टोपणनांवाच्या मुळाशीं आहेत. दहा वर्षें लोक-प्रियतेचा मनमुराद व अबाधित आस्वाद चाखलेल्या वृद्ध कपीस मुग्ध बालेचा संकोच व भीरुता वाटण्याचें कारण नाहीं."

'वृद्ध कपि' हे शब्द 'बाई' स फाजील कठोर वाटले. कथेंतील बालकाच्या पित्यास कुरूप बनविल्याबद्दल 'वड्याचें तेल वांग्यावर' या मासल्याचा तो सूड असावा असे तिला वाटलें. ती म्हणाली, "लोकप्रियतेचा कंटाळा व उपजत भिडस्तपणा यांतही या गोपनबुद्धीचा उगम सांपडण्यासारखा आहे."

" मोठा निरपेक्ष व वैराग्यशील साधुपुरुषच कीं नाहीं तो! इतका दीर्घ काल आपल्या रहस्याचें दक्षतेनें रक्षण करण्याचा हेतु मला तर निव्वळ स्वार्थीपणाचा दिसतो."

" अगदीं अशक्य! यांत त्या बापड्याचा काय स्वार्थ साधणार?"

" तुम्हांस अजून लेखनव्यवसायाचा अनुभव नाहीं म्हणून तुम्हीं असें म्हणतां. अशा बुरखेवाल्या लेखकांस त्यांच्या प्रच्छन्नतेपासून अनेक लाभ होतात. प्रत्येक लेखकास त्याच्या लेखांमुळें एक प्रकारचें बंधन उत्पन्न होत असतें. त्यास एका लेखांत लिहिलेल्या मजकुराच्या विरुद्ध मजकूर दुसऱ्या लेखांत लिहितां येत नाहीं, किंवा मुखानें उच्चारतां येत नाहीं. त्यास लेखांत प्रतिपादिलेल्या तत्त्वांशीं विसंगत असें आचरण करितां येत नाहीं. पण टोपणनांवाचा उपयोग करणारा लेखक व्यवहारांत वागणारी व टोपणनांवाखालीं येणाऱ्या लेखांच्या द्वारें आपलें अस्तित्व जाहीर करणारी अशा दोन व्यक्ति पृथक् ठेवीत असल्यामुळें पहिलीच्या उद्गारलेखवर्तनांचें दुसरीच्या लेखांस व दुसरीच्या लेखांचें पहिलीच्या उद्गारलेखवर्तनांस कांहींच नियंत्रण रहात नाहीं. खऱ्या नांवानें ज्या मताचें लेखनव्याख्यानद्वारा मंडन करावयाचें त्याच मताचें टोपणनांवाखालीं खुशाल खंडन करावें. टोपणनांवाखालीं जीं उदात्त तत्त्वें प्रतिपादावीं त्यांच्याच उलट वर्तन व्यवहारांत बिनधोक करावें. क्षणापूर्वी

ज्या हातानें टोपणनांवाखालीं प्रसिद्ध करावयाचा हुड्याच्या चालीस प्रतिकूल असलेला लेख लिहिला त्याच हातानें त्या चालीचें समर्थन करणारा लेख लिहून लागलीच लेखाशीं वर्तनाचा मेळ दाखविण्याकरितां हुंडा घेण्यास तोच हात पुढें करितांना अशा लेखकास लाज वाटण्याचें कांहींच कारण नसतें. टोपणनांवाखालीं सरकारवर झणझणीत टीका करावी आणि खऱ्या नांवानिशीं सरकारचे गोडवे गावे व साधल्यास एकादी पदवीही मिळवावी! स्वतःचें भाषण, लेखन व वर्तन यांमध्यें मेळ ठेवण्याची सामान्य लेखकावर जशी जबाबदारी असते तशी टोपणनांवाखालीं दडणाऱ्या लेखकावर नसते हा त्यास होणारा पहिला लाभ होय. पूर्वोक्त प्रकारच्या लेखकास टीकाकाराचें भय बाळगावें लागतें तें उत्तरोक्त प्रकारच्या लेखकास बाळगावें लागत नाहीं हा त्यास होणारा दुसरा फायदा होय. त्यानें आपल्या शत्रूवर गुप्तपणें कितीही हल्ले चढविले तरी त्यांजकडून प्रतिकारार्थ होणाऱ्या उलट माऱ्यांपासून त्याचें खरें नांव सुरक्षित असतें. त्यानें दुसऱ्यांच्या नांवांना कितीही डांबर फांसलें तरी त्याचें खरें नांव निष्कलकच रहातें. यामुळें एक प्रकारची बेजबाबदारी उत्पन होऊन दुसऱ्याची अब्रू त्यास पायचेंडूप्रमाणें लाथेनें वाटेल तेव्हां वाटेल तशी तुडविण्यालायक वस्तु वाटते. कांहीं देशांत तर खोट्या नांवांनीं किंवा निनांवी लेख लिहिण्याविरुद्ध कायदे झाले आहेत. ”

‘ कौंतेया ’च्या टीकेनें पेटविलेला द्वेषाग्नि हरिहररावांच्या हृदयांत अजून किती खुनशीपणानें धुमसत आहे हें या वाक्यांवरून ‘ बाई ’ स स्पष्टच झालें. तिला हरिहररावांची कींव आली. पण ‘ कौंतेया ’च्या बाबतींत होणारा अन्यायही तिला सहन करवेना. तथापि ती तशीच मूग गिळून बसली. हरिहररावांचें भाषण पुढें चालू झालें. ते म्हणाले, “या चोरट्या लेखकांना त्यांच्या चौर्यकर्मापासून तिसराही एक लाभ होत असतो. ‘अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टीं’तील हरून अलरशीद खलीपास गुप्तपणें संचार करितांना प्रजेचें स्वतःबद्दल असलेलें खरें मत ऐकावयाला मिळे त्याप्रमाणें या लेखकांस स्वतःची प्रशंसा निःसंकोच वृत्तीनें ऐकण्याचें सुख मिळतें.ती प्रशंसा त्यांच्या तोंडादेखत जरी चालत असली

तरी तोंडदेखली नसते. चोरून ऐकणाऱ्या माणसास नेहमीं स्वनिंदाच ऐकण्याची पाळी येते, या विधानास हे प्रच्छन्न लेखक अपवाद असतात. त्यांनीं आपलें नांव प्रकट केलें असतें तर त्यांजभोंवतीं तोंडपुज्यांचा घोळका जमून त्यानें त्यांचे कान स्तुतीनें किटविले असते; पण त्यांस अशा स्तुतीची वाजवी किंमत माहीत असल्यामुळें तिजपासून मुळींच सुख झालें नसतें. उलटपक्षीं बुरख्यांतून त्यांस त्यांच्या विनोदपर लेखांनीं वाचकाच्या ओंठावर एकादें स्मित जरी झळकतांना दिसलें तरी तें तोंडपुज्यांच्या प्रचंड हास्यध्वनीपेक्षां व त्यांच्या करुणरसात्मक लेखांनीं वाचकाच्या डोळयांत एकादा अश्रु जरी उभा राहिलेला दिसला तरी तो तोंडपुज्यांच्या शोककल्लोलापेक्षां आनंद देतो. कीर्तीचा त्रास व दगदग उजळ माथ्यानें लेखन करणाराच्या वांट्यास जाऊन सौख्य मात्र बुरखेवाल्याच्या वाट्यांस जातें कल्पित नांवांमागें तोंडें लपविणाऱ्या या लेखकाना होणारा चवथा लाभ म्हटला म्हणजे त्यांच्या प्रच्छन्नपणामुळें त्यांच्या लेखास वाजवीपेक्षां अधिक महत्त्व येतें हा होय. जी गोष्ट उघडपणें झाल्यास उपेक्षणीय वाटते तिचा रहस्याशीं संबध जडला म्हणजे तीच माननीय वाटूं लागते. याचें अगदी साधें उदाहरण म्हटलें म्हणजे लाजेनें एका बाजूस फिरविलेल्या मुखाच्या चित्ताकर्षकत्वांत त्या कृतीनें जी भर पडते तिचें देतां येईल. मुख बुरख्याआड लपलेलें असलें म्हणजे तर त्याच्या रमणीयतेंत विलक्षणच भर पडते. एकादी सुंदर स्त्री रस्त्यानें उघड्या माथ्यानें जाताना जितकें लक्ष्य वेधिते त्यापेक्षां शतपट अधिक लक्ष्य बुरखेवाली स्त्री वेधिते. इतकेंच नाहीं, तर तिचा बुरख्याआड असलेला चेहरा कुरूप असला तरी तो पूर्वोक्त स्त्रीच्यापेक्षां सुदर वाटावयास लागतो. वास्तविक सौंदर्य कितीही उज्ज्वल असलें तरी तें काल्पनिक सौंदर्यापुढें फिकेंच पडणार. बुरखा अवगुंठित चेहऱ्यास लपवीत असला तरी त्याच्या तेजानें प्रेक्षकांच्या डोळयांस दिपवीत असतो, याचें कारण तें तेज वास्तविकपणें प्रेक्षकांच्याच कल्पनेनें निर्मिलेल्या चित्राचें असून त्याचा आरोप त्याच कल्पनेकडून बुरख्याच्या अंधारांत दडलेल्या कुरूप चेहऱ्यावर करण्यांत येतो हें होय. असाच प्रकार कपाळावर टोपणनांवाचें

नकली पिंपळपान मिरविणाऱ्या लेखांचा असतो. जे लेख केराच्या टोपलींत पडावयाच्या लायकीचे असतात त्यांच्या कपाळावर टोपण-नांवाची पाटी लटकावून दिली कीं ते वाचकांस शिरोधार्य वाटावयास लागतात. केवळ वाचकांच्या जिज्ञासेनें लायकीचा मुलामा चढवि-लेल्या या नालायक लेखांचा जनक कोण आहे याचा वाचकांकडून शोध सुरू होतो; व तो शोध जितका जितका निष्फळ तितका तितका त्या नकली लेखांवर उजळा चढत जातो. मुखाचें अवगुंठन सौंदर्यास दृष्ट लागूं नये म्हणून झालें आहे कीं विद्रूपपणा दृष्टीस पडूं नये म्हणून झालें आहे याचा विचार प्रेक्षक ज्याप्रमाणें करीत नाहीं त्याप्रमाणें वाचकही लेखकानें टोपणनांव आपलें महत्त्व लपविण्यासाठीं घेतलें आहे कीं, वाढविण्यासाठीं याचा विचार करीत नाहीं. "

" 'कौंतेया'चे लेख तरी या सदरांत येत नाहींत ना ?"

" न यावयाला काय झालें ? ते लेख अगदींच गचाळ नाहीत हें खरें आहे. पण त्यांची योग्यता सुशिक्षित समाजाकडून मानण्यांत येते तिजपेक्षां पुष्कळ कमी आहे हेंही तितकेंच खरें आहे ते लेख विषय, मांडणी, विवरण इत्यादि बऱ्याच बाबतींत माझ्या लेखाहून भिन्न असल्यामुळें त्यांची योग्यता पारखण्याची योग्यता माझ्या अगीं नसण्याचा संभव आहे. पण माझें मत द्यावेंच लागलें तर तें मला त्यांस प्रतिकूलच द्यावें लागेल. 'कौंतेया'च्या लेखांस लेखकाच्या प्रच्छन्नतेनें आलेला तजेला दृष्टीआड केला तर ते लेख माझ्या लेखांसा-रखे सामान्यच ठरतील. त्यांतील बखरींच्या भाषेच्या वळणाची जुन्या धर्तीची भाषा मला कृत्रिम वाटते, व त्यांतील आवेश तर मला राणा-भीमदेवी थाटाचा वाटतो. असें असतां त्याच्या लेखसंग्रहाच्या प्रती हजारांनीं विकतात तर माझ्या दहांनींही विकत नाहींत. याचें कारण त्याच्या लेखांभोवतीं असलेल्या रहस्याच्या तेजोवलयावांचून दुसरें कोणतें असूं शकणार ?"

येथें तर मत्सराची व द्वेषाची परमावधिच झाली. स्वतःचे लेख उत्तम असतां त्यांस सामान्य म्हणणें हें विनयाचें लक्षण असेल. पण

त्या लेखांबरोबर ' कौंतेया ' च्या लेखांनाही गुरफटून 'सामान्य' ठरवूं पहाणें निव्वळ अधम वृत्तीचें निदर्शक होतें. ' बाई ' ला हा अन्याय सहन झाला नाहीं. ती तडफेनें म्हणाली, " आपणांस आज सद्गुण-संपन्न वस्तूचेही गुण दिसत नाहींत; निर्दोष वस्तूचे दोष मात्र दिसतात. ' कौंतेयां ' च्या बाजूनें असें म्हणतां येणार नाहीं का कीं, आपल्या झणझणीत लेखांच्या जोरावर आपल्या खऱ्या नांवानें समाजापुढें येऊन अत्यंत लोकप्रियता मिळविण्याचें सामर्थ्य अंगीं असतां त्या लोकप्रियतेवर लाथ मारून अज्ञातवास पत्करण्यांत त्यांची निरपेक्षताच दिसून येते ! या लेखांनीं त्यांजवर पुढें मागें कारागृहवासाचीही आपत्ति येण्यासारखी आहे. "

"ती आली तर मीही त्याजवर केलेला स्वार्थीपणाचा आरोप परत घेईन. पण ती येईपर्यंत तरी ती येण्याचा संभव न दिसल्यामुळेंच तो असे जळजळीत लेख लिहीत आहे असें मी समजेन." हें बोलतांना हरिहररावांच्या डोळ्यांसमोर 'कौंतेया' च्या बधनाचें चित्र उभें राहिलें असून त्यानें त्यांस पोटांतून आनंदाच्या उकळया फुटत असाव्या असें त्यांच्या खुललेल्या चर्येवरून दिसत होतें त्यांजबद्दल आपला आजपर्यंत झालेला अनुकूल ग्रह चुकीचा होता अशी ' बाई ' ची खात्री झाली. तिला त्यांचा अगदीं वीट आला. या 'धेनुमुखी व्याघ्रा'च्या सौम्य मुद्रेवर, या 'मधुमुख विषघटा'च्या गोड भाषणावर विश्वास ठेवून आपण पूर्णपणें फसलों असें तिला वाटलें. सरकारदरबारीं असलेल्या वजनाच्या जोरावर हरिहरराव 'कौंतेया' स कैदेंत घालायलाही कमी करणार नाहींत याबद्दल तिची खात्री झाली तथापि त्यांच्या अधमपणाचा आणखीही ठाव पहाण्याच्या हेतूनें ती म्हणाली, "चोरट्या लेखकांस लागूं पडणारें विधान गुप्त दान करणारांसही लावावयाचें कीं काय !"

" त्यांचा तसें दान करण्यांत मुख्य हेतु परमार्थरूपी स्वार्थच साधावयाचा असतो. तें दान समाजापासून जरी गुप्त राहिलें तरी ज्या परमेश्वरास प्रसन्न करण्याच्या हेतूनें तें हातून घडतें त्यास तें कळून त्याजकडे रुजूही होतें. पण या पारमार्थिक स्वार्थाशिवाय छुप्या लेखकांच्याप्रमाणें ऐहिक

स्वार्थही त्यांना साधावयाचा असतोच. पोकळ नांवांखालीं लिहिणारांना जशी आपली प्रशंसा उजळ माथ्यानें ऐकावयास सांपडते तशी यांनाही सांपडते, त्यांच्या लेखांना जसें नामरहस्यामुळें फाजील महत्त्व येतें तसें यांच्या दानांनाही येतें. 'चंद्रिके'चे संपादक अमृतराव कुलकर्णी यांच्यामार्फत 'दीनकिंकर' या नांवानें जो अज्ञात दाता स्त्रियांकरितां व अस्पृश्यांकरितां ठेविलेल्या शिष्यवृत्तींत आपली संपत्ति खर्च करीत असतो त्याचा एवढा बोलबाला होण्याचें कारण त्याच्या दानाचा गुप्तपणाच. उघड रीतीनें लाखों करोडों रुपयांची दौलत परोपकारांत खर्च करणारे हरीचे लाल देशांत थोडे का आहेत? पण त्यांचें कौतुक न होतां दरमहा वीस वीस पचवीस पंचवीस रुपयांच्या आठदहा शिष्यवृत्ति ठेवणाऱ्या 'दीनकिंकरा'चें मात्र सपादून कौतुक होतें. अशा गुप्त दानांवर किंवा गुप्त लेखांवर हक्क सांगणारा एकादा तोतया निघून खऱ्या दात्याच्या किंवा लेखकाच्या वांट्याच्या कीर्तीचा सर्वस्वीं अपहार करितो तेव्हां मात्र त्याचे डोळे उघडतात, आणि त्यास आपलें नांव प्रकट करणें भाग पडतें. कधीं कधीं बेअब्रू करणाऱ्या किंवा राजद्रोही लेखांबद्दल फौजदारी खटले उपस्थित होतात तेव्हांही अशा चोरावरील मोरांना आपलीं उसनीं पिसें फेंकून द्यावीं लागतात. कारण चरायला मी आणि मरायला तूं हा जगाचा नियमच आहे. गुप्त दानांच्या बाबतींत मात्र फौजदारी मोकदम्याची भीति नसल्यामुळें तोतयेगिरी अखेरपर्यंत पचावयाला हरकत नसते."

"सुदैवानें 'कौंतेया'च्या लेखांच्या किंवा 'दीनकिंकरा'च्या दानाच्या बाबतींत तरी तसें होण्याचा संभव नाहीं. कारण दोघांनींही आपलीं रहस्यें अमृतरावांच्या स्वाधीन केलीं आहेत; व त्यांनीं त्यांचें रक्षण आजपर्यंत किती विश्वासुकपणानें केलें आहे हें जगजाहीरच आहे."

"त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल दोन मतें असण्याचा संभव नाहीं. पण या प्रामाणिकपणाचा परिणाम असा झाला कीं त्या लेखांचें व दानाचें श्रेय कांहीं लोकांकडून तरी अमृतरावांकडेच देण्यांत येतें."

"लोकांचा तो समज खराही असण्याचा संभव आहे. लेखांच्या

बाबतींत तरी तो खरा असल्याबद्दल मला प्रत्यंतर मिळालें आहे. मं पाठविलेली कविता कवीची नसून कवयित्रीची आहे हें एकट्या अमृत रावांसच माहीत असतां 'कौन्तेय' त्या गोष्टीचा निश्चयात्मक रीतीं निर्देश करितात यावरून तो समजच खरा असावा असें मला वा लागलें आहे,"

"'कौंतेया'नें कवितेच्या विषयावरून व भाषेवरून असें अनुमा बांधिलें असल्याचाही संभव आहे. शिवाय त्या समजाच्या विरुद्धहं समज कांहीं लोकांचा आहे. यांपैकीं खरा कोणता व खोटा कोणत याचा निवाडा अमृतरावांवर खटला झाल्याशिवाय होणार नाहीं."

हरिहररावांच्या आजच्या हिडिस मनमोकळेपणापेक्षां साधुत्वा ढोंगही पुरवलें असें 'बाई'स वाटलें. त्यांनीं आपल्या कृष्ण हृदया आज प्रदर्शनच मांडिलें होतें. अमृतरावांच्या व 'कौंतेया'च्या स्वात त्र्यावर तिलांजलि देण्याला ते आज एका पायावर तयार असलेले दिसले ती कांहींशा उत्तेजित स्वरानें म्हणाली, "आज आपली बिचाऱ्या अमृत रावांवर व त्यांशीं संबंध ठेवणाऱ्या प्रत्येकावर फारच अवकृपा झाल्या सारखी दिसते. अमृतरावांवर खटला झाला तर ते आपला बचा करण्याकरितां 'कौंतेया'ला बळी देतील अशी आपली कल्पना आहे का ?"

"अशी कल्पना करण्याइतकें माझें अमृतरावांबद्दल मुळींच नीच म नाहीं. ते अत्यंत थोर गृहस्थ आहेत. पण त्या प्रसंगीं 'कौंतेय आपल्या कृत्याची जबाबदारी घेण्याकरितां पुढें न येतां अमृतरावां तुरुंगांत खितपत ठेवील असें मानणें म्हणे 'कौंतेया'वर नीचपणाच आरोप करण्यासारखें होणार आहे, व तो आरोप तुम्हांला तरी सह होणार नाहीं असा माझा समज आहे."

या भाषणानें 'बाई'चा राग बराच शांत झाल्यासारखा दिसला ती सौम्य स्वरानें म्हणाली, "आज आपण 'कौतेयां'च्या पश्चा त्यांची जी मनसोक्त निंदा केली ती आपल्या नेहमींच्या न्याय्य वर्तना सोडूनच झाली असें नाहीं का आपणांला वाटत ? टोपणनांवाचा बुरख घेऊन गुप्त वार करण्याचा आरोप करितांना तरी तशी चूक आपल्य हातून न होऊं देण्याबद्दल विशेष खबरदारी घ्यावयाला नको का ?"

"आरोपीच्या समोर आरोप ठेविला काय आणि त्याच्या वकिलाच्या समोर ठेविला काय, एकच. असा बुद्धिमान् व कळकळीचा वकील मिळण्यासारखा असेल तर तेवढ्याकरितां सुद्धां गुन्हा करण्यास माझी तयारी आहे. मी तर 'कौंतेया' चा याबद्दल मनापासून हेवा करितों!"

या भाषणानें उभयपक्षांत तात्पुरता तह होऊन तें विकोपास जाऊं पाहणारें प्रकरण कांहीं दिवसांकरितां तरी निकालांत निघालें.

---

# प्रकरण ६ वें

गोष्टीसंबंधानें हरिहररावांनीं केलेल्या किरकोळ सूचना अमलांत आल्यावर ती 'चंद्रिके' कडे एका नवीनच टोपणनांवाखालीं पाठविण्यांत आली, व कवितेप्रमाणेंच ताबडतोब स्वीकारण्यांतही आली. कवितेवरच्याप्रमाणें गोष्टीवरही 'कौंतेया' चा स्तुतिपर अभिप्राय आला. त्यांतही गोष्ट स्त्रीनें लिहिली असल्याचें गृहीत धरलें होतें, इतकेंच नाहीं, तर कवयित्री व कथालेखिका एकच असल्याबद्दलही संशय प्रकट केला होता. कवितेच्या विषयावरून व भाषासरणीवरून ती स्त्रीनें लिहिली असल्याबद्दल अनुमान काढणें शक्य होतें. पण गोष्टींत त्या अनुमानास आधार मिळण्यासारखें कांहींच नव्हतें. कवितेंतील 'जयंत' व कथेंतील बालक यांच्या शब्दचित्रांतील सादृश्य हा जो आधार 'कौंतेया' नें आपल्या संशयास दिला होता तो अगदींच लेचापेचा होता अर्थात् 'कौंतेय' म्हणजे अमृतरावच हा 'बाई' चा समज ठाम होऊन बसला.

तो समज तिनें हरिहररावांपाशीं बोलूनही दाखविला. पण त्यांनीं त्यावर कोणतेंही मत प्रकट केलें नाहीं. 'कौन्तेया' बद्दल कटु शब्द बोलून 'बाई' चें मन दुखवावयाचें नाहीं असा त्यांचा अलीकडे कृतसंकल्पच झाल्यासारखा दिसला. इतकेंच नाहीं, तर मुद्दाम राजकारणाचा विषय काढून त्यावर 'बाई' ला आवडतीं असलेलीं 'कौन्तेया' चीं मते प्रकट करण्याचाही त्यांनीं उपक्रम सुरू केला. हातून घडलेल्या

अन्यायाचें परिमार्जन करण्याकरितांच ही सारी खटपट आहे, हें 'बाई' नें तेव्हांच ताडलें. एके दिवशीं त्यांनीं आपली ज्वलज्जहाल मतें तिच्यासमोर मांडिल्यावर ती म्हणाली, "टोपणनांवानें लेख लिहिणाऱ्या लेखकाला त्या लेखांत एक मत प्रतिपादून त्याच्या अगदीं विरुद्ध वर्तन करण्याची गैरवाजवी सवड मिळते असें आपण त्या दिवशीं म्हटल्याचें आपणांस स्मरत असेलच ?"

"तुमच्या बोलण्याचा रोख माझ्या लक्षांत आला. पण तशा लेखकाच्याप्रमाणें माझें वर्तन कधींच दुटप्पी नसतें हें तुम्हीं लक्ष्यांत घेतलें पाहिजे माझ्या लेखांचे विषय सामाजिक असतात. त्यांत मी राजकारणाचा कधींच संबंध आणीत नाहीं घरगुती संभाषणांतही अत्यंत निकटच्या स्नेह्यांवांचून दुसऱ्या कोणापाशींही मी आपलीं राजकीय बाबतींतलीं मतें बोलून दाखवित नाहीं पण जेव्हां तीं बोलून दाखवितों तेव्हां माझ्या भाषणांतील एकही वाक्य माझ्या लेखांतील मजकुराशीं विसंगत नसतें; व असें असणेंच स्वाभाविक आहे ज्या मनुष्यास सामाजिक अन्यायांबद्दल चीड वाटते त्यास राजकीय अन्यायाबद्दल वाटणार नाहीं असें होईल तरी कसें ?"

आपणाशीं राजकीय विषयावर चर्चा करून हरिहररावांनीं निकटच्या स्नेह्यांच्याइतकाच आपला बहुमान केला या गोष्टीचा 'बाई' वर अपेक्षित परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. त्यांच्या तिच्याशीं होणाऱ्या वर्तनांत अलीकडे पडलेल्या फरकावरून त्यांचें तिच्यावर उत्कट प्रेम असल्याबद्दल तिची जी खात्री होऊं लागली होती, तिला त्या गोष्टीनें बळकटीच आली हरिहररावांचा त्या दिवशीं 'कौंतेया' बद्दल जो राक्षसी द्वेष दिसून आला त्याचें गूढ अजून तिला पुरतेपणीं जरी उकलतां आलें नव्हतें तरी त्याची कांहीं जबाबदारी त्यांच्या आपणावरील प्रेमाकडे व पर्यायानें आपणाकडे येते असें तिला खात्रीपूर्वक वाटावयास लागलें; आणि स्वतःच्या दोषाकडे पहाण्याची दृष्टि इतरांकडे पहाण्याच्या दृष्टीहून निराळी असल्यामुळें तिनें त्या द्वेषाबद्दल त्यांना कांहीं अंशीं क्षमाही केली. तिचें हरिहररावांवर निःसीम प्रेम असतां

व त्यांचेंही तिजवरील निर्मल प्रेम प्रत्यहीं अधिकाधिक स्पष्टपणें तिच्या नजरेस येत असतां तिच्या मुद्रेवर आनंदाची छटा दिसण्याऐवजीं खिन्नतेची दिसून येई. यावरून उभयतांच्या विवाहास कांहीं तरी जबरदस्त विघ्न असलें पाहिजे असें तिऱ्हाइतास वाटल्यावांचून राहिलें नसतें. असो, हरिहररावांनीं आपलें वर्तन दुटप्पी नाहीं हें सिद्ध करण्याकरितां आपण सामाजिक व राजकीय अशा दोन्ही बाबतींत सारखेच जहाल असल्याबद्दल जें विधान केलें त्याचा त्यांच्या वर्तनाशीं पूर्ण मेळ बसत नाहीं असें वाटून व त्यांजकडून आणखी स्पष्टीकरण झाल्यास ती असंगति दूर होऊन त्यांच्या त्या दिवशींच्या अत्यंत अस्वाभाविक वर्तनावरही प्रकाश पडेल अशी आशा वाटून तिनें त्यांस प्रश्न केला, "आपलीं राजकारणावरील मतेंही जर इतकीं जळजळींत आहेत तर तीं लेखांच्या द्वारें समाजावर बिंबवणें आपलें कर्तव्य नाहीं का ?"

"तें माझें कर्तव्य असेल, पण तें शक्य नाहीं. आपणामध्यें देशाची राजकीय व सामाजिक अशा उभयविध बाबतींत सेवा करूं पाहणाऱ्या मनुष्यानें एक तर नेमस्त व सुधारक तरी असलें पाहिजे किंवा जहाल व पुराणाभिमानी तरी असलें पाहिजे. नेमस्त असून पुराणाभिमानी किंवा जहाल असून सुधारक असणारा एकादाच अपवादरूप मनुष्य असावयाचा, व त्यास एकाही पक्षाची सहानुभूति नसल्यामुळें त्याच्या हातून फारसें कार्यही होण्यासारखें नसतें."

"असें असण्याचें कारण ?"

"याच्या मुळाशीं राजकीय व सामाजिक सुधारणांचीं मूलतत्त्वें जशीं आहेत तसें मनुष्यांमनुष्यांमध्यें जन्मसिद्ध गुणधर्मांप्रमाणें व परिस्थितीसंबंधानें असणारे भेदही आहेत."

"वास्तविक पाहतां सर्व निराशावादी पुराणाभिमानी व नेमस्त आणि सर्व आशावादी सुधारक व जहाल असावयास पाहिजेत निराशावाद्यांची दृष्टि नेहमीं भूतकालावर खिळलेली असून आशावाद्यांची भविष्यकालावर लागलेली असते. यामुळें पहिला वर्ग उभयविध सुधारणांविषयीं सारखाच उदासीन व दुसरा वर्ग त्यांविषयीं सारखाच जहाल

असला पाहिजे; मग त्या सुधारणा राजकीय असोत किंवा सामाजिक असोत."

"तुम्ही म्हणतां तशी स्थिति पाश्चात्य देशांत बहुधा असतेही. हिंदुस्थानसारख्या देशांत परकीय अमलामुळें राजकीय व जातिभेदामुळें सामाजिक परिस्थिति अत्यंत कृत्रिम झाल्याकारणानें तो नियम लागू पडण्यासारखा नाहीं. जेथें राजसत्ता स्वदेशीय असते तेथें तिजबद्दल पुराणाभिमान्यास वाटणारा अभिमान त्याच्या स्वाभिमानाशीं विसंगत नसतो. तसेंच त्या राजसत्तेच्या जोरावर सामाजिक सुधारणा घडवून आणली तरी सुधारक अप्रिय होण्याचा संभव नसतो. इंग्लड, अमेरिका इत्यादि ज्या देशांत खरी राजसत्ता प्रजेच्याच हातीं असते तेथें तर राजकीय व सामाजिक सुधारणांत मुळींच विरोध नसतो. त्यांजमध्यें पुराणाभिमानी व सुधारक हे दोनच वर्ग काय ते असतात, व त्यांमधील विरोध स्वभावास्वभावातील जन्मसिद्ध विरोधावर अवलंबून असल्यामुळें एकविध व शाश्वत स्वरूपाचा असतो. हिंदुस्थानात मात्र परकीय सत्ते-मुळें व जातिभेदामुळें विरोधास अनेकत्व व कृत्रिमत्व आलें आहे. म्हणून आपणास राजकीय व सामाजिक सुधारणाच्या लक्षणांचा विचार करितांना हिंदुस्थानांतील विशिष्ट परिस्थितीचा विचार केला पाहिजे. असो. राजा व प्रजा यांमध्यें समता उत्पन्न करणें हें राजकीय सुधारणेचें ध्येय असून प्रजेच्याच भिन्न भिन्न वर्गात समता उत्पन्न करणें हें सामाजिक सुधारणेचें ध्येय असतें. राजकीय ध्येय पूर्णपणें साध्य होण्याकरितां दोन मार्ग असतात. एक मार्ग राजाचें मन वळवून त्यास प्रजेला हक्क देण्यास अनुकूल करणें. हिंदुस्थानात सरकार परकें असून त्याच्या व प्रजेच्या भाषांत, संस्कृतींत, विचारांत, आचारात, हितसंबंधांत, सारांश जवळ जवळ प्रत्येक बाबतींत विरोध असल्यामुळें तो मार्ग विशेष फल-द्रूप होण्यासारखा नसतो. दुसरा मार्ग म्हटला म्हणजे प्रजेंत ऐक्य उत्पन्न करून त्याच्या जोरावर, सरकारकडून त्याच्या इच्छेविरुद्ध राजकीय हक्काची प्राप्ति करून घेणें. या मार्गास ज्या ऐक्याची जरूर असते तसें ऐक्य हल्लीं हिंदुस्थातांत शक्य नाहीं. पाश्चात्य देशांत समाजाच्या एकीकरणाचीं ज्ञानप्रसार, दळणवळणाच्या सोई इत्यादि अनेक साधनें असतांही स्त्री व

पुरुष, कारखानदार व मजूर इत्यादि तीव्र भेद आहेतच. आपणाकडे ते स्वाभाविक भेद असून शिवाय त्यांत कृत्रिम जातिभेदाची भर पडली आहे. आतां जहाल राजकीय सुधारक राजा व प्रजा यांमधील पूर्ण समतेचे अभिमानी असल्यामुळें ती घडवून आणण्याकरितां त्यांना समाजांतील या वैषम्याचा नाश करून ऐक्याचा परिपोष करावा लागतो, आणि त्याकरितां वर्णाभिमानापेक्षां देशाभिमानाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करावें लागतें व सर्व वर्गास समान असणाऱ्या पूर्व संस्कृतीची महती गावी लागते. ऐक्य प्रभावशालि करण्याकरितां लोकांत त्यांजवर होणाऱ्या अन्यायाची चीड, स्वाभिमान व आशावादीपणा उत्पन्न करावा लागतो. अन्यायाची चीड उत्पन्न करण्याकरितां सरकारच्या वर्तनावर वेळीं अवेळीं न्याय्य अन्याय्य टीका करावी लागते; स्वाभिमान उत्पन्न करण्याकरितां पूर्वेतिहासांतील योग्य व्यक्ति व प्रसंग निवडून त्याची योग्य अयोग्य प्रशंसा करावी लागते; आणि आशावादीपणा उत्पन्न करण्याकरितां प्रजाजनांच्या दोषांवर पांघरूण घालून गुणांची भरपूर स्तुति करावी लागते. हें सारें समाधानकारक रीतीनें पार पडण्यास राजकीय सुधारकाच्या अंगीं स्वाभिमान, देशाभिमान, पुराणाभिमान व या अभिमानत्रयीप्रीत्यर्थ सत्याचा होम करण्याची तयारी असावी लागते. त्यास बुद्धि व अनुभव या जोडीपेक्षां कल्पना व भावना यांजवरच भिस्त ठेवावी लागते. तो कल्पनेस व भावनांस पटण्यासारखें अत्यंत उदात्त ध्येय पुढें ठेवीत असल्यामुळें तें ध्येय गांठण्याचे त्याचे मार्ग शक्याशक्यतेस नेहमीं धरून असतातच असें नाहीं त्याचें ध्येय साधें व रमणीय असल्यामुळें सामान्य जनांकडून शीघ्रतेनें स्वीकारण्यांत येतें. ध्येयप्राप्तीच्या मार्गाचा तपशील घोंटाळ्याचा व कंटाळवाणा असल्यामुळें त्याचा विचार करण्याच्या भानगडींत सामान्य जन पडत नाहींत. या लोकांवरच जहाल राजकीय सुधारकाची भिस्त असल्यामुळें त्यास त्यांना भिऊन वागावें लागतें. सरकारावर कडक टीका करावी लागत असल्यामुळें त्याची अवकृपा ओढून घेण्याची, प्रसंगीं तुरुंगांत जाण्याचीही त्याची तयारी असावी लागते. अर्थातच राजकीय सुधारकाच्या अंगीं असामान्य धैर्यही असावें लागतें. आतां समाजिक सुधारणेच्या तत्त्वांचा

विचार करूं. तिचें क्षेत्र प्रजेच्या अंतर्व्यवस्थेपुरतें मर्यादित असल्यामुळें तिला राजा व प्रजा यांजमधील संबंधाकडे लक्ष्य देण्याचें कारण नसतें. अर्थात् समाजसुधारकाचा व राज्यकर्त्यांचा विरोध होण्याचा कधींच संभव नसतो; इतकेंच नाहीं, तर समाजांतील वैषम्य दूर करण्याच्या कामीं राज्यकर्त्यांचें साहाय्य घेणें आवश्यक व इष्ट वाटल्यास तें घेण्यासही त्याची तयारी असावी लागते. अर्थात् सरकारावर योग्य किंवा अयोग्य टीका करण्याचें होतां होई तों टाळण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. त्यास समाजांतील श्रेष्ठ वर्गाची न्यायबुद्धि जागृत करून त्यांचें मत कनिष्ठ वर्गास समतेनें वागविण्यास अनुकूल करावें लागतें, व कनिष्ठ वर्गाच्या ठायीं त्यांजवर वरिष्ठ वर्गाकडून होणाऱ्या अन्यायाची तीव्र जाणीव, स्वाभिमान व आशावादीपणा उत्पन्न करावा लागतो; आणि हीं कामें बऱ्याच अंशीं परस्परविसंगत असतात. त्यास श्रेष्ठ व कनिष्ठ अशा दोन्हीं वर्गांशीं सलोख्याचा संबंध ठेवावा लागत असल्यामुळें दोन्हीं वर्गास पटण्यासारखीं प्रमाणें योजावीं लागतात अशा प्रमाणांस अर्थातच सत्याचा, न्यायाचा व सदसद्विवेकबुद्धीचा आधार असावा लागतो त्याच्या अंगीं स्वाभिमानापेक्षां परमतसहिष्णुतेचा व देशाभिमानापेक्षां देशासबंधानें करावयाच्या कर्तव्याच्या बुद्धीचा विकास होतो. राष्ट्र शिळपट लोकांचें असण्यापेक्षां नष्ट झालेलें पुरवलें असें जहालास वाटतें, तर राष्ट्राच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें सद्यःकालीन हीनावस्था पत्करण्यासही नेमस्त तयार असतो. त्याला मनोहर कल्पनाचित्रांचें व भावनेच्या तीव्र भाषेचें वावडें असतें. त्याला विचार व भाषा हीं समतोल ठेवावीं लागतात, आणि कल्पना व भावना यांपेक्षां अनुभव व युक्तिवाद यांवरच भिस्त ठेवावी लागते. परंतु सामान्य समाज बुद्धिप्रधान नसून भावनाप्रधान असल्यामुळें त्याजवर अनुभवाचा व युक्तिवादाचा फारसा परिणाम होत नाहीं. समाजसुधारणेमुळें अत्यंत उच्च जातींच्या हक्कांवर गदा येत असल्यामुळें त्या जातींतील बहुतेक लोक तिला प्रतिकूल असतात, व अत्यंत नीच जातींत शिक्षणाचें प्रमाण फार कमी असून अन्यायाची चीड, स्वाभिमान व आशावादीपणा हीं सुद्धां बेताचींच असल्यामुळें त्याही जातींतील बहुतेक लोक

समाजसुधारणेस प्रतिकूल असतात. या दोन टोकांच्या मधील जाती उच्चतर जातींच्या मानानें उच्च असल्यामुळें त्यांचाही त्या सुधारणेस मिळणारा पाठिंबा अर्धवटच असतो. याप्रमाणें समाजाकडून होणारें साहाय्य भरपूर नसल्यामुळें समाजसुधारकास सरकारचा व त्याच्या कायद्याचा आश्रय घ्यावा लागतो, व तें सरकार परकीय असल्यामुळें लोकप्रियतेवर पाणी सोडावें लागतें. त्याच्या वांट्यास विशेष अप्रियता जाण्याचें कारण असें असतें कीं जहालास समाजाच्या व आपल्या पूर्वजांच्या गुणांची भरपूर स्तुति करून आपली अधिकारप्राप्तीची पात्रता जशी प्रतिपादितां येते तशी त्यास प्रतिपादितां येत नाहीं.- त्यास गुणप्रशंसेपेक्षां दोषदर्शनाचीच कांस धरावी लागते, व अधिकारपात्रतेपेक्षां कर्तव्याची श्रेष्ठताच ठसवावी लागते. अर्थातच त्याचा समाजाकडून अतोनात छळ होतो, व तो सहन करण्यास त्याचे अंगीं दृढ कर्तव्यनिष्ठा व नीतिधैर्य असावें लागतें. हा छळ पुष्कळदां सरकारच्या छळापेक्षांही जाचक असतो. सरकारच्या छळास कायद्याचें बंधन असतें; सामाजिक छळास कसलेंच नसतें तुरुंगांत ठराविक अन्नपाणी मिळण्यास कधींच हरकत नसते. पण समाजानें हुक्कापाणी बंद केल्यास उपासमारीचीच पाळी येते. तुरुंगांत कैद्याच्या आरोग्याची काळजी घेण्यांत येते पण समाजानें सुधारकावर बहिष्कार टाकिला कीं त्यास नाकाडोळ्यांचे वैद्य सुद्धां पारखे होतात. तुरुंगांतील एका कैद्यास दुसऱ्याला अपकार करितां येत नाहीं. पण बहिष्कारामुळें सुधारकास अवाढव्य तुरुंगाप्रमाणें वाटणाऱ्या या जगांत अंधाऱ्या रात्रीं किंबहुना दिवसाढवळ्या वाटेल त्यानें येऊन त्याच्या डोक्यांत सोटा घालण्यास व त्याचे मातापितर उद्धरण्यास हरकत नसते. बरें, या अन्यायाची सरकारकडे कागाळी केली तर पुराव्याच्या अभावीं ती लटकी पडते. असो. समाजसुधारकांपैकीं जे लोक राजकारणांत पडतात त्यांस आपलें राजकीय ध्येय व तत्प्राप्तीचे मार्ग आंखतांना अनुभव, शक्यता, न्याय, कर्तव्यनिष्ठा, नीतिधैर्य, सरकारशीं सहकारिता इत्यादि गोष्टींचा अवलंब करावा लागतो. त्यांचे ध्येयप्राप्तीचे मार्ग शक्य कोटींतील असतात; परंतु ध्येय सामान्य जनसमूहाच्या कल्पनेस व भावनांस पटण्यासारखें नसल्यामुळें त्यांस लोक-

मताचा पाठिंबा मिळत नाहीं. असो; तर पाश्चात्य देशांत पुराणाभिमान व नेमस्तपणा यांचें आणि सुधारकपणा व जहालपणा यांचें साहचर्य जसें दिसून येतें तसें आपल्याकडे दिसून न येतां पुराणाभिमान व जहालपणा यांचें आणि सुधारकपणा व नेमस्तपणा यांचें दिसून येतें, याचीं कारणें आतां तुमच्या लक्ष्यांत आली असतीलच?"

"आपल्या विवेचनाच्या धोरणावरून असें दिसतें कीं पुराणाभिमानी इसम सामाजिक सुधारणेच्या आखाड्यांत उडी टाकण्यापूर्वी जहाल असतो, व नेमस्त इसम राजकीय सुधारणा हातीं घेण्यापूर्वी सुधारक असतो. विवेचनांतील हा क्रम व्यवहारांत दिसून येतो का?"

"तो क्रम मीं केवळ विवेचनाच्या सोयीकरितां स्वीकारिला होता; व तो कधींकधीं व्यवहारांतही दिसून येतो. पण सामान्यत्वेंकरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं मनाची कल्पना व भावना हीं अंगें बाल्यावस्थेंत प्रौढावस्थेंतल्याइतक्याच किंबहुना अधिक परिणतावस्थेंत असल्यामुळें प्रत्येक इसम अपवादात्मक परिस्थितीच्या अभावीं आरभीं पुराणाभिमानी असतो, व मागाहून आपल्या उपजत मनोधर्माप्रमाणें सुधारक किंवा जहाल होत जातो. सुधारक होत असतां तो नेमस्तहि होत असतो सुधारक होण्यास ज्या बुद्धीचीं, अनुभवाची, कर्तव्यनिष्ठेची व निर्भयपणाची जरूर असते तीं जन्मसिद्ध असलीं तरी लहानपणीं अपक्व असून वयोमानाबरोबर वृद्धिंगत होत जातात त्याचप्रमाणें जहाल होण्यास ज्या स्वाभिमानाची जरूर असते तो जरी बाल्यावस्थेंत विपुल प्रमाणांत असला तरी त्याच्याइतकाच आवश्यक असणाऱ्या स्वदेशाभिमानाचा विकास बाल्य संपल्यानंतरच होऊं लागतो प्रत्येक इसमाचा लहानपणीं सामाजिक बाबींशींच संबंध येतो. राजकीय बाबींशीं कमी अधिक संबंध त्याच्या वाचनाच्या व व्यवसायाच्या मानानें प्रौढावस्थेंतच घडून येतो पुराणाभिमानास जर झाडाच्या बुंध्याची उपमा दिली तर जहालपणास व सुधारकपणास त्याच्या शाखा व नेमस्तपणास सुधारकपणाची जोडशाखा किंवा उपशाखा म्हणतां येईल."

"जन्मकालाच्या दृष्टीनें जहालपणा व सुधारकपणा या दोघांचा मान

सारखाच आहे असा आपल्या म्हणण्याचा इत्यर्थ दिसतो. महत्त्वाच्या दृष्टीनेंही त्यांची योग्यता सारखी म्हणतां येईल का ?"

"देशाच्या विलक्षण सद्यःस्थितीमुळें राजकीय सुधारणेस हल्लीं प्रमाणाबाहेर महत्त्व आलें आहे. तें विचारांत घेतलें नाहीं तर तिच्यापेक्षां सामाजिक सुधारणेचें महत्त्व अधिक आहे हें केव्हांही कबूल करावें लागेल. राजकीय सुधारणेच्यापेक्षा सामाजिक सुधारणेचें क्षेत्र फारच व्यापक असून सामाजिक परिस्थितीचे राजकीय परिस्थितीवर अनेकविध व महत्त्वाचे परिणाम होतात. सामाजिक सुधारणा झाली तर राजकीय हीनावस्था टिकत नाहीं. उलट पक्षीं राजकीय सुधारणा कितीही झाली तरी तिच्या जोडीला सामाजिक सुधारणा नसल्यास ती ढांसळून पडते. सामाजिक सुधारणेची व्याप्ति प्रौढविवाह, पुनर्विवाह इत्यादि कांहीं बाबींपुरतीच मर्यादित न करितां तिच्यांत शिक्षण, जातीजातींचें ऐक्य अशा व्यापक बाबींचाही अंतर्भाव केला तर हें तत्त्व सर्वसंमत होण्यास हरकत नाहीं."

"याच रीतीनें राजकीय सुधारणेची योग्यता सामाजिक सुधारणे-च्यापेक्षां अधिक आहे हेंही सिद्ध करिता येणार नाहीं का ?"

"कसें येणार ? राजकीय सुधारणेचें क्षेत्र सर्वव्यापी सामाजिक सुधा-रणेच्याइतकें विस्तृत आहे असेंच म्हणतां येणार नाहीं; मग तें त्याहून अधिक विस्तृत आहे असें म्हणणें दूरच राहिलें राजकीय परिस्थितीचे सामाजिक परिस्थितीवर परिणाम होतात हें नाकबूल करण्यात हंशील नाहीं, पण ते तितके महत्त्वाचे नसतात हेंही नाकबूल करितां येत नाहीं. राजकीय सुधारणा झाली तर सामाजिक हीनावस्था खात्रीनें नष्ट होते असें म्हणतां येणार नाहीं; त्याप्रमाणें सामाजिक सुधारणेच्या जोडीस राजकीय सुधारणा नसल्यास ती जमीनदोस्त होते असें विधान 'कौंतेय' सुद्धां करणार नाहीं, मग तुम्ही तर नाहींच करणार."

"बरें, हातून होणाऱ्या कामगिरीच्या दृष्टीनें विचार केला तर नेमस्त श्रेष्ठ ठरतील कीं जहाल ?"

" मला तर दोघेही सारखेच वाटतात. त्यांमध्यें अंतर इतकेंच कीं, जहाल मनाच्या आवेगासरसें एकदम पुष्कळ काम करतो आणि नेमस्त तितकेंच काम चिकाटीनें दीर्घ काळांत घडवून आणितो. धडाडीचें काम जहालाकडेच सोंपविलेलें बरें. ज्या कामास सुव्यवस्थेची व शिस्तीची जरूर तें काम नेमस्ताच्या हातून विशेष समाधानकारक रीतीनें पार पडतें. जहालाचें काम तांतडीनें व पुष्कळच होतें, पण तें होईलच अशी खात्री देतां येत नाहीं. उलट पक्षीं नेमस्त जें काम हातीं घेईल तें तो खात्रीनें व समाधानकारक रीतीनें पार पाडील. तें डोळ्यांत भरण्याइतक्या शीघ्रतेनें व विपुलतेनें मात्र होणार नाहीं."

" मग देशहिताचें काम लौकर व चांगलें व्हावें अशी इच्छा असल्यास या दोन पक्षांत एकोपा असला पाहिजे असें आपलें म्हणणें ? "

" निःसशय. हे पक्ष एकमेकांचे पूरक आहेत. सामाजिक सुधारणेमुळें भिन्न भिन्न जातींत जी एकी व समान हक्कांची जाणीव होते तिची राजकीय सुधारणेच्या प्रगतीस चांगलीच मदत होते, व जहालांकडून राजकीय हक्कांची जी मागणी होते तिचेंही समाजांतील भिन्न भिन्न वर्गांत समानतेची भावना उत्पन्न व जागृत होण्यास उत्तम साहाय्य होतें. राष्ट्रांत सगळेच सुधारक व नेमस्त किंवा सगळेच पुराणाभिमानी व जहाल असते तर सरकारनें प्रजेस आपण होऊन राजकीय हक्क कधींच दिले नसते पण ते दोन पक्ष अस्तित्वांत असल्यामुळें त्यास तडजोड म्हणून अधिकारदानाचा देखावा तरी कधीं कधीं करावा लागतो. परस्परांशीं निकरानें झगडणाऱ्या या पक्षांत आपण दोघे भिन्न भिन्न मार्गांनीं एकाच उद्दिष्टाकडे जात आहोंत ही जाणीव होईल तर केवढें तरी कार्य होईल ! "

" आपण मनाच्या कल्पना व भावना या अंगांचा एक वर्ग करून बुद्धि व कर्तव्यनिष्ठा यांचा अगदीं निराळा वर्ग केला. असें वर्गीकरण करण्याइतकें प्रत्येक वर्गांतील दोन अंगांमध्यें साहचर्य व साम्य आणि भिन्न वर्गांतील अंगांचें परस्परांपासून पृथक्त्व व वैषम्य असतें काय ? "

" अर्थातच. पूर्वोक्त अंगांचा समान धर्म विकारक्षमत्व हा असून

उत्तरोक्त अंगांचा स्थैर्य हा असतो; व या दोहोंचें सादृश्य जसें नसतें तसें साहचर्यही क्वचितच आढळून येतें. यांमधील वैषम्यच धर्म, तत्त्वज्ञान, कला इत्यादिकांच्या क्षेत्रांत जगाच्या आरंभापासून माजलेल्या तुमुल रणाच्या मुळाशीं आहे. भौतिक शास्त्राचा आधार प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळें त्यांत मात्र या मतभेदास जागा नाहीं. बाकी तत्त्वज्ञानाच्यासारख्या ज्या क्षेत्रांत मानवी बुद्धीची गति चालत नाहीं, कलेच्यासारख्या ज्या क्षेत्रांत बुद्धीपेक्षां अभिरुचीसच प्राधान्य असतें आणि राजकीय व सामाजिक सुधारणाच्यासारख्या ज्या क्षेत्रांतील व्यवहार गुंतागुंतीचे व म्हणून मानवी बुद्धीस दुराकलनीय असल्यामुळें अंतिम निर्णयाचें काम अभिरुचीकडेच येतें त्या क्षेत्रांत व्यक्तींच्या मनोधर्माप्रमाणें कल्पना-भावनाप्रधान व बुद्धिकर्तव्यप्रधान असे दोन तट पडतात. हे तट अर्थातच अनुक्रमें विकारशील व स्थैर्यशील असतात. नेमस्त पक्षात पक्षभेद नसून जहालांत मात्र नरम जहाल, ज्वलज्जहाल असे अनेक पंथ आढळतात याचें कारणही नेमस्तांच्या स्वभावांतील स्थैर्य व जहालांच्या स्वभावांतील विकारित्व हेंच होय."

" आपण हीं जीं परस्परविरुद्ध नियामक तत्त्वें सांगितलीं त्यांनीं प्रत्येक पक्षातील सर्व व्यक्तींना प्रेरणा मिळते असा आपल्या म्हणण्याचा भावार्थ आहे का ? "

" छे छेः ! तसें कसें होईल ? माझें विवेचन उभयपक्षांमधील मर्यादासीमेपासून अत्यत दूर असलेल्या तत्त्वनिष्ठांनाच काय तें पूर्णपणें लागू आहे. निव्वळ जहाल किंवा निव्वळ नेमस्त अशा व्यक्ति अर्थात् थोड्याच असावयाच्या बाकीच्यांत उभयताच्या तत्त्वांची सरभेसळच आढळावयाची. त्यांना तें विवेचन अंशतःच लागूं करितां येईल. त्याचप्रमाणें खरे तत्त्वनिष्ठही विरळाच आढळावयाचे. मराठ्यांच्या फौजेंत स्वामिनिष्ठेप्रीत्यर्थ किंवा कीर्तीसाठीं लढणाऱ्या सैनिकांच्या बरोबरीनें किंबहुना त्यांहूनही अधिक ज्याप्रमाणें बाजारबुणग्यांचा भरणा असे त्याप्रमाणें प्रत्येक पक्षांत तत्त्वनिष्ठांच्याप्रमाणेंच स्वार्थी लोकांचाही भरणा असतो. देशाच्या कल्याणासाठीं सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणारा एकजण असला तर स्वेच्छाचारानें वागून चैन करितां यावी म्हणून तिचा

कांस धरणारे अनेकजण असतात. सरकारची मदत अनिर्वाहपक्ष म्हणून स्वीकारणारा एकादा नेमस्त आढळला तर पदव्यांकरितां सरकारपुढें लांगूलचालन करणारे शेंकडोंजण दिसून येतात. उलट पक्षीं सरकारी अधिकाऱ्यांच्या बेगुमान वर्तनावर चाबकाचे फटकारे मारण्याकरितां किंवा परवशतेची झांपड येऊन मृतवत् पडलेल्या प्रजेच्या डोळ्यांत अंजन घालण्याकरितां झणझणीत लेख लिहिणारा एकादा असला तर बंधनमुक्त झाल्यावर मिळणाऱ्या पुष्पहारांकरितां बेड्यांचें ओझें सहन करणारे किंवा लोकांच्या जयजयकाराकरितां काराधिकाऱ्यांचीं दुरुत्तरें सोसणारे हरीचे लाल त्याच्याभोंवतीं इतके जमतात कीं, त्यांच्या गर्दीत तो लोपून जातो. जुनें तें सोनें अशा प्रामाणिक मतामुळें जुन्यास चिकटून राहणारी व त्याकरितां सुधारकांचा उपहास सहन करणारी एखादी अपवादरूप व्यक्ति असते तर समाजाचा छळ चुकविण्याकरितां पुराणाभिमानाचा ढालीसारखा उपयोग करणाऱ्या अनेक स्वार्थी व्यक्ति असतात. स्वार्थाचे प्रकार द्रव्यलाभ, कीर्तिलाभ, विषयसुखप्राप्ति, भयनिवारण इत्यादि अनेक असतात स्वार्थ जातिपरत्वेंही बदलूं शकतो. ज्या गुणधर्मांचा इसम ब्राह्मण असल्यास जहाल व पुराणाभिमानी असतो त्याच गुणधर्मांचा इसम शूद्र असल्यास नेमस्त व सुधारक असतो एका जातीची अधिकारप्राप्ति ती दुसऱ्या जातीची अधिकारहानि, इतका त्या दोघींच्या दृष्टिकोणांत फरक असतो. ''

हा वेळपर्यंत हरिहररावांनीं नेमस्त व जहाल यांच्या गुणदोषांबद्दल जें विवेचन केलें तें बाह्यात्कारीं जरी निःपक्षपात बुद्धीचें असलें तरी, त्यावरून त्याच्या मनाचा स्वाभाविक ओढा नेमस्तांकडे असून त्यांचें जहालावरील प्रेम त्यांनीं स्वतःच्या वल्लभेकरितां ओढून आणलेलें चद्रबळच होतें ही गोष्ट 'बाई'च्या ताबडतोब लक्ष्यांत आली. तिनें तिला समाधान वाटलें. पण त्यांचें आपल्यावरील प्रेम यापलीकडचीही मजल गांठण्यास तयार आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां ती म्हणाली, '' आपण तत्वनिष्ठांचे स्वभाववैषम्यमूलक जे दोन प्रकार सांगितले त्यांहून अगदीं निराळा असा एक प्रकार कल्पितां येणार नाहीं का, कीं

ज्यांत बुद्धि, भावना, कल्पना, न्यायप्रियता, कर्तव्यनिष्ठा हीं सर्व विपुल व सम असून स्वाभिमान व देशाभिमानही उच्च प्रतीचा असतो ! "

" अशीं संपन्न व समतोल मनोभांडाराचीं मनुष्यें विरळा प्रत्येक शतकाच्या वांट्यास या वर्गातील एकादा दुसराच इसम आला तर येतो. पहिल्या प्रतीचे शिल्पकार, चित्रकार, कवि म्हणून ज्यांची गणना करण्यांत येते ते याच वर्गातील असतात. यांना मानसिक सृष्टीतील ताजमहाल म्हणतां येईल. यांच्या कृतींच्या चिंतनापासून मनास विस्मय व समाधान हीं दोन्हीं वाटतात. ज्यांचीं मनोभांडारें संपन्न पण एकांगी असतात ते दुसऱ्या वर्गात येतात. यांस मानसिक सृष्टींतील हिमालय पर्वत म्हणावयास हरकत नाहीं. यांच्या कृतींच्या निरीक्षणानें मनास आश्चर्य वाटतें, पण समाधान होत नाहीं ज्यांचे मनोभांडार मर्यादित पण समतोल असतें त्याचा तिसरा वर्ग होतो. मला वाटतें कीं माझी स्वतःची गणना झालीच तर या वर्गात होईल ."

" हा आपला विनय आहे. पण आपण म्हणतां तें जरी गृहीत धरिलें तरी आपल्या मनःशक्तींचा विकास मोठ्या प्रमाणावर झाला नसला तरी सम प्रमाणांत झाला आहे हें त्यापासून ओघानेंच येतें. अलीकडे आपल्या व माझ्या संभाषणाच्या ओघांत आपल्या राजकीय मतांवर जो प्रकाश पडला त्यावरून सुद्धां आपण जितके नेमस्त तितकेच जहाल व जितके सुधारक तितकेच पूर्वाभिमानी आहांत अशी माझी खात्री झाली आहे. याप्रमाणें दोन्ही पक्षांची सेवा करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असतां आपण आपलें अर्धें सामर्थ्य उपयोगांत आणून एकाच पक्षाची सेवा करावी व बाकीच्या अर्ध्या सामर्थ्याची उपेक्षा करून दुसऱ्या पक्षास त्याचा फायदा मिळूं देऊं नये ही दुःखाची गोष्ट आहे. माझ्या जागीं दुसरें कोणी असतें तर त्यानें आपण बुरखेवाल्या लेखकांस लाविलेलें 'दुटप्पी' हें विशेषणही आपणांस लावण्यास कमी केलें नसतें. आपण खाजगी संभाषणांत जे विचार प्रकट करितां तेच लेखनद्वारां व्यक्त केल्यास ईश्वरदत्त देणगीचा सामग्र्यानें उपयोग केल्यासारखा होऊन आपलें वर्तन दुहेरी होईल. "

" मीं आधींच सांगितलें ना कीं तें शक्य नाहीं म्हणून ? जातिवंत कारागिरास व कवीस आपल्या कृतींत आपलें संपूर्ण सामर्थ्य उतरवितां येतें. कारण तिची पारख करणारा रसिक त्यास चालू पिढींत व स्वतःच्या देशांत आढळून आला नाहीं तर ' कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ' असें म्हणून मनाचें समाधान करून घेतां येतें. असें असतां कलेच्या क्षेत्रांतही प्राकृत जनांच्या ग्राम्य अभिरुचीस बळी पडणारे भाडोत्री कलावंत दिसून येतात. मग ज्या राजकीय व सामाजिक व्यवहाराच्या क्षेत्रांत कलाक्षेत्रांतल्याप्रमाणें दिरंगाई करण्याची मुळींच सवड नसते व समाजांतील उच्च प्रतीच्या निवडक व्यक्तींशींच संबंध न येतां सामान्य प्रतीच्या प्राकृत जनांशींही येतो तेथें स्वतःच्या विवेकबुद्धीस अनुसरून आपलें सामर्थ्य व उत्साह उपयोगात आणणें शक्य झालें नाहीं तर नवल काय ? कलावंताचें ध्येय कल्पनासृष्टींतील असून राजकीय व सामाजिक सुधारकांचें अन्यायविध्वंसाचें ध्येय व्यावहारिक असतें. तें ध्येय त्यांस अनुक्रमें असमंजस जनतेच्या व स्वार्थी सरकारच्या सहाय्यानें शक्य तितक्या शीघ्रतेनें गांठावें लागतें. या साहाय्यकर्त्यांपैकीं प्रत्येकास आपल्या भक्ताची अव्यभिचारी निष्ठा पाहिजे असते. दुहेरी व समतोल मनोधर्माचा आणि राजकारणांत व समाजकारणांत सारखाच जहाल असलेला इसम सरकारवर टीका करू लागला की सरकार गरम होतें व समाजदोषांची चिकित्सा करू लागला कीं जनता गरम होते. तो सरकारचें साहाय्य घेण्यावर भर देऊं लागला तर जनता कावरीबावरी होते, व जनतेची स्तुति करून तिचा स्वाभिमान जागृत करू लागला कीं सरकार कान टवकारून पाहूं लागतें. नेमस्त-सुधारक व जहाल-पुराणाभिमानी यांहून सुधारक-जहाल असा एक निराळाच पक्ष असूं शकतो याची जाणीव जनतेस नसते तशी सरकारासही नसते. या सुधारक-जहाल पक्षाचा इसम याप्रमाणें सरकारचा व जनतेचा विश्वास गमावून त्यांचा रोष संपादन करितो. त्याचें वर्तन दुहेरी असले तरी उभयतांस सारखेंच दुटप्पी वाटतें. तो तुरुंगांत असला तर तेथील कायदेशीर अटकेस व शिक्षांस पात्र होतो, व तुरुंगाबाहेर असला तर बेकायदेशीर बहिष्कारास व छळांस योग्य ठरतो.

इतकेंही होऊन त्याच्या मतांचा समाजावर ठसा उमटता तर त्यास दुःखांत सुख मानण्यास थोडी तरी जागा रहाती. पण त्याच्या नशिबीं तेंहि सुख नसतें. कारण कलावंतास ज्याप्रमाणें स्वावलंबनानेंच आपलें ध्येय गांठतां येतें तसें या उभयविध जहालास शक्य नसतें. त्यास सरकारच्या व समाजाच्या साह्यानेंच आपलें ध्येय संपादिलें पाहिजे. पण त्यांचा विश्वास उडाल्यामुळें तें साह्य त्याच्या आटोक्यांत नसतें. बरें, उभयतांचा विश्वास कायम ठेवण्याकरितां सरकार व समाज यांजवर टीकाही करावयाची नाहीं व त्यांचें साह्यही घ्यावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला तर त्यानें मुळावरच कुऱ्हाड घातल्यासारखें होतें. कारण कोणावरही टीका न करितां व कोणाच्या सहानुभूतीची अपेक्षा न करतां सुधारणा करणें मुळांतच अशक्य आहे सारांश काय कीं, या उभयविध सुधारकानें आपलें अर्धें सामर्थ्य उपयोगांत आणिलें तरच तें फलद्रुप होतें. समग्र सामर्थ्य आणिलें तर त्यास जहालपणाचे व सुधारकपणाचे सर्व तोटे सोसावे लागून फायदा मात्र एकाचाही मिळत नाहीं."

"टोपणनांवानें लिहिण्याचा आपणांला तिटकारा नसता तर आपण आपलीं सुधारकीं मतें टोपणनांवानें व आपलीं जहाल मतें खऱ्या नांवानें प्रकट करावयास पाहिजे होतीं असें मीं म्हटलें असतें. म्हणजे जहाल पक्षाची लोकप्रियता आपल्या पदरांत पडून सुधारकपक्षाची अप्रियता आपणांस टाळतांही आली असती."

"माझ्या मतें तो आपलपोटेपणाचा व नामर्दपणाचा कळस झाला असता. सुधारकांची चमू आधींच लहान. तिच्यांतील प्रत्येक सैनिक जर याप्रमाणें लोकमतास भिऊन प्रच्छन्न लेख लिहूं लागला तर सामाजिक सुधारणेनें कोणाच्या तोंडाकडे पहावें? समाज अजाण मुलाप्रमाणें आपल्या हितकर्त्यावर लाथाबुक्क्यांचा वर्षाव करीत असतां त्याला पोटाशीं धरून त्याचें प्रेम व विश्वास संपादन करणें हें सुधारकाचें अंगीकृत व्रत असलें पाहिजे. तें निर्मल व निश्चल राखणें त्याचें काम आहे. त्याऐवजीं समाजानें थोडासा छळ करितांच त्याला

आपला शत्रु समजून त्याजवर शिखंडीप्रमाणें बुरख्याच्या आडून तिरं दाजी करणें हा नामर्दपणाच नव्हे, तर विश्वासघातही होईल."

हीं वाक्यें उच्चारीत असतां हरिहररावांच्या चेहेऱ्यावर इतकें उज्ज्वल तेज झळकत होतें कीं 'बाई' क्षणभर देहभान विसरून त्याकडे पहा तच राहिली. हरिहरराव पुढें म्हणाले, "यापेक्षां माझीं सुधारकीं मतं हल्लींप्रमाणेंच खऱ्या नांवानें व माझीं जहाल मतें 'कौंतेया' सारख्य एकाद्या टोपणनांवाखालीं प्रकट करणें मला शतपट आवडेल. त्यामुळं जहाल या नात्यानें मिळावयाच्या लोकप्रितेचा उपभोग जरी मला घेत आला नाहीं तरी 'अंगचोर सुधारक' म्हणून मनास रात्रंदिवस लाग णारी टोंचणी टळून माझ्या मनोदेवतेची पसंती तरी मला खास मिळेल व हा लाभही कांहीं लहानसान नाहीं."

"मग तो मार्ग आपण स्वीकारावाच अशी माझी आग्रहाची विनंति आहे."

"तुमची विनंति मी अमान्य कशी करणार! मी तिचा जरू विचार करीन."

या गुळमुळीत उत्तरावरून हरिहररावांचा जहालपणा उसना व दिखाऊ आहे याबद्दल बाईची खात्री झाली. पण तिला यासंबंधानें विचार करण्यास तूर्त वेळ नव्हता. कारण संभाषणाचा ओघ भलतीकडेच वाहूं लागला होत तो थांबविण्याकरितां विषयांतर करणें जरूर होतें. म्हणून ती म्हणाली "'कौंतेयां' चीं मतें जहाल असलीं तरी त्यांनीं सामाजिक सुधारणेव एकाही लेखांत हल्ला केलेला नाहीं. यावरून त्यांना राजकीय सुधारण प्रमाणें सामाजिक सुधारणाही प्रिय असावी असें अनुमान निघतें कदाचित् आपणांप्रमाणेंच तेही सुधारक-जहाल या मिश्र पक्षांतं असावेत. तसें असल्यास मीं आपणांस जशी टोपणनांवानें जहाल ले लिहिण्याची सूचना केली तशी त्यांस खऱ्या नांवानें सुधारकी लेख लिहि ण्याची कोणी तरी सूचना करणें जरूर आहे. आपण व त्यांनीं माझ्य सूचनांचा अंगिकार केल्यास राजकीय व सामाजिक सुधारणांच्या वाङ्मयां महत्त्वाची भर पडून दोन्ही सुधारणांस जोराचें चालन मिळेल."

"ही कल्पना मलाही पटते. 'चंद्रिके' च्या पुढील अंकांत तुम्ही 'कौंतेया' स त्या आशयाची जरूर सूचना करा. तुमच्या सूचनेच्या खालीं 'शरद्' ही सही असली म्हणजे ती मान्य होण्यास विलंब लागणार नाहीं."

'बाई' चें 'शरद्' या सहीचें पत्र व त्यास उत्तरादाखल 'कौंतेया' नें पाठविलेलें पत्र हीं दोन्हीं 'चंद्रिके' च्या पुढील अंकांत प्रसिद्ध झालीं. उत्तरोक्त पत्रांतील मजकूर याप्रमाणें होताः—"ही सूचना एक प्रतिभाशाली कवयित्री व कथा लेखिका करीत आहे ही एकच गोष्ट ती शिरसामान्य होण्यास पुरेशी आहे. पण ज्या हेतूनें मी आपले राजकारणावरील लेख लिहीत आहें तो हेतु माझा इरादा सामाजिक सुधारणेच्या मंडनार्थ लेख लिहिण्याचाही आहे याचा माझ्या वाचकांस पुसट संशय येतांच विफल होईल. सबब त्या सूचनेस मूर्त स्वरूप देण्याचें स्पष्ट आश्वासन मला देतां येत नाहीं. मी सामाजिक सुधारणेस प्रतिकूल नाहीं हा लेखिकेचा तर्क कवींच्या दिव्य द्रष्टेपणास शोभण्यासारखाच आहे. त्या सुधारणेविरुद्ध लेख लिहिण्याचें पातक मजकडून आजपर्यंत जसें झालें नाहीं तसें यापुढेंही होणार नाहीं. या आश्वासनानें लेखिकेचें समाधान होत असल्यास तें देण्यास मी तयार आहें. माझ्या हेतूची याहून अधिक वाच्यता शब्दापेक्षां कृतीवरच अवलंबून ठेवणें इष्ट होईल."

हरिहरराव हंसून म्हणाले, "पाहिलेंत भरंवशाच्या म्हशीला कसा टोणगा झाला तें! माझ्या वर्तनावर तुम्हीं दुटप्पीपणाचा आरोप केला होता. 'कौंतेया' चें खरें नांव माहीत नसल्याळें त्याचें वर्तन दुटप्पीपणाच्या आरोपापासून अलिप्त आहे. पण त्याच्या शब्दांवरून त्याच्या वर्तनाचा कयास करावयाचा झाल्यास तेंही त्या शब्दांप्रमाणेंच संदिग्ध व दुटप्पी असलें पाहिजे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. खऱ्या नांवानें सुधारणेस अनुकूल असे लेख लिहिण्याचें त्यानें स्पष्ट अभिवचन दिलें असतें तर त्याच्या लोकप्रियतेस ग्रहण लागून त्याच्या लेखसंग्रहाचा खपही कमी झाला असता. पदरास चट्टा लागण्याचा संभव दिसतांच त्याचा स्पष्टवक्तेपणा ओसरून त्याच्या तोंडास कुलूप बसलें.

त्याच्या या खेपेच्या मौनास जी द्रव्यदृष्टि कारण झाली तीच सरकार वरील त्याच्या जालीम टीकेच्याही उगमाशीं असली पाहिजे. कारण जेव्हां जेव्हां तो तशी टीका करितो तेव्हां तेव्हां 'चंद्रिके'चा खप वाढून त्यास मिळणारें वेतनही दुणावत असलें पाहिजे. द्रव्याभिलाष हेंच त्याच्या स्वभावाचें रहस्य दिसतें."

'बाई'चें मन हरिहररावांवर बिथरलें. ती आवेशानें म्हणाली, असे कुत्सिक आरोप करण्यापेक्षां असें म्हणतां येणार नाहीं का, कीं त्यांनीं सामाजिक सुधारणेबद्दल सक्रिय सहानुभूति दाखविण्याचा आपला हेतु व्यक्त केला असता तर त्यांच्या लेखांची लोकमतावरील पकड कमी होऊन त्यांचा त्यावर उद्दिष्ट परिणाम झाला नसता व म्हणून त्यांनीं स्पष्ट अभिवचन न देतां कृतीवरच आपल्या स्पष्टीकरणाची सारी मदार ठेविली? सुधारकी लेख लिहिण्याचा हेतु त्यांच्या पत्रांत स्पष्ट नसला तरी गर्भित खास आहे. आपल्या बोलण्यावरून एकाद्याला वाटेल कीं, आपण हें सारें मत्सरानेंच बोलत आहांत."

"मला मत्सर कां वाटूं नये? जी स्तुतिपर भाषा तुमच्या तोंडावर भाटाप्रमाणें बोलण्याची मला भिडस्तपणामुळें चोरी वाटते ती भाषा 'कौंतेया'स लेखांत लिहिण्यास कांहीं प्रत्यवाय नसतो. त्या भाषेचा तुमच्या अंतःकरणावर इतका अनुकूल ठसा उमटतो कीं, त्याचें संदिग्ध आश्वासन सुद्धा तुम्हांस खरें वाटतें. उलट माझ्या तोंडून सरळ भाषेंत स्पष्ट आश्वासन निघालें तरी त्याचें तुम्हांला महत्त्व वाटत नाहीं. रहस्यानें महत्त्व येतें याचें हें ताजें प्रत्यंतरच म्हटलें पाहिजे. त्याच्या पत्रांतील संदिग्ध भाषेचा पडदा दूर करून त्याच्या हेतूचा क्षुद्रपणा जसा मला दाखवितां आला तसा त्याच्या टोपणनांवाचा बुरखा दूर करून त्याचें खरें नांव ज्या दिवशीं मला समाजापुढें फरफटत ओढीत आणतां येईल तो सुदिन."

हें बोलतांना हरिहररावांच्या मुद्रेवर संताप, ईर्षा व समाधान यांचें इतकें विलक्षण मिश्रण दिसत होतें कीं, द्रौपदीस सभेपुढें ओढून तिचें वस्त्रहरण करणाऱ्या दुरात्मा दुःशासनाच्या मुद्रेवरही तसें दिसलें नसेल. तें पाहून 'बाई'स भय वाटलें. अत्यंत उदार व प्रेमळ अशा पुरुषाच्या हृदयांत अशी

भयंकर सूड घेण्याची आसुरी इच्छा रहाणें संभवेल तरी का? पण ती इच्छा जणु काय मूर्त स्वरूप घेऊन हरिहररावांच्या तोंडावर स्पष्टपणें दिसत होती. बरें, त्या इच्छेचें वास्तव्य कबूल केलें तर त्यांच्या औदार्याची आणि प्रेमळपणाची वाट काय? 'कौंतेया'चें खरें नांव त्यांस माहीत असून त्याजकडून त्यांचा प्रतिकूल टीकेपेक्षां भयंकर व अक्षम्य असा एखादा अपराध घडला आहे काय? त्यांनीं त्याजवर आतांपर्यंत स्वार्थसाधु, द्रव्यदृष्टि, स्वेच्छाचारी, भित्रा इत्यादि विशेषणांचा जो वर्षाव केला होता तो त्याच्या लेखांवरून बांधलेल्या अनुमानाच्या आधारानें कीं त्याच्या पूर्व चरित्राच्या प्रत्यक्ष ज्ञानाच्या आधारानें? तसें ज्ञान असल्यावांचून का त्यांच्या स्वरांत इतकी तीव्रता व त्यांच्या मनांत त्यास कारागृहांत ढकलण्याची किंवा त्याचा छद्मवेष फाडून टाकण्याची इतकी उत्कट इच्छा उद्भवली आहे? आपणास 'कौंतेया' ची ओळख त्याच्या लेखांवरूनच काय ती झाली आहे. हरिहररावांच्या अंतरंगाची ओळख मात्र त्यांच्या लेखांवरून व प्रत्यक्ष अनुभवानें झाली असून तो अनुभव एक संदिग्ध स्वरूपाची बाब वर्ज्य केली असतां बाकीच्या बाबतींत त्यांस सर्वस्वीं अनुकूल अशाच प्रकारचा आहे. त्या संदिग्ध बाबीचा निर्णय जरी अखेर त्यांच्याविरुद्ध झाला तरी 'एको हि दोषो गुणसंनिपाते निमज्जतींदोःकिरणेष्विवांकः' या न्यायानें ती त्यांच्या तर्फेनें बोलतां येण्यासारख्या अनंत बाबींत लोपून जावयाला हरकत नाहीं. अशा पुरुषाशीं अज्ञात 'कौंतेया'चा कैवार घेऊन आपण विनाकारण वितंडवाद घातला असें तिला वाटूं लागलें. त्याबरोबरच अशा थोर पुरुषाचेंही चित्त क्षुब्ध करून टाकण्याइतक्या नीच प्रकृतीच्या इसमाचें खरें नांव काय याबद्दल तिला तीव्र जिज्ञासाही उत्पन्न झाली. अमृतराव अशा नीच प्रकृतीचे नसल्याबद्दल तिची खात्री होती, व म्हणून तिनें तेच 'कौंतेय' असल्याबद्दल जो तर्क केला होता त्याच्या भक्कमपणाबद्दल तिला संशय वाटूं लागला. तिनें हरिहररावांस म्हटलें, "'कौंतेयां'चें खरें नांव काय याची आपणांस माहिती असल्याबद्दल आपल्या वर्तनावरून माझी पक्की खात्री झाली आहे. तें नांव मला सांगण्यास आपली कांहीं हरकत आहे काय?"

यावर खिन्नपणें हंसण्याशिवाय हरिहररावांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं यामुळें तिला 'कौंतेया'च्या वास्तविक स्वरूपाबद्दल जिज्ञासा मनांतल्या मनांत दाबून ठेवावी लागली. 'कौंतेय' व 'हरिहरराव' यांच्या संदिग्ध उत्तरांवरून आपल्या सूचना ते अमलांत आणितील याचीही तिला खात्री वाटेना. त्यांनीं त्या अमलांत आणिल्या असत्या तरीही तें तिला कळण्याचें साधन नव्हतें.

---

## प्रकरण ७ वें

'बाई'ची लेखनांत सारखी प्रगति चालली होती. तिनें आणखीही कांहीं सुंदर भावगीतें व लहान गोष्टी लिहून 'चंद्रिकें'त प्रसिद्ध केल्या. आपली शिष्या आपल्या कलेंत इतकी प्रविण झालेली पाहून हरिहररावांस फार धन्यता वाटूं लागली. तिच्या प्रावीण्याचें बरेंचसें श्रेय आपणाकडे आहे या विचारानें त्या धन्यतेंत भर पडे. त्या मानानें त्यांचें तिजवरील प्रेमही गुप्तपणेंच पण शीघ्र गतीनें वाढूं लागलें. किंबहुना त्यांच्या प्रेमाचा प्रकारही भिन्न झाला. पूर्वी त्यांचें प्रेम तिच्या मधुर रूपावर व गोड स्वभावावर होतें, तें आतां तिच्या मनाच्या इतर अंगावरही बसलें. ग्रीक लोकांची एक पौराणिक कथा आहेः—एका कुशल मूर्तिकारानें एक मूर्ति इतकी रमणीय बनविली कीं, तिजवर त्याचें स्वतःचेंच मन जडलें; मूर्ति निर्जीव असल्यामुळें त्याच्या प्रेमाची पूर्ति होण्याचें कांहींच साधन नव्हतें; म्हणून तो दिवसेंदिवस झुरूं लागला, अखेर त्यानें देवाचा धांवा करून त्या मूर्तींत प्राण ओतण्याविषयीं त्याची प्रार्थना केली; देवानें ती मान्य करून मूर्तीला सचेतन केलें; असें त्या कथेचें तात्पर्य आहे. हरिहररावांची अवस्था त्या मूर्तिकाराच्याप्रमाणें होती. त्यानें जसा शुभ्र, तुळतुळीत, संस्कारक्षम व टिकाऊ संगमरवरी दगडाच्या निसर्गसिद्ध साहित्यांतून मूर्तीचा नयनमनोहर देह निर्माण केला होता तसा त्यांनींही कुशाग्र बुद्धिमत्ता, चपल कल्पकता, अमर्याद भावनावशत्व, असामान्य धारणाशक्ति इत्यादि कच्च्या सामुग्रींतून एक निपुण ग्रंथकर्ती निर्माण केली होती. तिच्या

नैपुण्यावर आपला अर्धाअधिक मालकीहक्क असल्याची त्यांना जाणीव उत्पन्न झाली होती. एका संबंधानें भ्रष्ट झालेल्या आपणासारख्या विधुरास 'बाई' सारख्या कुमारीशीं द्वितीय संबंध जुळविण्याचा हक्कच पोंचत नाहीं अशी जी त्यांची आरंभीं कल्पना होती ती आतां पूर्णपणें लुप्त झाली होती. इतकेंच नाहीं तर आपलें पूर्व पत्नीशीं असलेलें बंधन केवळ दैहिक होते, 'बाई' शीं जडावयाचें बंधन दैहिक तसेंच आत्मिकही असल्यामुळें तेंच 'विवाह' या नांवास पात्र आहे असाहि युक्तिवाद त्यांस सुचूं लागला होता. तथापि पौराणिक गोष्टींतल्या मूर्तिकाराप्रमाणें त्यांसही एक दुर्लंघ्य अडचण होती. आपल्या मुखांतून 'कौंतेया'बद्दल वेळोवेळीं जे तीव्र उद्गार बाहेर पडले त्यांनीं तिचें मन आपणाविषयीं अत्यंत कलुषित झालें आहे असें त्यांच्या स्पष्टपणें नजरेस आलें. तिच्या मनांतील किल्मिष दूर करण्याचा ते आतां कसोशीनें प्रयत्न करूं लागले. खाजगी संभाषणांत जहाल पक्षाची तरफदारी करण्याचा त्यांनीं जो उपक्रम केला तो याच प्रयत्नांपैकीं असावा असें वाटून 'बाई'च्या मनांतील क्षुब्ध वातावरण बरेंच शांत झालें. तथापि अजूनही एकादे वेळीं त्यांच्या तोंडांतून नकळत 'कौंतेया'विरुद्ध तीव्र शब्द निघून तिचें मन तेवढ्यापुरतें बिचकून जाई. तें पाहून 'कौंतेया'-च्या नांवाचा चुकूनही उच्चार न होऊं देण्याचा त्यांनीं निर्धार केला. पण एके दिवशीं स्वतः 'बाई'कडूनच त्याचा विषय निघाला. ती त्यांना म्हणाली, "माझ्या मनांत आतां टीकालेखनावर आपली मति चालवून पहाण्याचें आलें आहे."

"मग जरूर पहा. होतकरू गद्यलेखक लेखनास आरंभ बहुधा टीकालेखापासून करीत असतात. पण त्यांजकडून स्वतंत्र निर्मिति मुळींच झालेली नसल्याकारणानें त्यांच्या अंगीं लेखनमार्गातील अड-चणींची किंवा जबाबदारीची जाणीव उत्पन्न झालेली नसते. ग्रंथकाराच्या पाठीच्या धिरड्याची लज्जत त्यांना नवीनच असल्यामुळें बहारीची वाटतें. पण पाठीवर चाबूक उडत असतां बिचाऱ्या ग्रंथकारास होणाऱ्या यातनांची त्यांना कल्पना नसते. यामुळें त्यांच्या टीका फाजील कडक व केवळ विघातक स्वरूपाच्या होतात. अशा टीकांचा ग्रंथकारांवर

काय परिणाम होतो याची तुम्हांला प्रत्यक्ष अनुभूति नसली तरी कल्पना तरी खात्रीनें झाली आहे. शिवाय ग्रंथरचनेचा तुम्हांला प्रत्यक्ष व मार्मिक परिचय घडला आहे. तेव्हां तुमची टीका विधायक स्वरूपाचीच होणार यांत सशय नको. टीकाविषयाची निवड मात्र योग्य करा म्हणजे झालें."

"मला आजपर्यंत आपणांकडून ग्रंथरचनेच्या सर्वच प्रकारांचें शाब्दिक ज्ञान झालें असलें तरी प्रत्यक्ष अनुभव काव्यरचनेचा व कथा-रचनेचाच काय तो मिळाला आहे. तेव्हां 'कौंतेया'ची नवी कादंबरीच टीकेकरितां घेईन म्हणतें."

"निवड तर सर्वथा योग्य अशीच आहे. ग्रंथकाराबद्दल तुमचा आदर असल्यामुळें टीका कडक होण्याची भीतिही नाहीं. 'कौंतेया'-सारख्या प्रसिद्ध लेखकाचा हेवा करणारे अनेक टीकाकार असावयाचे. त्यांच्या लेखणींतील जालीम विष बाहेर पडण्यापूर्वीच तुमच्या टीकेंत त्याजवरील उतारा येणें इष्ट आहे."

'बाई'नें विस्मयानें हरिहररावांच्या तोंडाकडे पाहिलें. सदयता व सुहृदयता यांनीं ओथंबलेलें हें वाक्य त्यांच्याच तोंडांतून बाहेर पडलें कीं काय याची तिला क्षणभर शंका वाटली असावी. त्याबद्दल तिची खात्री होतांच तिनें त्यांजकडे अत्यंत कृतज्ञतेनें पाहिलें. स्वतःच्या कट्ट्या दुष्मानाविषयींचे सारे पूर्वग्रह बाजूला ठेवून केवळ आपणास प्रसन्न करण्याकरितां असें वाक्य उच्चारणाराचें आपणावर तसेंच प्रबळ प्रेम असलें पाहिजे, हा विचार तिच्या मनांत डोकावतो न डोकावतो तोंच तिच्या मुद्रेवर नेहमींची निराशाजन्य छाया पसरली.

हरिहररावांच्या प्रतिकूलतेची भीति न उरल्यामुळें तिनें टीकालेखनाचें काम विशेष उल्हासानें व नेटानें चालवून अल्प अवधींत पारही पाडिलें. तिनें कादंबरींतील गुणांचा जसा योग्य परामर्श घेतला होता तसा दोषांचाही खरपूस समाचार घेतला होता. या दोषाविष्करणानें हरिहर-रावांस मनांतून संतोषच वाटेल अशी तिची अटकळ होती. पण तिला अनुभव मात्र अगदीं उलट आला. तिजकरितां स्वमताचा होम कर-

ण्याची त्यांची तयारी परमकोटीपर्यंत जाऊन पोंचलेली दिसली. टीका-लेखनास लागलेल्या अवकाशांत त्यांनीं कादंबरीचें तिच्यापेक्षांही सूक्ष्म अध्ययन केलेलें दिसलें. त्यांनीं तिच्या शंकांचें बिनतोड समाधान केलें व तिच्या आक्षेपांस इतकीं चोख उत्तरें दिलीं कीं, तिला टीकेंतील दोषाविष्करणाचा भाग संपुष्टांतच आणावा लागला. त्यांची तिजवरील प्रीति 'कौंतेया'वरील द्वेषबुद्धीपेक्षां पुष्कळच अधिक असल्याचें आज निर्विवादपणें सिद्ध झालें. कादंबरींतील गुणांचा मात्र त्यांनीं मुळींच उच्चार केला नाहीं; व तें स्वाभाविकही होतें. मनावर जोरा चालवून शत्रूवरील द्वेषाचें बेमालूम गोपन करणें शक्य असतें; पण तल्लीनतेचें सोंग आणून त्याचीं स्तुतिस्तोत्रें गाणें संयमी मुनींच्याही सामर्थ्यापलीकडचें आहे. म्हणून त्याचें तिला नवल वाटलें नाहीं.

ही टीकाही 'चंद्रिकें'त तिसऱ्याच एका संदिग्ध टोपणनांवानें प्रसिद्ध झाली. ती स्त्रीनें लिहिली कीं पुरुषानें हें लेखाच्या भाषेवरून किंवा टोपणनांवावरून उमगणें या खेपसही शक्य नव्हतें. तरीही टीकेनंतर प्रसिद्ध झालेल्या 'कौंतेया'च्या आभारप्रदर्शक लेखांत टीका स्त्रीनेंच लिहिली असल्याबद्दल अचुक अनुमान काढलें होतें, व अखेरीस तर ती स्त्री पूर्वीं प्रसिद्ध झालेल्या कवितेची व गोष्टीची लेखिका असल्याबद्दलही संशय दर्शविला होता. त्यावरून 'कौंतेय' व अमृतराव ही एकच व्यक्ति असल्याबद्दल 'बाई'ची यापूर्वीं जी खात्री झाली होती तिला स्थैर्य आलें; व तिचें हृदय अमृतरावांबद्दलच्या कृतज्ञतेनें भरून गेलें. उभयतांचें तादात्म्य तिच्या लक्षांत येऊं नये म्हणून 'कौंतेया'नें आपल्या लेखांत खालील मजकूर घातला होताः—"इतकी सहानुभूतिपूर्ण व सदय टीका पुरुषाच्या हातून उतरणें शक्य नाहीं. ज्या पुरुषानें स्वतंत्र रचना केली आहे त्यास स्वसदृश लेखकाशीं तादात्म्य करून घेऊन त्याच्या दोषांबद्दल सहानुभूतिपर दृष्टि ठेवणें कठिण नाहीं. पण अन्य लेखकाच्या दोषपर्वतास परमाणूचें किंबहुना गुणराशीचें रूप देण्याइतक्या उच्च कोटीची आत्मौपम्यबुद्धि वात्सल्यपूर्ण भावी मातेच्याच ठायीं शक्य असणार. प्रस्तुत टीकेंत वत्सलतेप्रमाणें सहानुभूतिही स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेली दिसत आहे;

व त्यावरून प्रस्तुत टीकालेखिकेस स्वतंत्र रचनेचाही अनुभव आला असला पाहिजे या माझ्या तर्कास पुष्टि मिळते. कांहीं महिन्यांपूर्वी ज्या एका लेखिकेच्या काव्याबद्दल व गोष्टीबद्दल अनुकूल अभिप्राय व्यक्त करण्याचा मला सुप्रसंग लाधला होता तीच तर ही लेखिका नसेलना, व प्रस्तुत टीकेस माझ्या अनुकूल अभिप्रायाकडूनच प्रेरणा मिळाली नसेलना, अशीही शंका मला आल्यावांचून रहात नाहीं."

पण 'कौंतेय' म्हणजे अमृतरावच हें जर खरें तर त्यांजबद्दल हरिहररावांना इतका भयंकर द्वेष वाटण्यासारखें भयंकर वर्तन तरी त्यांच्याकडून कोणतें घडलें असावें ही शंका तिच्या मनांत वारंवार उद्भवू लागली, व तिनें तिचें मन अस्वस्थ करून सोडिलें.

आतां 'बाई'ची प्रतिकूलता बरीच मावळल्यासारखी झालेली पाहून हरिहररावांस तिच्या प्राप्तीची आशा वाटावयास लागली. तथापि अजूनही त्यांच्या मार्गांत एक विघ्न होतें. 'बाई'ची लेखनकलेंतील उमेदवारी अजून संपली नव्हती. प्रत्येक प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीस कल्पना व बुद्धि यांचें साहाय्य असावें लागतें. तथापि कांहीं रचना-प्रकारांस बुद्धीच्यापेक्षां कल्पनेचें व इतरांस कल्पनेच्यापेक्षां बुद्धीचें साहाय्य अधिक लागतें. पूर्वोक्त प्रकारच्या निर्मितीची कला 'बाई'ला साध्य झाली होती पण उत्तरोक्त प्रकारच्या रचनेस म्हणण्यासारखा प्रारंभही झाला नव्हता. तिला अजून हहिहररावांच्या मदतीची बरीच जरूर होती. अशा परवश स्थितींत त्यांनीं तिजपाशीं लग्नाची गोष्ट काढली असती तर तिनें तिला मुकाट्यानें आपली मान्यता दिली असती. पण त्या मान्यतेचा फायदा घेणें म्हणजे तिनें त्यांजवर ठेविलेल्या विश्वासाचा घात करण्यासारखें होतें; व तें हरिहररावांसारख्या सुसंस्कृत मनाच्या पुरुषास मुळींच रुचण्यासारखें नव्हतें. सबब त्यांनीं घाई न करितां आणखी कांहीं दिवस वाट पहाण्याचें ठरविलें.

टीकालेखांच्यापेक्षां स्वतंत्र निबंधांचें लेखन बरेंच अवघड असतें; व 'बाई'नें वरील टीकेनंतर त्या लेखनाकडे आपलें लक्ष्य वळविलें. तिनें लघु निबंधांपासून सुरुवात करून पांच सात महिन्यांतच साधारण

विस्तृत निबंधांपर्यंत प्रगति केली. वाचकास पुनरुक्तीच्या भोंवऱ्यांत न गुंतवितां किंवा असंबद्धतेच्या फाट्यांनीं त्याची दिशाभूल न करितां प्रत्ययोत्पादक, आवेशयुक्त व कल्पनारम्य विवेचनाच्या गंभीर, सवेग व उज्ज्वल ओघाबरोबर लेखविषयांत त्याचा प्रवेश करविण्याची कला तिला बरीच साध्य झाली. तिच्या अंगीं जात्याच कवित्वशक्ति असल्या-मुळें केवळ बुद्धिग्राह्य रुक्ष विषयाच्या मरुप्रदेशाचें सुदर कल्पनालतांच्या छायांनीं शीतल, रसनिर्झरिणींच्या ओघांनीं आर्द्र, व्यंग्यार्थरूप कुसुम-गंधानें दरवळलेलें व मधुरशब्दरूपी पक्ष्यांच्या कलरवानें निनादित असें उपवन बनविणें तिला कठिण जात नसे. पहिल्यापहिल्यानें तर चटक-दार कल्पना, सरस वर्णनें, कथापुराणांतील दृष्टांत यांवरच तिचा भर असे. पुढें पुढें ग्रंथवाचनानें व हरिहररावाशीं वादविवाद करून तिची बुद्धि प्रगल्भ व कुशाग्र होऊं लागली, तसतसें तिच्या निबंधांत दृष्टीचा व्यापकपणा, विवेचनाची सूक्ष्मता, प्रमाणाची तर्कशुद्धता, मनाचा सम-तोलपणा इत्यादि गोष्टींचें प्रमाण अधिकाधिक दिसूं लागलें. तरी सुद्धां निबंध प्रसिद्ध करण्याचें तिला धैर्य होईना. अल्प वयांत मनावर कल्प-नेचें वर्चस्व असल्यामुळें अभिनव कथानकें व स्वभावचित्रें आणि अपूर्व प्रसंग व कल्पना निर्माण करणें हुशार लेखकांस फारसें जड जात नाहीं. पण दीर्घ अनुभवानें व विचारसातत्यानें सुचणारा अभिनव युक्तिवाद व कोटिक्रम कालानेंच येत असतो; आणि उष्ट्या पत्रावळींत शिळीं पक्वानें व उष्ट्या द्रोणांत ऊत आणिलेली शिळी कढी वाढून त्यांचें प्रौढ वाचकांकडून सेवन करविणें तिला पसंत पडण्यासारखें नव्हतें. एकाद्या अगदीं नवीन विषयावर बऱ्याच अभिनव व चिंतनीय विचारांनीं भरलेला असा निबंध हातून उतरेपर्यंत प्रसिद्धीचा विचारच करावयाचा नाहीं असा तिचा संकल्प होता; व तो हरिहररावांसही वावगा वाटला नाहीं.

बाबूचें शिक्षण अत्यंत समाधानकारक रीतीनें चाललें होतें. त्यास सामान्य शिक्षणसंस्थेंत एका वर्षांत जें ज्ञान ज्या परिश्रमांत मिळालें असतें त्याच्या दसपट ज्ञान त्यांच्या एकदशांश परिश्रमांत मिळालें होतें. त्या ज्ञानाचा 'बाईस'स मिळालेला मोबदलाही तितकाच मोठा

होता तिनें कल्पनाप्रधान रचनेची कला बरीच हस्तगत केली असून बुद्धिप्रधान रचनेंतही बरीच प्रगति केली होती. आतां तिच्यांत जी कमतरता राहिली होती ती तिला स्वतःच्या प्रयत्नानेंही भरून काढितां आली असती. तिचा एकादा स्वतंत्र निबंध प्रसिद्ध झाला म्हणजे तिला मागणी घालावयाची असा हरिहररावांचा विचार होता. पण मध्यंतरीं अशी चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न झाली कीं, त्यांना तो विचार बाजूस ठेवून ती अट पुरी होण्यापूर्वीच मागणी करणें अपरिहार्य होऊन बसलें. ते 'बाई'स शिकवीत तेव्हां जवळच बजाबा व बाळूबाई बाह्यात्कारीं हातांतलीं कामें करीत पण वास्तविकपणें उभयतांच्या हालचालींचें सूक्ष्म निरीक्षण करीत बसत असत हें मागें आलेंच आहे. सुंदर तरुणतरुणींनीं परस्परांशीं नात्याचा कांहीं संबंध नसतां रोज रात्रीं चारचार घटका निकट सहवासांत घालवाव्या ही गोष्ट त्यांना अपूर्व होती. त्यांतून त्या तरुणतरुणींच्या मुद्रांवरून, आविर्भावांवरून किंबहुना गोपनयत्नांवरूनही त्यांचें परस्परांवर गाढ प्रेम असल्याचें ओळखणें त्यांच्या अनुभवी दृष्टीस दुर्घट नव्हतें. आपल्या मालकाच्या व 'बाई' च्या निर्मल अंतःकरणांबद्दल व शीलांबद्दल त्यांची खात्री होती. पण त्यांजकडून त्यांच्या शीलास न शोभणारें कृत्य जरी घडलें नाहीं तरी लौकरच तीं विवाहसंबंधानें बद्ध होणार याबद्दलही त्यांची तितकीच खात्री होती. त्यांचे परस्परांत चालणारे नेत्रसंकेत लौकरच हरिहर-रावांच्या लक्ष्यांत आले, व ते 'बाई' च्या दृष्टीस पडणें मुळींच इष्ट नसल्यामुळें त्यांनीं त्यांस एकीकडे गांठून त्यांचा समज दूर करण्याचा प्रयत्न केला. वृद्ध सेवक बहिरे असल्यामुळें; हा प्रयत्न अंशतः हलक्या आवाजांतील अस्पष्ट भाषणाच्या रूपानें व अंशतः संदिग्ध अभिनयाच्या रूपानें झाला. असाच प्रयोग एकदां दुष्यंताकडून विदू-षकावर झाला होता. पण त्या प्रसंगीं दुष्यंतास मोठ्यानें बोलावयास प्रत्यवाय नसल्यामुळें व विदूषकाचे कानही शाबूत असल्यामुळें दुष्यंतास विदूषकाचा ग्रह दूर करितां आला. तो इतका कीं, पुढें शापानें दुष्यंताची स्मृति नष्ट झाली असतां त्यास शकुंतलेवरील प्रेमाची आठवण करून देण्याचें कारणही त्याला दिसलें नाहीं. पण बिचाऱ्या हरिहररावांस

त्यांपैकीं एकही सोय नव्हती. यामुळें त्यांच्या स्पष्टीकरणानें त्यांच्या वृद्ध सेवकांचा समज उणा होण्याऐवजी दुणावला मात्र. आपल्या मालकाचा आशय आपणास पूर्णपणें कळला असें त्यांनीं त्यास माना हलवून दर्शविलें, व तेव्हांपासून त्यांचे नेत्रसंकेत बदहि पडले. पण त्यांच्या मनातील रहस्यास नेत्रांवाटे बाहेर पडण्याची बंदी होतांच जिभांवाटे तोंड फुटलें, आणि त्यांनीं भेटेल त्याच्यापाशीं पोटउकला करण्यास सुरुवात केली. त्यांनीं आपला तर्क बाबूपाशीं बोलून दाखविला असल्याबद्दल मागील एका प्रकरणांत आलेल्या बाबूच्या उद्गारांवरून हरिहररावांची खात्री झाली. पण त्या प्रसंगीं ते त्या गोष्टीनें राग येण्याच्या स्थितींत नव्हते. वृद्धांच्या ठायीं आपापरभाव मुळींच नव्हता. त्यांनीं शेजाऱ्यांसही आपल्या विश्वासांत घेतलें. आपण केलेल्या रहस्यस्फोटाचा पत्ता आपल्या यजमानास लागू न देण्याची खबरदारी घेण्याबद्दल मात्र त्यांनीं प्रत्येक शेजाऱ्यास बजाविलें. त्याचा अर्थ तें रहस्य हरिहररावांशिवाय कोणासही सांगण्यास हरकत नाहीं असा घेऊन शेजाऱ्यांनीं त्याचा फैलाव करण्यास यथाशक्ति मदत केली. खुल्या हवेंत प्रवास करणाऱ्या आगगाडीपेक्षां भूगर्भातून प्रवास करणाऱ्या आगगाडीचा वेग अधिक असतो कीं काय हें माहीत नाहीं. पण दवंडीनें जाहीर केलेल्या बातमीपेक्षां कुजबुजीनें स्थलांतर करणाऱ्या बातमीचा प्रवास फार सपाट्यानें होत असतो हें मात्र खास. शिवाय गुप्तपणें संचरणारी बातमी प्रवासांत क्षीण होण्याऐवजीं पुष्ट बनत असते. हरिहरराव व 'बाई' यांच्या परस्परप्रेमाच्या बातमीस ओठांच्या व कानांच्या लाबलचक शृंखलेंतून प्रवास करितांना लौकरच उभयतांच्या भावी विवाहाच्या वार्तेचें स्वरूप प्राप्त झालें; व त्या स्वरूपांत ती हरिहररावांच्या पूर्वनिर्दिष्ट दूरस्थ स्नेह्याच्या कानावर गेली. त्या बातमीचें स्वरूप इतकें विपर्यस्त झालें होतें कीं, त्याचा तिजवर विश्वास बसेना. वधू हरिहररावांच्या अल्पवयी मुलाची पगारी शिक्षिका आहे यामुळें बातमीचें रूपांतर वधू पांच सहा वर्षांची असून ते तिच्या बापापासून जबर हुंडा घेणार आहेत या दंतकथेंत झालें होतें. लोकवार्तेनें विवाहाचा मुहूर्त अगदीं जवळचा धरिला होता.

निश्चित तिथीपूर्वीं स्नेह्याचें पत्र हरिहररावांच्या हातीं पडणें शक्य नव्हतें. सबब त्यानें त्यांचें तारेनें अभिनंदन करून शिवाय त्यांस एक विस्तृत पत्रही पाठविलें. त्यांत त्यानें खरा प्रकार माहीत करून घेण्यासाठीं हरिहररावांचीं बालविवाहाविरुद्ध व हुंडा घेण्याच्या विरुद्ध असलेलीं मतें कनक व कांता या जोडगोळीपुढें जमीनदोस्त झाल्याबद्दल त्यांची मनसोक्त थट्टा केली होती. हरिहर-रावांस तारेचा अर्थ मुळींच कळेना. तारेंत मागाहून पत्र येत आहे असें आश्वासन होतें त्या पत्रानें तरी तारेंतील मजकुरावर प्रकाश पडेल या आशेनें ते पत्राची वाट पहात बसले. पण पत्रानें त्यांना पूर्वीपेक्षांही बुचकळयांत पाडिलें आपण एका लहान मुलीशीं लग्न करणार असून तिजबद्दल हुंडाही घेणार आहोत ही बातमी पसरली कशी व तिजवर लोकांचा विश्वास तरी कसा बसला याचें त्यांना मोठें गूढ पडलें. बराच वेळ विचार केल्यावर त्या बातमीचा मूळ उगम त्यांच्या लक्षांत आला;व त्यांना आपल्या बहिऱ्या व बडबड्या नोकरांचा मनस्वी रागही आला. पण तो राग बाहेर दाखविण्याऐवजीं मनांत दाबून ठेवण्याचेंच त्यांनीं ठरविलें. न जाणो राग प्रकट केल्यास लोकवार्तेस चालन मिळून ती विवाहावरच न थांबतां आपल्या पदरीं त्याचें अपत्यरूप फळही बांधा-वयाची! या बाबतींत नोकरांशीं न बोलण्याचा जसा त्यांनी सकल्प केला तसा ‘ बाई ’ पाशीं लग्नाची गोष्ट काढून सोक्षमोक्ष करून घेण्या-चाही केला. त्या कामीं दिरंगाई करणें म्हणजे लोकवार्तेस त्या बिचा-रीच्या अब्रूशीं वाटेल तशी दांडगाई करण्याचा परवाना देण्यासारखेंच आहे, लोकवार्तेच्या अटकळीप्रमाणें आपला विवाह झाला नाहीं हें कळतांच ती चिडून उभयतांवर वाटेल ते कुत्सित आरोप करण्यासही कच-रणार नाहीं, असा विचार करून ते ‘ बाई ’ पाशीं विवाहाची गोष्ट काढण्याच्या संधीची वाट पहात बसले.

———

# प्रकरण ८ वें

ती संधि मिळण्यास त्यांना फार वेळ कुचंबत बसावें लागलें नाहीं. ती त्यांजकडे आपण होऊन चालत आली. ते आपल्या खोलींत व्यग्र चित्तानें बसले असतां 'बाई' हातांत कागदांचें एक पुडकें घेऊन आंत आली, व तिनें तें त्यांच्या हातीं दिलें तो तिनें लिहिलेला निबंध होता. निबधाचा विषय 'पतिपत्नींचें तादात्म्य' हा होता. पितापुत्र, बंधुभगिनी इत्यादि आप्तांमधील नैसर्गिक बधनें आरंभीं जरी दृढ असलीं तरी कालांतरानें व परिस्थितिभेदानें शिथिल होत जातात उलट पक्षीं पतिपत्नी विवाहापूर्वी भिन्न व अपरिचित असली तरी त्यांजमध्यें विवाह-संबंधानें उत्पन्न होणारें बंधन कृत्रिम असतांही जिव्हाळयाचें असतें, व त्यास अधिकाधिक परिचयानें व अपत्यादि नवीन नवीन बधनांनीं दृढता येत जाते. पतिपत्नी पूर्णपणें एकरूप असावयास त्यानीं विवाहा-पूर्वी परस्परांची निवड केली असली पाहिजे व विवाहानतर परस्परांशीं निष्कपटपणें वागलें पाहिजे. त्यांजमध्यें कृत्रिम दुजाभाव किंवा रहस्य थोडेंसेंही असतां कामा नये. विवाहानें त्यांचीं शरीरेंच एक होतात असें नसून मनेंही एक होतात. त्यांचे विचार, भावना व सुखदुःखें एकच असलीं पाहिजेत. त्यांच्या कृत्यांस एकाच हेतूपासून प्ररणा मिळाली पाहिजे. पतिपत्नींचें हें तादात्म्य म्हणजे संसारांतील सर्गात होय. संसाराचा मार्ग अडचणीचा, खांचखळग्यांचा व कटकमय असला तरी त्यानें सुगम, सम व निष्कटक वाटतो. याप्रमाणें निबंधाचें सार होतें. कवितेच्या, गोष्टीच्या व टीकेच्याप्रमाणें निबंधाचाही विषय 'बाई' स स्वतःच्या अतःकरणांत चाललेल्या खळबळीवरूनच सुचला होता हें उघड होतें. स्वानुभवावरून लिहिलेल्या प्रत्येक निर्मितींतल्याप्रमाणें या निबंधांतही अकृत्रिमपणा, जिवंतपणा व ताजेपणा भरलेला होता.

हरिहररावांस निबंध पूर्णपणें पसंत पडला. आपल्या अंतःकरणांतील खळबळ व निबंधाचा विषय यांचा मेळ हा एक शुभ शकुन समजून त्यांनीं इतके दिवस मनांत प्रयासानें दाबून ठेविलेल्या आपल्या मनी-षेचा स्फोट करण्यास सुरवात केली. ते 'बाई' स म्हणाले, "हा

निबंध आत्मप्रत्ययावरून लिहिलेला असल्यामुळें प्रत्ययोत्पादक झाला आहे. तुमच्याही मनांत लग्नाचे विचार घोळूं लागले तर?"

'बाई' चें तोंड लज्जेनें आरक्त झालें; तथापि ती अंगीं उसनें धैर्य आणून म्हणाली, "माझ्या वयानें विवाहकालाची मर्यादा कधींच ओलांडिली आहे."

"शरीरविकासाच्या दृष्टीनें ओलांडिली असेल. पण मनाचा विकास हा शरीरविकासाइतकाच महत्वाचा आहे, व तो पूर्ण होण्यास इतके दिवस कौमार्यावस्थेंत घालविणें जरूरच होतें.आतां मात्र तुमच्या ध्येय-प्राप्तीच्या दृष्टीनें तुमचा मनोविकास पूर्ण झाला आहे व मी तुमच्या शिक्षणा-संबंधानें अंगावर घेतलेल्या जबाबदारींतून मोकळा झालों आहें असें म्हणण्यास हरकत नाहीं. माझ्या विवाहासंबंधानें आपण कांहीं दिवसां-पूर्वी चर्चा केली होती, तशी तुमच्या विवाहासंबंधानें व्हावी अशी माझी किती तरी दिवसांपासून इच्छा आहे. पण ती पूर्ण होण्याच्या मार्गांत तुमच्या शिक्षणाची अपूर्णता आड येत होती. आतां मात्र ती अडचण नाहींशी झाली आहे. आणखीहि कांहीं दिवस मुग्धता स्वीकारण्याचा माझा विचार होता. पण या तारेनें आणि पत्रानें तुमच्या व पर्यायानें माझ्याही विवाहाची चर्चा ताबडतोब होण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे."

इतकें बोलून त्यानीं आपल्या स्नेहाची तार व पत्र 'बाई' च्या हातीं दिलीं. तिनें तीं घाईघाईनें वाचून त्यांस परत दिलीं आणि म्हटलें "अगदीं अशक्य! ज्यांना म्हणून आपल्या तत्त्वनिष्ठेचा व निःस्पृहतेचा अनुभव आहे त्यांना आपण हुंड्याच्या लोभानें गुडघ्याएवढ्या मुलीशीं लग्न करा-यला तयार व्हाल हें कल्पांतीं खरें वाटणार नाहीं."

"ही बातमी अत्युक्तिप्रिय गोष्टीवेल्हाळांनीं फुगविलेली असली तरी तिच्या मुळाशीं सत्याचा अंशही नाहीं असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं."

'बाई' नें आश्चर्यानें भिवया वर चढवून म्हटलें, "म्हणजे?"

"माझें दुसरें लग्न निश्चित जरी झालें नाहीं तरी त्याची अर्धीमुर्धी

तयारी झाल्यासारखीच आहे. प्रौढ विवाहाचें प्रेम हें आवश्यक अंग आहे हें तुम्हीच आपल्या निबंधांत म्हटलें आहे."

"आपलें प्रेम एका गुडघ्याएवढ्या मुलीवर?"

"गुडघ्याएवढ्या मुलीवर जरी नसलें तरी तितक्याच उंचीच्या मुलाच्या शिक्षकिणीवर बसलें आहे यांत संशय नाहीं, आणि वडाची साल पिंपळास लावणाऱ्या गप्पाबहाद्दरांनीं शिष्याचें वय शिक्षिकेस चिकटविलें असल्यास नवल काय!"

हरिहररावांचा आशय 'बाई'च्या पूर्णपणें लक्षांत आला. ती कांहींशी जिज्ञासेनें व कांहींशी विषयांतर करण्याच्या हेतूनें म्हणाली, "आणि हुंडा घेतल्याची गप्प कशी उठली?"

"तुमच्यामाझ्यांत झालेले करारमदार लोकांना काय माहीत? तुम्हीं पगारी आहांत असाच त्यांचा समज असावयाचा. मी तुम्हांस पगार देतों याबद्दल तुमच्या वडिलांनीं मला हुंडा दिला हा अल्प फरक लोक-वार्तेस तरी खास क्षम्य आहे."

"असें!"

"विवाहास एकाच पक्षाचें प्रेम असून उपयोग नाहीं. उभयपक्षांचें परस्परांवर असावें लागतें. त्याशिवाय त्यांचें आत्मिक तादात्म्य शक्य नाहीं. याचें स्पष्टीकरण मी करीन त्यापेक्षां सरस रीतीनें तुम्हींच आपल्या निबंधांत केलें आहे. मला स्वतःच्या प्रेमाबद्दल जरी तुमची दृष्टभेट झाल्यापासून खात्री होती तरी तुमच्या प्रेमाबद्दल प्रथम शंका व नतर निराशा वाटूं लागली. अलीकडे मात्र आशेचा अंधुक किरण दिसूं लागला आहे."

"आपणांसारख्यांना वास्तविक पहातां कोणत्याही बाबतींत निराशा वाटण्याचें कारण नसावें. रूपादि बाह्य गुण जरी बाजूस ठेविले तरी आपली बुद्धिमत्ता, लेखनकौशल्य, उदार स्वभाव, प्रेमळ अंतःकरण..."

स्वतःची स्तुति असह्य होऊन कीं काय, हरिहरराव तांतडीनें म्हणाले, "तुम्ही म्हणतां ते सारे गुण माझ्या अंगीं आहेत हें जरी गृहीत धरिलें

तरी अंधळें म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रेमाच्या बाबतींत त्यांचा काय उपयोग ? त्यांतून मला प्रतिस्पर्धी नसता तर माझें कार्य इतकें अवघड नसतें. पण ज्या प्रतिस्पर्ध्यानें माझ्या लेखनसंसाराच्या आरंभींच त्यांत खिब्बा घातला तोच माझ्या खऱ्या संसाराचीही धूळधाण उडवीत आहे असें दिसतांच माझें मन साहजिकच डगमगून गेलें. तुम्ही लिहिलेली गोष्ट वाचून तर माझा धीर अगदींच सुटला "

" माझ्या गोष्टीवरून आपण काढिलेलें अनुमान चुकीचें होतें असें मी त्याच वेळीं आपणांस बजाविलें होतें."

" पण तुमच्या प्रेमाची स्पष्ट किंवा गर्भितही कबुली तुमच्या उद्गारांत कधींच आली नाहीं. उलट तुम्ही कौंतेयाचाच नेहमीं कैवार घेत असां. त्यावरून मला तुमचें त्याजवर प्रेम असल्याची शंका येणें साहजिक होतें. अजून तरी तुमच्या प्रेमाची आशा धरावयास मला जागा आहे असें मीं समजू का ?"

" कवितेवर 'चंद्रिके'त अभिप्राय आला तेव्हांपासून 'कौंतेय' म्हणजे 'चंद्रिके'चे संपादक अमृतरावच असा माझा समज झाला होता; व तो समज अलीकडे जरी डळमळला आहे तरी मधून मधून तो वर डोकें काढितोच. आतां अमृतराव तर मला पितृतुल्य आहेत. मग माझें 'कौंतेया'वर प्रेम जडावें कसें ?"

"पण अमृतराव तुम्हांला पितृतुल्य आहेत हें मला काय माहीत ?"

" 'कौंतेया'चें नांव, गांव, रंगरूप हीं मला माहीत नाहींत असा तर आपला समज होताना ? मग माझें त्यांजवर प्रेम जडणें आपणांस शक्य कां वाटावें ? निर्गुण भक्तींत सगुण भक्तीचा ओलावा येणें शक्यच नाहीं."

" कां बरें ? तुमच्या कथेंतील नायिकेचें प्रेम निनांवी लेख लिहिणारावर नाहीं कां जडलें ? तिनें त्याजविषयींच्या आपल्या कल्पनेला मूर्त स्वरूप देऊन त्याची मानसपूजा चालविली होतीच कीं नाहीं ?"

" ती सारी कल्पना होती. मीं वास्तवीक प्रकारांस कल्पनेनें अगदीं

विपर्यस्त रूप दिलें. मुलाच्या वडिलांचें रूप मनांत ठसण्यासारखें असतां मीं तिच्या मनांत त्यांजविषयीं तिटकारा उत्पन्न केला. नायक टोपणनांवानें लिहिणारा लेखक वास्तविक सृष्टींत भिन्न असतां मीं एकच कल्पिले. त्याचप्रमाणें अमूर्त कल्पनेस मूर्त रूप येऊन त्याजवर उत्कट प्रेम जडणें शक्य नसतां मीं तें जडावयास लाविलें. यांपैकीं एकही गोष्ट विचारसंगतच्या नियमास सोडून नव्हती. माझें उद्दिष्ट साधण्याकरितां मीं खऱ्या प्रकारांपैकीं कांहींस याप्रमाणें पूर्णपणें विपरीत रूप दिलें, तर बाकीचे प्रकार बदलण्याची जरूर नसल्यामुळें तसेच राहूं दिले बालकाचें गोड रूप, त्याचें नायिकेकडून होणारें संगोपन, टोपणनांवाखालीं येणाऱ्या लेखांचें उत्कृष्टत्व या साऱ्या गोष्टी सत्य-सृष्टींतल्याच आहेत."

"येथें माझा थोडासा मतभेद आहे. या यादींत नायिकेचें गोड रूप घालून तिच्यांतून त्या लेखांचें उत्कृष्टत्व काढून टाकावयास पाहिजे"

"इतका खुलासा होऊनही आपला मत्सर कायमच आहे त्याअर्थी त्याला 'कौंतेया' नें आपल्या लेखनसंसारांत किंवा गृहस्थाश्रमांत आणिलेल्या विघ्नाहून अगदीं भिन्न व बलवत्तर कारण असलें पाहिजे."

"असलें तरी त्याचा प्रस्तुताशीं कांहीं संबंध नाहीं. तुम्ही माझा स्वीकार करण्याला तयार आहांत येवढी गोष्ट मला बस्स आहे."

"आपणांला ती पुरेशी वाटली तरी मला तशी वाटत नाहीं."

"म्हणजे ? हें काय आणखी नवीनच ?"

"मीं आपल्या निबंधांत असें प्रतिपादिलें आहे कीं पतिपत्नींस विवाहापासून होणाऱ्या सुखाचा पूर्ण आस्वाद घ्यावयाचा असेल तर त्यांजमध्यें एकही रहस्य राहतां कामा नये. 'कौंतेया' चें रहस्य मजपासून लपवून ठेवण्यांत आपणांकडून त्या नियमाचा भंग होत आहे."

"पण रहस्यरक्षणाच्या दोषास मी एकटाच पात्र आहें असें नाहीं. तुम्हीही त्या दोषांत वांटेकरीण आहांत. तुम्हीं आपलें पूर्व चरित्र

मजपासून अत्यंत दक्षतेनें लपवून ठेविलें आहे. सबब त्या दोषाचा एक-मेकांवर आरोप करण्याऐवजीं उभयतांच्या दोषांची फिटंफाट झाली असें समजून चालावयाला हरकत नाहीं. तुमच्या पूर्व चरित्राचें ज्ञान नसतांच तुमच्याशीं विवाहबद्ध होण्याला मी तयार आहें."

"माझें कुलशील न कळतांच आपण लग्नाला तयार होणार ?"

"तुमचें कुलशील उच्च प्रतीचें असल्याबद्दल तुमच्या मुद्रेवरील प्रत्येक रेषा, तुमच्या चलनवलनांतील प्रत्येक हालचाल, तुमच्या भाषणांतील प्रत्येक शब्द साक्ष देत आहे. तुमचा भूतकाल वर्तमानकालाच्या प्रत्येक क्षणांत सांठविलेला स्पष्ट दिसत आहे. तुमचें कुलशील व पूर्व वृत्त याहून निराळें तें काय असणार ? मला तर त्यांत मुळींच रहस्य वाटत नाहीं."

"रहस्य वाटत नाहीं तर त्याच्या रक्षणाचा मजकडे दोष तरी कसा येणार ? आणि उभयतांच्या दोषांची फिटफाट तरी कशी होणार? पण याप्रमाणें शब्दच्छल न करितां मी कोण तेंच आपणांला सांगतें. तें ऐकण्याला आपण मन घट्ट केलें पाहिजे. तें ऐकल्याबरोबर आपली माझ्याशीं लग्न करण्याची इच्छाच नाहींशी होईल."

"तसें होणें शक्यच नाहीं."

"मग ऐका तर. मी आपल्या एका हाडवैऱ्याची मुलगी आहें. कचानें ज्याप्रमाणें संजीवनीविद्येची प्राप्ति करून घेण्याकरितां दैत्यगुरूंचे अंतेवासित्व पत्करिलें त्याप्रमाणें मी केवळ आपली लेखनकला हस्तगत करण्यासाठींच आपणांपाशीं उमेदवारी करीत इतके दिवस राहिलें. माझें खरें स्वरूप आपणांला माहीत असतें तर आपण मला शिष्या म्हणून पत्करण्याला तयार झालां नसतां या साधार भीतीनें मीं एक खोटेंच नांव धारण केलें. आपणांला खोट्या नांवाबद्दल जो तिरस्कार वाटतो त्यानें मजबद्दल वाटणाऱ्या शत्रुभावांत भर पडून माझें दर्शनही आपणांस नकोसें होईल हें मी जाणून आहें. पण होऊं नये ती गोष्ट होऊन गेली. ती परत आणणें माझ्या हातीं नाहीं. आपली क्षमा मागणें एवढेंच माझ्या हातीं आहे."

"तुम्ही माझ्या हाडवैऱ्याचें अपत्य? शक्य नाहीं. मी एकही हाडवैरी नाहीं."



" 'कौंतेयां'च्या प्रतिस्पर्ध्यानें तरी असें म्हणूं नये."

"काय? 'कौंतेया'चा आणि तुमचा आप्तपणा? शक्यच नाहीं. 'कौंतेय' कोण हेंच मुळीं तुम्हांला माहीत नाहीं. मग त्याच्याशीं आप्तपणा आहे हें तरी कुठून माहीत असणार?"

"माझा व 'कौंतेया'चा आप्तपणा नसला तरी अप्रत्यक्ष ऋणानुबंध आहे."

"म्हणजे? तुमचें अमृतरावांशीं कांहीं नातें आहे कीं काय?"

"मी त्यांचीच मुलगी 'चंद्रिका'"

"अस्सें! तरीच तुम्ही एकदां 'चंद्रिका' कार्यालयांत आपला वशीला असल्याबद्दल बोलून गेलां होतां."

"बाबांनीं माझ्या बारशाच्या दिवशीं तें मासिक काढिलें व त्यास माझेंच नांव दिलें. त्यांच्यामागें त्या मासिकाचें संपादन मजकडून व्हावें अशी त्यांची प्रथमपासूनच इच्छा होती त्याकरितां त्यांनीं मला पुणें येथील महिलाविद्यापीठाच्या विद्यालयांत शिकावयास ठेविलें. तेथें असतांना मला 'दीनकिंकर' शिष्यवृत्ति मिळत होती."

"अस्सें! म्हणूनच मी 'कौंतेया' बरोबर 'दीनकिंकरा'ची निंदा करीत असतां तुम्हाला रागाचा इतका उभाळा आला! आतां सगळा ग्रंथ लागला."

"मी शेवटच्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत पहिली आलें. पण तेवढ्यानें बाबांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यांना मला यशस्वी संपादिका करावयाचें होतें व त्याकरितां मला एकाद्या प्रसिद्ध लेखकाच्या हाताखालीं लेखनकला शिकावयास ठेवणें भाग होतें. बाबांच्या मतें माझ्या संपादकयि शिक्षणाची जबाबदारी घेण्यास बुद्धिमत्तेनें व शीलानें महाराष्ट्रांत दोनच पुरुष योग्य होते. एक 'कौंतेय' व दुसरे आपण. 'कौंतेयां'चें रहस्य गुप्त ठेवणें भाग असल्यामुळें माझ्या गुरुस्थाना-

करितां आपलीच निवड करण्यांत आली. 'कौंतेय' म्हणजे बाबाच या गोष्टीचा त्या वेळीं मला संशयही नसल्यामुळें मी त्या योजनेला कबूल झालें. आमचा बेत ठरण्याच्या कांहीं दिवस पूर्वी आपली जाहिरात आली होती. तिचाच फायदा घेऊन मीं आपणांस पत्र पाठविलें. याप्रमाणें मीं आपणांकडे बाबूची शिक्षिका व आपली शिष्या या दुहेरी नात्यानें आलें ती बाबांच्या प्रेरणेनेंच आलें. आपल्या कृपेनें 'चन्द्रिका' मासिकाचें भलेंबुरें संपादन करण्याचें सामर्थ्य मजमध्यें आलें आहे. माझ्या रहस्यस्फोटानें माझें अध्ययन अर्धवट रहाण्याची आतां भीति उरली नाहीं. माझ्या वडिलांच्या शत्रुभावाकडे पाहून आपण माझा अव्हेर केलात तर मी बाबांकडे परत जाऊन मासिकाच्या संपादनाचे कामीं त्यांना मदत करीत कौमार्यावस्थेंत आयुष्य कठीन."

"तुमच्यासारख्या सुंदर, विद्वान् व चतुर स्त्रीस जन्मभर कौमार्यावस्थेंत रहाणें शक्य नाहीं. तुमचे वडील तुमचा विवाह आपल्या सहकारी संपादकाशीं म्हणजे 'कौंतेयां'शीं उरकतील असाच विशेष सभव आहे. तसें होण्यापेक्षां मीच तुमच्या वडिलांचें वैर विसरून तुम्हाशीं लग्न करण्याला तयार आहें."

"पण 'कौंतेय' म्हणजे जर बाबाच असतील तर माझा विवाह 'कौंतेयां'शीं होण्याची आपणांला भीति कां वाटावी?"

"'कौंतेय' व अमृतराव या परस्परांहून अगदीं भिन्न व्यक्ति आहेत अशी माझी पुरी खात्री आहे, व तशी मीं तुम्हांला सूचनाही केली होती जर त्या व्यक्ति एकच असत्या तर अमृतरावांनीं तुम्हांला स्वतःच शिकवावयाचें सोडून शत्रूच्या गोटांत एकट्याच पाठविणें शक्य झालें असतें का?"

"मग कवितेचा, गोष्टीचा व टीकेचा लेखक स्त्रीजातीचा आहे ही गोष्ट 'कौंतेयां'स कशी कळली?"

"ती त्यांस अमृतरावांकडून कळली असेल."

"पण मीं बाबांना लिहिलेल्या पत्रांत ती अगदीं गुप्त ठेवण्याची

मुद्दाम सूचना केली होती. जो संपादक सामान्य लेखकांचीं नांवें गुप्त ठेवण्यांत पूर्ण दक्षता बाळगतो तो स्वतःच्या अपत्याचें नांव दुसऱ्यास सांगेल हें संभवत नाहीं."

"तो दुसरा इसम भावी जांवई असल्यावर सांगण्यास हरकत कोणती?"

"'कौंतेय' ही व्यक्ति बाबांहून निराळी असल्याबद्दल आपण जें इतक्या खात्रीनें सांगत आहांत त्याला तसेंच कांहीं कारण असेल. कदाचित् तिचें खरें नांवही आपणांस माहीत असेल."

"तें मला माहींत आहे हें मी कबूल करितों, व म्हणूनच मला तुमचें तिच्याशीं लग्न होण्याची भीति वाटते."

"पण बाबांचा मला 'कौंतेयां' स देण्याचा संकल्प झाला असल तर तो मोडून ते आपणांला—प्रत्यक्ष त्यांच्या शत्रूला—आपली मुलगी देण्याला कसे तयार होतील?"

"तुम्हांस वाटतें तितक्या तीव्र स्वरूपाचें आमचें वैर नाहीं. माझ्या कादबरीवर 'चन्द्रिकें' त टीका येण्यापूर्वी तर माझा आणि त्यांचा चांगला स्नेहही होता. शिवाय जे अमृतराव आपल्या मुलीस लेखन-कलेची चोरी करण्याकरितां मजकडे निर्धास्तपणें पाठवितात ते तिनें त्या कलेच्या जोडीस माझ्या हृदयाचीही चोरी केली तर रुष्ट होतील असें वाटत नाहीं. आपल्या विवाहास त्यांची संमति मिळण्याची मला खात्री वाटते."

"पण जोंपर्यंत आपणा उभयतांमध्यें 'कौंतेया' संबंधाचें रहस्य आहे तोंपर्यंत मला आपणांशीं लग्न करितां येणार नाहीं."

"तें रहस्य योग्य कालीं तुम्हांला सांगण्याचें मी अभिवचन देतों."

"आणखी दुसरा योग्य काळ तो कोणता असणार? माझ्या जागीं दुसरी एकादी स्त्री असती तर वेळ मारून नेण्याची ही एक बतावणी आहे असेंच तिनें मानिलें असतें."

"पण तुमचा तर मजवर विश्वास आहेना?"

" आपलें ' कौंतेया ' संबंधाचें आजपर्यंतचें वर्तन इतकें संशयास्पद आहे कीं त्यानें दुसऱ्या कोणाचाही आपणांवरील विश्वास ढळला असता. पण माझा आपणांवरील विश्वास अजूनहि अचल आहे. "

" याबद्दल मी तुमचा सदैव ऋणी राहीन. "

" पण नुसता माझा विश्वास असून उपयोग काय ? आपलाही मजवर तितकाच विश्वास पाहिजे; व आपण मजपाशीं तें रहस्य सांगण्याला जे आढेवेढे घेत आहांत त्यावरून आपला मजवर विश्वास नसल्याचें स्पष्ट होत आहे. पतिपत्नींचीं अंतःकरणें एकजीव झाल्यावांचून त्यांजमध्यें पूर्ण तादाम्य उत्पन्न होणें शक्य नाहीं. "

" मी हे आढेवेढे घेण्याचें कारण तुम्हांला कळलें तर तुम्ही त्याबद्दल मला खास दोष देणार नाहीं. त्याचें कारण तुमच्यावर माझा विश्वास नाहीं हें नव्हे. माझा स्वतःवर जितका विश्वास आहे तितकाच तुमच्यावरही आहे, यास ईश्वरच साक्ष आहे. "

" मग दुसरें कोणतें कारण असणार ? "

" तें रहस्य दुसऱ्यास एका अटीवरच सांगण्याची मीं शपथ घेतलेली आहे. "

" ज्या स्त्रीचा व आपला लौकरच एकजीव होण्याची आपण अपेक्षा करितां तिला आपण परकीच समजतां का ? "

" जेव्हां मीं शपथ घेतली तेव्हां मला तुमच्या मधुर सहवासाची कल्पनाही नव्हती माझी शपथ केवढ्या मोठ्या कसोटीला लागणार आहे याचें मला त्या वेळीं स्वप्न पडलें असतें तर ती शपथ मीं घेतलीही नसती. "

" बरें, ज्या अटीवर रहस्यस्फोट करण्यास आपण स्वतःला बांधून घेतलें आहे ती अट तरी कळेल का ? "

" ती अटही मला सांगतां येत नाहीं; तिचें स्वरूप मात्र सांगतां येईल. ती अट पुरी झाली तर माझा व तुमचा विवाहच व्हावयाचा नाहीं. "

" आणि ती पुरी झाली नाहीं तरीही तो होणें नाहींच. "

" कृपा करा आणि असें म्हणूं नका. तुमच्या या अटीनें मी मोठ्या पेचांत पडल्यासारखा झालों आहें. "

" आपल्या अटीनें मलाही तसाच पेंच पडला आहे मीं निबंधांत प्रतिपादिलेलें तत्त्व आचरणांत उतरविलें नाहीं तर मी आपली पत्नी होण्यास योग्यच नाहीं असें ठरेल. उलट पक्षीं आपली अट पार न पडतांच आपण रहस्यस्फोट केला तर आपणांकडून वचनभंग होऊन आपली योग्यता हिणकस ठरेल. यांपैकीं एकही गोष्ट आपल्या किंवा माझ्या स्वाभिमानास पटण्यासारखी नाहीं. आपणांपैकीं एकाची योग्यता हीन ठरून उभयतांचा विवाह होऊं नये अशी ईश्वराचीच इच्छा दिसते "

" त्याचीच तशी इच्छा असेल तर तिला सादर झालेंच पाहिजे. बरें निदान बहीणभावंडांप्रमाणें परस्परांच्या सहवासांत रहाण्याला तरी तुमची हरकत नाहीं ना ? "

" उभयतांच्या एकमेकांबद्दल काय भावना आहेत याची इतकी वाच्यता झाल्यावर यापुढें एका घरांत रहाणें मुळींच इष्ट नाहीं. शिवाय या बाबतींत आपणाला मनाप्रमाणें जनाकडेही पाहिलें पाहिजे. ज्या लोकांनीं आपल्या गुप्त भावनांच्या अहेतुपूर्वक प्रकटीकरणाच्या आधारावर विवाहाचें अवाढव्य जाळें तयार केलें, त्यांनीं आपल्या शरमिंद्या चेहेऱ्यांच्या जोरावर कुतर्कांचे टोलेजंग मनोरे उठविले तर त्यांत नवल वाटावयास नको; व त्यांना दोष देण्याचा हक्कही आपणास रहाणार नाहीं. "

" खरेंच ! तें मी विसरूनच गेलों होतों. तर मग तुम्हांला परत वडिलांच्या घरीं गेलेंच पाहिजे ? "

" त्याला उपायच नाहीं. "

" बाबूलाही सोडून जाण्याइतक्या तुम्ही कठोर होणार ना ? "

" कर्तव्य नेहमीं असेंच कठोर असावयाचें."

" तुम्ही गेल्यावर त्याला येथें करमणार कसें हाच मजपुढें प्रश्न येऊन पडला आहे. दुसऱ्याच्या हातचें खाण्यापेक्षां तो उपाशी राहील. दुसऱ्याच्या हातचें पिण्यापेक्षां तो तान्हेलेला राहील. त्याचें अभ्यासाकडे लक्ष लागणार नाहीं. त्याला आपलीं पुस्तकें नकोशीं होतील. दुसऱ्यापासून शिक्षण घेण्यापेक्षां अज्ञानी रहाणेंही त्याला पुरवेल तुम्ही त्याला बरोबर घेऊन गेलांत तर माझ्या आयुष्यांतील उरलेला प्रेमाचा अंश मला अतरून तें आयुष्य नीरस होईल हें खरें आहे. पण तो बिचारा तरी सुखी होईल."

" त्याचें योग्य स्थान आपणांपाशीच आहे, माझा व त्याचा संबंध कितीही जिव्हाळ्याचा असला तरी कृत्रिम आहे."

" कृत्रिम संबंध नैसर्गिक संबंधापेक्षांही अधिक जिव्हाळ्याचे असूं शकतात असें तुम्हींच ना निबंधांत म्हटलें आहे ?"

" बाबू मला स्वतःचाच मुलगा वाटतो खरा पण ज्या जनापवादाला भिऊन मला येथून पाय काढला पाहिजे त्याकरितांच त्यालाही मला बरोबर नेतां येत नाहीं."

" आणि तुमच्या नांवानें आक्रोश करीत तो दिवसेंदिवस झुरत चालला तरीही तुम्हांला त्याची दया येणार नाहीं का ?"

" नको नको; अशी अभद्र कल्पना करूं नका शिवाय मला जरी त्याला येथून नेतां आलें असतें तरी त्याला माझ्या सहवासांत पूर्ण सुखसमाधान वाटलें असतें का ? आपल्या प्रेमळ पित्याला विसरण्याइतका तो कृतघ्न आहे का ? नाहीं नाहीं, त्याच्यासारखा प्रेमळ व पितृभक्त मुलगा सांपडणार नाहीं माझ्या घरीं तो आपल्या विरहानें झुरतच राहिला असता."

" एकूण बिचाऱ्याच्या नशिबीं यापुढें पूर्ण सुख नाहींच म्हणावयाचें त्याच्या सुखाच्या दृष्टीनेंही आपला विवाह किती आवश्यक आहे पहा,"

" पण ज्या गांवाला जावयाचें नाहीं त्याच्या मार्गाचा विचार पाहिजे तरी कशाला ? मला आतां माझ्या घरचाच मार्ग पाहिला पाहिजे. मी आज रात्रींच्या गाडीनेंच मुंबईला जावयास निघणार."

"इतक्या तांतडीनें ? पण आजचें मरण उद्यांवर ढकलण्यांत तरी कोणता मोठा लाभ होणार ? ठीक आहे. करा आपल्या प्रयाणाची तयारी"

त्या लहान कुटुंबाला 'बाई'चें जाणें वज्रघाताप्रमाणें वाटलें त्या जाण्याला आपलाच वाचाळपणा अप्रत्यक्षपणें कारण झाल्याचें जेव्हां बाळूबाई व बजाबा यांस कळलें तेव्हा तीं उभयतां ढसाढसा रडूं लागलीं. त्यांचें सांत्वन करितां करितां 'बाई'स पुरेवाट झाली. बाबू तर सारखा तिच्या मागेंमागेंच फिरत होता काहीं तासांच्या अत्यंत निकट सहवासानें भावी दीर्घ विरहाचा पूर्ण वचपा निघून येईल असें त्यास वाटत होतें कीं काय कुणास ठाऊक. सर्वांचींच अंतःकरणें दुःखानें भरून गेल्यामुळे एकाच्याही मुखावाटे शब्द निघत नव्हता. घर नेहमीं इतकेंच गजबजलेलें असतांही त्यांस स्मशानतुल्य शांतता नांदत होती

संध्याकाळचा स्वैंपाक 'बाई'नें आपलें सर्व पाककौशल्य खर्च करून तयार केला होता आपल्या हातचे पदार्थ आपल्या गुरूस फारच आवडतात हें तिला पूर्वानुभवावरून माहीत झालें होतें; त्यांतून आज गुरूच्या नात्यांत वल्लभाच्या नात्याची भर पडली होती. हरिहररावांची आपल्या हातून होणारी ही शेवटचीच सेवा ही जाणीव असल्यामुळें तिनें एकाही पदार्थांत उणीव राहू दिली नव्हती. पण 'हा ममतेचा' 'शेवटचा लाभ' स्वीकारण्याची हरिहररावांना मात्र मुळींच उत्सुकता दिसेना. त्यांचा प्रत्येक घांस बराच वेळ तोंडांत घुटमळून घशाशीं अडकूं लागला. 'बाई'स वाईट वाटूं नये म्हणून अळेंबळें चार घांस खाऊन ते पानावरून उठले व आपल्या खोलींत जाऊन दोन्ही हातांत डोकें धरून स्वस्थ बसले. 'बाई'नेंही घाईघाईनें दोन घांस खाऊन आपलें जेवण उरकलें आणि उष्टींखरकटीं, झाडसारवण, भांडीं वांसणें-पुसणें, झांकापाक इत्यादि नित्यकृत्यें नेहमींच्याच दक्षतेनें पार पाडिलीं. कर्तव्यांत अखेरपर्यंत रेसभरही न चुकण्याचा तिचा निर्धारच झालेला दिसला. प्रयाणाची वेळ जवळ येऊं लागली तसतसा तिचा जीव खालीं-वर होऊं लागला. ती बाबूस जवळ घेऊन त्यास कुरवाळीत व डोळ्यां-

वाटे झरणारे अश्रु पुशीत मुकाट्यानें बसली. तें पाहून बाबूनें विचारिलें "बाई, अशी रडतेस कां ? तूं आम्हांला पुन्हां भेटणार नाहींस कां ?"

'बाई'नें रुद्ध कंठानें उत्तर दिलें, "पुढील गोष्टी त्या भगवंता-खेरीज कोणाला कळणार ?"

बाबूस कांहीं शंका येऊन तो म्हणाला, "बाबांनीं मला सावत्र आई करून दिली तरच तूं जाणार होतीस ना ? ते माझ्याकरितां नवीन आई आणणार आहेत होय ?"

"नाहीं बाळ, तुला सावत्र आईचें भय मुळींच बाळगायला नको"

"तूं सावत्र आई झालीस तर मला भय बाळगण्याचें कारणच रहाणार नाहीं मुळीं पण बाबा जर घरांत नवी आई आणणार नाहींत तर तूं कां जातेस ?"

"तें कारण लहान मुलांना समजण्यासारखें नाहीं."

"तूं येथें आली नाहींस तर मी आणि बाबा तुझ्याकडे येऊं ?"

'बाई'नें बाबूस पोटाशीं धरिलें,आणि ती कांपऱ्या स्वरानें म्हणाली-'तुझें घर जसें मला मोकळें होतें तसें माझेंही घर तुला राहील बरें बाळ ! तुला माझ्याकडे जेव्हां यावेंसें वाटेल तेव्हां खुशाल ये. तुझ्या वडिलांना मात्र आपलें कामधाम टाकून येतां येणार नाहीं. पण बाबू, तुझी झोंपण्याची वेळ केव्हांच टळून गेली. तूं असा आणखी किती वेळ जागत बसणार ?"

"तूं आज जाणार आहेस ना? मग मला झोंप कशी येणार तूंच सांग. तुझ्याशीं बोलायला यापुढें कधीं सांपडेल कीं काय हें तरी कुणास ठाऊक ! या दोन घटका सांपडल्या आहेत, त्या मीं कशा दवडूं ? तुला निरोप देईन आणि मग अंथरुणावर पडेन. बाकी तूं निघून गेल्यावर झोंप येण्याची वानवाच ! तुझ्या कुशींत निजण्याची तूंच मला संवय लावलीस, आणि आतां मला सोडून एकाएकीं चाललीस."

बाईनें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याची समजूत घातली व

राव अंगावर कपडे चढवून दाराशीं टांगा तयार असल्याचें सांगण्यास आले. त्यांची मुद्रा शांत व गंभीर होती. डोळे मात्र लाल झाल्यासारखे दिसत होते ज्या क्षणाला 'बाई' भीत होती तो क्षण येऊन ठेपला. बापुडवाण्या मुद्रा करून स्फुंदत उभे असलेल्या वृद्ध नोकरांचा तिनें निरोप घेतला. त्या वेळीं तीं रडत रडत तिच्या पायांवर पडलीं. नंतर ती हरिहररावांस "मजकडून न कळत एखादी चूक झाली असल्यास मला आपण क्षमा......" इतकें अर्धवट बोलून मध्येंच थांबली. गळा दाटून आल्यामुळें तिला पुढें बोलवेना. हरिहरराव म्हणाले, "माझा इतक्यांतच निरोप घ्यावयाला नको कांहीं. आगगाडी निघेपर्यंत तुमच्या सहवासाचा लाभ घेण्याचा माझा विचार आहे."

"नको. उगीच तुमची झोंप उडून जाईल."

हरिहररावांनीं भीषण हास्य करून म्हटलें, "यापुढील माझ्या झोंपेची मला खात्री आहे. एकदोन घटकांच्या झोंपमोडीनें तिच्यात कितिसा फरक पडणार ?"

'बाई' जरा खालच्या स्वरांत म्हणाली, "ज्या कारणाकरितां माझें येथें रहाणें इष्ट नाहीं त्याकरितांच आपण मला पोहोंचविण्यास येणेंही इष्ट नाहीं."

"जशी तुमची मर्जी."

'बाई' हरिहररावांच्या घरीं जशी एकटी आली होती तशी तेथून जातांनाही एकटीच निघाली. पण प्रत्येक मनुष्यप्राणी या जगद्रुपि गृहांत एकटाच प्रवेश करितो व तेथून निष्क्रमणही एकटाच करितो. मग त्या गृहाच्या एका खोलींतून दुसरींत जाण्यासच सोबत कशाला हवी ?

'बाई' टांग्यांत चढण्यासाठीं पायरीवर पाय ठेविते न ठेविते तोंच तिला कमरेस दोन कोमल हातांची घट्ट मिठी पडल्यासारखी वाटली. वळून मागें पहाते तों तिला आपणाकडे केविलवाण्या मुद्रेनें पहात असलेला व कमरेस लगटलेला बाबू दिसला. स्फुंदण्यामुळें व छाती भरून आल्यामुळें शब्दोच्चार करणें दुर्घट असतांही स्फुंदण्यामधील अवकाशांत शब्द

कसे तरी अडखळत मुखावाटे काढीत तो बोलत होता: "मी तुला निरोप देण्याकरितां इतका वेळ वाट पहात बसलों. पण अखेरीस तूं मला न विचारतां टाकून निघालीस."

शाकुंतल नाटकांतील हरिणशिशुदर्शनाचाच तो प्रसंग! 'बाई'चें हृदय विरघळून गेलें. तिनें वांकून त्याच्या गालाचें चुंबन घेतलें व ती सद्गदित कंठानें म्हणाली, "माझ्या लाडक्याला मी कशी विसरेन बरें! बाबू, तुझा निरोप घेणें मला जड वाटत होतें, आणि म्हणूनच मीं तुझ्याकडे पाहिलें नाहीं. जा आतां, नीज." असें म्हणून तिनें त्याला हरिहररावांच्या स्वाधीन केलें व म्हटलें, 'बाबूला करमेनासें झालें म्हणजे माझ्या घरीं नेण्याचें मी कबूल केलें आहे. आपले तसें पत्र आलें म्हणजे मी त्याला येथून नेण्याची तजवीज करीन." इतकें बोलून तिनें टांगेवाल्यास निघण्याचा इशारा केला, व टांगा वेगानें स्टेशनाकडे धडधडत निघाला त्याच्याकडे पहात पितापुत्र किती वेळ तरी रस्त्यांत उभे होते. शेवटीं डोळे ताणून व त्यांच्या जोडीस कल्पनेचें साहाय्य घेऊनही 'बाई'ची आकृति दिसेनाशी झाली नंव्हां कष्टी अंतःकरणांनीं त्यांनीं घरांत प्रवेश केला.

---

# प्रकरण ९ वें

यापुढील कांहीं दिवस हरिहररावांना फारच कष्टाचे गेले 'बाई'नें हरिहररावांच्या संसाराचा केवढा भाग व्यापून टाकिला होता याची खरी कल्पना त्यांना ती निघून गेल्यावरच आली. त्यांची पत्नी गत झाल्या-वर जसा बाबू उघडा पडला होता तसाच तो आतांही पडला. त्या वेळीं जाहिरात देऊन त्यांना त्याच्या संगोपनाकरितां एक आदर्शभूत स्त्री मिळवितां आली. आतां पुन्हां जाहिरात देण्याचा विचार त्यांना सुचणें शक्य नव्हतें. बाबूची मास्तरीण म्हणून दुसरी एकही बाई त्यांना डोळ्यांसमोर खपली नसती. त्यांनीं त्याच्या खाण्यापिण्याची, कपड्यालत्त्याची वगैरे व्यवस्था पुन्हां आपल्या म्हाताऱ्या नोकरांकडे

दिली, व त्याच्या शिक्षणाची जबाबदारी स्वतांकडे घेतली. त्यांच्या स्वतःच्या सुखसोईची 'बाई' इतकी खबरदारी घेणारें आतां कोणी नसल्यामुळें हेळसांड होऊं लागली. तोंड धुण्याचे वेळीं दांत घांसण्याची पूड आहे तर ब्रश नाहीं, साबू आहे तर रुमाल नाहीं, अग धुण्याचे वेळीं पाणी अतिशय ऊन किंवा अतिशय कोंबट, असे प्रकार हमेशा होऊं लागले. जेवणाच्या वेळीं चुकल्याचुकल्यासारखें होई. बाळूबाई कृतयुगांत कदाचित् अत्यंत पाककुशल म्हणून नांवाजली गेली असती. पण चटकदार पदार्थांस चटकावलेल्या जिभांच्या या कलियुगांत तिचा निभाव लागण्यासारखा नव्हता. ती एकादा पदार्थ निव्वळ कच्चा ठेवी अगर जाळून कोळ करी, अगदीं अळणी करी किंवा अगदीं खारट करी; तोंड भाजण्यासारखा झणझणीत करी, अथवा तोंडांत आहे कीं नाहीं हें न कळण्याइतका मिळमिळीत करी. मधला मार्ग तिला माहीतच नव्हता. यापेक्षां जेवणारांपुढें मीठ, तिखट वगैरे निरनिराळे जिन्नस ठेवून त्यांचें मिश्रण करण्याचें काम त्यांजवर सोंपविण्याची विलायती तऱ्हा किती तरी उत्तम असें हरिहररावांस वाटे. एकदां तर भाजी इतकी जहाल झाली की, ती तोंडी लावण्यापेक्षां ताटांत एक निखारा ठेवून तोच मधून मधून जिभेस लावणें शतपट बरें असें हरिहररावांस वाटलें पण त्यानीं ती डोळ्यांतून पाणी काढीत मुकाट्यानें खाल्ली. हा अश्रुपात 'बाई'च्या विरहाचाच परिणाम आहे असें बाळूबाईस वाटून तिला मनस्वी वाईट वाटलें. बिचारी बाळूबाई जेवणारांचीं मनें रिझविण्याकरितां 'बाई'-प्रमाणें कांहीं तरी मौजेचें बोलण्याचा प्रयत्न करी व तिच्या हास्याचें अनुकरण करून तोंडाचें बोळकें पसरी. पण त्या बोळक्याचा मुलींच्या भातुकलींत जसा उपयोग होण्यासारखा नव्हता तसा प्रौढांचीं मनें रमविण्याच्या कामींहि होण्यासारखा नव्हता. जी स्थिति तिची तीच बजाबाची. खुर्च्याटेबलें, कोचेंकपाटें, लोडबिछायती, दिवाबत्ती वगैरेंची व्यवस्था व टापटीप 'बाई'च्या हातानें किंवा नजरेखालीं राही त्याच्या शतांशानेंहि बजाबाच्या हातानें राहीनाशी झाली. उभयतां नोकरांस 'बाई'नें जवळ जवळ पेन्शनदार बनविलें असल्यामुळें त्यांना कामाची विस्मृतिही पडली होती. त्यांच्या चुकांमुळें 'बाई'ची मूर्ति हरिहर-

रावांच्या मनापुढें पदोपदीं उभी राही व त्यांच्या दृष्टीनें ती इष्टापत्तिच होती. त्यांचें संपादकीय कामाकडेही नीट लक्ष्य लागेना. त्याच्या हृदयाबरोबर त्यांची स्फूर्तिही 'बाई'बरोबर निघून गेल्याचा त्यांना अनुभव येऊं लागला. 'बाई' कार्यालयांत नसून घरांत वावरत असतांही तिच्या पावलाच्या किंवा कांकणांच्या ध्वनीनें त्यांच्या बुद्धीस व कल्पनेस जी जागृति मिळे ती आतां प्रहरप्रहर डोकें खाजवूनही मिळेनाशी झाली. समोर कोरा कागद व हातांत टाक अशा स्थितींत ते कुणीकडे तरी तंद्री लागल्याप्रमाणें घटका घटका निश्चलपणें बसत. पण ती तंद्री लेखाच्या विषयाकडे नसल्याचें तिच्या निष्फलत्वावरून उघड होई. त्यांना आता रात्रीं स्वस्थपणें झोंप येईनाशी झाली. रात्रीं पूर्ण झोंप मिळाल्यामुळें दिवसाचीं मेहनतीचीं कामें करण्यास माणसास जी हुशारी वाटतें ती त्यांना वाटेनाशी झाली. ते आतां त्रासिक व तिरसट बनले. लेखांतून विश्वबंधुत्वाचा उपदेश करणारे व तो आचरणांत उतरविणारे हरिहरराव आतां आपल्या नोकरांशीं व इतर परिचितांशीं तुसडेपणानें वागू लागले.

बाबूची स्थिति तर त्यांच्यापेक्षांही अनुकंपनीय झाली हरिहररावांचें मन वेधून घेण्यास अनेक विषय असत. पण बिचाऱ्या बाबूच्या जीवनाचें 'बाई' हें एकच जीवन बनून गेलें होतें. त्याच्या शारीरिक व मानसिक सुस्थितीचें धागेदोरे तिच्या जीवनाशीं गुंतून एकजीव झाले होते. त्याच्या उन्नतीच्या ऊर्ध्वमुख ज्योतीचें पोषण तिच्या स्नेहाकडूनच होत होतें. त्या स्नेहास अंतरल्यावर ती मंद प्रभा व्हावी यांत नवल काय! वडिलांच्या कष्टमय अवस्थेंत आपल्या दुःखाच्या कहाणीनें भर टाकावयाची नाहीं असा विचार करून तो शहाणा मुलगा बाह्यात्कारी समाधानवृत्ति धारण करी. पण आंतील दुःखास बाहेर पडण्यास वाट न मिळाल्या कारणानें त्याचा कोंडमारा होऊन तें अंतर्यामीं धुमसूं लागलें, व त्याच शरीरप्रकृतीवर परिणाम होऊं लागला. बाबूस दिवसेंदिवस सपाट्यानें क्षीणता येत चालली. हरिहररावांनीं त्याच्या व्याधीवर स्वतःचे उपाय करून पाहिले; आपल्या धन्वंतरी स्नेह्यांचें योजून पाहिले; पण त्याची क्षीणता हटण्याऐवजीं वाढतच चालली. त्याच्या स्थितीस वास्तविकपणें

शारीरिक व्याधि कारण नसून आपल्याप्रमाणेंच मानसिक व्याधि कारण आहे, आणि भलत्या रोगावर भलताच इलाज होत आहे अशी त्यांची खात्री झाली. तारुण्याच्या ऐन भरांत असलेल्या त्यांच्या देहवृक्षास अंतस्थ दाह सहन करणें विशेष कठिण नव्हतें. पण बिचाऱ्या बाबूच्या नुकत्याच उमलूं पाहणाऱ्या तनुकलिकेनें त्या आंचीची धग न सुकतां कशी सहन करावी? त्यांनीं वेळ न दवडतां 'बाई'स एक पत्र पाठविलें. त्याचा मजकूर याप्रमाणें होता :—

"तुमच्या वियोगाचा चि. बाबूच्या प्रकृतीवर अत्यंत अनिष्ट परिणाम होत आहे. तुमच्या जोपासनेनें बाळसेदार बननेल्या शरीराचें आतां फक्त अस्थिचर्मच उरलें आहे व तोंडावरील हास्याची सदाफुली कोमेजली असून तिच्या जागीं खिन्नतेनें कायमचें ठाणें दिलें आहे त्याच्या अंगीं प्रौढ पुरुषाचा काटकपणा व सोशिकपणा नसल्यामुळें त्याच्या भवितव्याबद्दल तीव्र चिंता वाटत आहे. त्यास पूर्व स्थितीवर येण्यास तुमच्या सहवासाच्या शीतल छायेची जरूर आहे. तो तुमचा शिष्य असल्यामुळें त्याच्या बऱ्यावाइटाची तुम्हांलाही चिंता असेलच. तिच्यांत माझ्या शब्दानें भर पडण्यासारखी असेल तर मी तुमच्यापुढें पदर पसरून अपत्याच्या जिवाची भिक्षा मागतों. उदयिक मी बाहेर गांवीं जाणार आहें. माझ्या गैरहजरींत त्यास आपल्या घरीं नेण्याची व्यवस्था करावी. त्यास येथून लवकर हलविलें नाहीं तर त्याचें चिरंजीव हें विशेषण अन्वर्थक रहाण्याची आशा नको."

दुसऱ्या दिवशीं हरिहरराव ठरल्याप्रमाणें बाहेरगांवीं निघून गेले. त्यांच्या पश्चात् चंद्रिका व तिचे वडील अमृतराव अचानक त्यांच्या घरीं आले. 'बाई'स पाहताच बाबू अंथरुणावर ताडकन् उठून बसला, व तिच्या वक्षःस्थलावर पडून रडूं लागला. 'बाई'नें त्याला बाबापुता करून उगें केलें व आपण त्यास आपल्या घरीं नेण्यासच आलों आहोंत असें सांगितलें. तें ऐकून त्यास इतका हर्ष झाला कीं, त्याच्या भरांत तो उड्या मारूं लागला. पण इतक्यांत त्यास कसलीशी आठवण होऊन तो एकाएकीं थांबला, व त्यानें 'बाई'स प्रश्न केला, "आणि

बाबा येणार आहेत ना आपल्या बरोबर?" चंद्रिका किंचित्काल स्तब्ध राहून म्हणाली, "तुला पुनः येथें यावेंसें वाटेल तेव्हां यावयाला तूं मोकळा आहेसच "

"एकूण तूं आणि बाबा दोघें माझ्यापाशीं एकाच वेळीं कधींच राहणार नाहीं तर ?" असा बाबूनें हिरमुसल्या मुद्रेनें प्रश्न केला तो ऐकला न ऐकलासा करून "बाई"तिला पहातांच हातांतलीं कामें टाकून धांवत आलेल्या बाळूबाईस व बजाबास बाबूच्या निघण्याची तयारी करण्याची घाई करूं लागली. तीं दोघें एकदम "आम्हांलाही न्या चार दिवस तुमच्याकडे" असें म्हणालीं. पण "मग तुमच्या यजमानांची व्यवस्था कोण पाहील ?" असा 'बाई'नें प्रश्न करितांच त्या एकनिष्ठ सेवकांचें समाधान झालें; व तीं बाबूच्या सामानाची बांधाबांध करण्याच्या तयारीला लागलीं. इकडे अमृतराव एकदां आपला स्नेही असलेल्या पण आतां परिस्थितिबलानें दुरावलेल्या हरिहर-रावांच्या घराचें सूक्ष्म निरीक्षण करीत होते. तें संपण्यापूर्वींच चंद्रिका व बाबू निघण्याच्या तयारीनें आलीं, व अमृतराव तेथें आले होते तितक्याच तांतडीनें त्यांसह तेथून निघून गेले.

अमृतरावांच्या घरीं गेल्यापासून बाबूचा अभ्यास व आयुःक्रम पुनः पूर्ववत् सुरळीत चालूं झाला. त्याची प्रकृति सुधारून अंगीं शक्तिही आली. अमृतराव त्याजवर पोटच्या मुलाप्रमाणें प्रेम करीत, यामुळें त्यास बरेच दिवस हरिहररावांचा वियोग फारसा जाणवला नाहीं. तथापि कांहीं दिवसांनीं तो सचिंत व उदास दिसूं लागला कोणत्या तरी गोष्टीचा ध्यास येऊन तो अंतर्यामीं कुढत आहे हें चंद्रिकेच्या लक्षांत येण्यास वेळ लागला नाहीं. त्याच्या निदिध्यासाचा विषय ओळखण्यासही तिला प्रयास पडले नाहींत. कारण तोच विषय तिच्याही मनांत रात्रंदिवस घोळत होता. ती हरिहररावांस सोडून त्यांच्या घरून निघून आली त्या दिवसापासून त्यांनींच तिचें हृदय आपलें घर करून सोडिलें होतें. त्यांची आपल्या मुलाशीं, नोकरांशीं, स्नेह्यांशीं, गोर-गरिबांशीं किती प्रेमळपणाची वर्तणूक असे याची तिला वारंवार आठवण होई. स्वतः तिच्याशीं होणारें त्यांचें निष्कपट, सभ्य व दाक्षिण्ययुक्त

वर्तन आठवलें म्हणजे तिच्या अंगावर प्रेमाचे रोमांच उभे रहात. उभयतांमधील व्यवहार त्यांनीं अत्यंत सचोटीनें पाळिला होता. त्यांनीं तिच्या पूर्व चरित्राबद्दल फाजील जिज्ञासा कधींच दाखविली नव्हती. उलट 'चंद्रिका' कार्यालयांत आपला वशीला असल्याचें एकदां तिच्या तोंडून बेसावधपणें निघून गेलें असतां त्याच्या धोरणानें त्या चरित्राचा छडा लावण्याचा मोह त्यांनीं आवरून धरिला होता. गुरूची श्रेष्ठ भूमिका घेतली असतांही त्यांनीं तिजपुढें आपल्या ज्ञानाचा तोरा कधीं मिरविला नव्हता उलट ते स्वतःबद्दल किंवा स्वतः-च्या लेखांबद्दल बोलतांना आपणाकडे नेहमीं कमीपणाच घेत होते. भेटीच्या पहिल्या क्षणापासून तिजवर अलोट प्रेम जडलें असता व ती त्यांच्या सत्तेच्या घरांत सर्वस्वीं त्यांच्या अधीनतेनें रहात असतां त्यांनीं एकांतांत आपलें प्रेम व्यक्त करून तिच्या परवशतेचा व स्वतःच्या वर्चस्वाचा कधींही फायदा घेतला नव्हता. अखेरीस त्याना लग्नाची गोष्ट काढावी लागली तीसुद्धां लोकापवादामुळें नाइलाज होऊनच काढावी लागली. तिच्या पदरांत लेखनकलेचें माप भरपूर पडण्यापूर्वींच तिच्या कानांवर आपल्या प्रेमाची कहाणी घातल्यास तिच्या मनावर भावी हानीच्या कल्पनेचें अयोग्य वजन पडून तिला त्या प्रेमाचा स्वीकार करावा लागेल या भीतीनें त्यांनीं आपलें उचंबळूं पहाणारें प्रेम आंतल्या-आंत दाबून चोख व्यवहाराचा, परांतःप्रवेशक्षमतेचा, आत्मसयमनाचा व स्वार्थत्यागाचा जो मासला दाखविला होता तो अपूर्व होता. त्यांनीं तिजकरितां आपला 'कौंतेया' बद्दलचा द्वेष बाजूस ठेवून व अमृत-रावांविषयींचें आपलें वैमनस्य दृष्टीआड करून प्रेमाकरितां स्वाभिमानाचा होम करण्याची विलक्षण तत्परता दाखविली होती. तथापि अखेरीस आपल्या वचनाचा धडपणा ठेवण्यासाठीं सुखसर्वस्वावर तिलांजलि सोडण्यांत त्यांनीं जो प्रामाणिकपणा दाखविला व तिनें प्रतिपादिलेलें तत्त्व आचरणांत उतरविण्याबद्दल धरिलेला हेका पुरा करण्यासाठीं त्यांनीं तिचा चिरवियोग पत्करण्यांत जो परमतादर व्यक्त केला त्यांनीं त्या सर्वांवर कडी केली असेंच म्हटलें पाहिजे. तिनें आपल्या अप्रौढ वयांत बनविलेल्या अपरिपक्क मतांची किंमत ती कितीशी असणार!

पण त्या मतांस चिकटून रहाण्याचा तिला आपणाइतकाच हक्क आहे हें ओळखून त्यांनीं तिच्या आग्रहास निमूटपणें मान वांकाविली. या कल्पनाचित्रांबरोबरच आपण हेका न धरितां त्यांच्याशीं विवाहपाशांनीं बद्ध झालों असतों तर आज त्या कुटुंबासह किती सुखानें नादत असतों याचेंही कल्पनाचित्र तिच्या चित्तापुढें उभें राही. आपणास तें वैवाहिक सुख मिळविण्याकरितां नूतन वधूस सासरीं जातांना अनुभवावें लागणारें विरहदुःख भोगावें लागलें नसतें, किंवा परक्या स्थलीं होणारा सासुरवासही आपल्या प्रत्ययाला आला नसता. गृहप्रवेश करण्याचीही आपणाला जरूर नव्हती. तो विवाहापूर्वींच झालेला होता सामान्य वधूस पतीवर व त्यांच्या आप्तांवर जी सत्ता अनेक वर्षांच्या सोशिक-पणानें व आज्ञाधारकपणानें प्रस्थापित करितां येते ती विवाहापूर्वी-पासूनच आपण हस्तगत केली होती. आपल्या शब्दावांचून एक पानही हलायचें नाहीं येवढा आपला अप्रतिबद्ध अंमल विवाहापूर्वींच त्या वरीं होता. अंतर इतकेंच कीं तो अम्मल आपण दासी असतां प्रेमाच्या जुलमानें बळकाविला होता. त्यांस मंत्राक्षतांच्या साह्यानें कायदेशीर स्वरूप यावयाचेंच काय तें राहिलें होतें तें यावयाच्या मार्गांत आपल्या हेकेखोरपणानें एक मोठी धोंड निर्माण केली. असें वाटून तिला कधीं कधीं त्याचा पश्चात्ताप होत असे. पण त्यामागून लागलीच असाही विचार येई कीं, आपण केलें त्यांत वावगें तरी काय झालें ? वधूवरांस विवाहापूर्वी परस्परांच्या स्वभावांतील खाचाखोंचा न कळल्यामुळें त्यांचीं आयुष्यें म्हणजे हमरीतुमरींचीं, शिव्याशापांचीं, अपकारप्रत्यप-कारांचीं, केशाकेशींचीं क्षेत्रेंच बनून गेलेलीं दिसतात. म्हणून विवाहा-पूर्वींच त्यास एकमेकाचा शक्य तितका परिचय होणें इष्ट असतें. परि-चयाचीं साधनें मात्र त्यांच्या आटोक्यांत नेहमीं असतातच असें नाहीं. कोणत्याही वधूला आजपर्यंत प्राप्त न झालेलें साधन आपणास मिळालें, व त्याच्या जोरावर आपण हरिहररावांच्या चरित्रांतलि एका गूढ व रहस्यमय प्रदेशाचा पत्ता लाविला. त्या प्रदेशाचें आपण ज्ञान करून घेऊ नये अशी त्यांची इच्छा असून तें ज्ञान झाल्यास विवाह अशक्य होईल अशी त्यांनीं भीतिहि दाखविली. त्या रहस्याचें महत्त्व फार

आहे यास यापेक्षां निराळा पुरावा नको असें महत्त्वाचें रहस्य विवाहा-पूर्वीच कळणें अवश्य आहे. तें विवाहानंतर तसेंच कायम राहिल्यास आपल्या छायेनें आपलें मन व्यापून टाकील व आपलें वैवाहिक सुख विषमय करून सोडील. त्यापेक्षां असा विवाह न झालेला पुरवला. पतिपत्नींच्या खुल्या व्यवहारांत रहस्याचा मागमूसही असतां कामा नये. रहस्य क्षुल्लक असलें तरी त्यावर कुशंकांची भली मोठी इमारत सहज रचितां येते जर तें महत्त्वाचें असलें तर विचारावयासच नको. अशा रहस्याचा विवाहापूर्वी स्फोट न झाल्यामुळें त्यानें नंतर दंप-त्याचा व त्याच्या सुखाचा स्वाहा केल्याचीं भयंकर उदाहरणें अनेक वेळां दिसून येतात. हरिहररावांनीं ' कौंतेया ' शीं पूर्व परिचय अस-ल्याचें कबूलच केलें आहे. त्यांजमध्यें इतकें वितुष्ट पडावयास तसेंच कांहीं कारण घडलें असलें पाहिजे. त्याच्या मुळाशीं कनक किंवा कांता असण्याचाच विशेष संभव आहे ' कौंतेया ' नें हरिहररावां-च्या प्रथम कृतीवर केलेल्या रास्त पण कडक टीकेचा दंश त्यांच्यासा-रखा उदार व प्रेमळ महात्मा इतक्या दीर्घ काळपर्यंत धरून बसेल हें मनुष्यस्वभावाचा कोणीही दर्दी कबूल करणार नाहीं. तें रहस्य त्यांच्या-सारख्या गंभीर पुरुषाच्या वृत्ति खळबळवून सोडण्यासारखें गंभीर स्वरूपाचेंच असलें पाहिजे. तें रहस्य धनापहारासंबंधानें असलें तरी त्याची त्यांच्या भावी पत्नीनें शहानिशा करून घेतली पाहिजे. तें कांतें-संबंधानें असलें तरी त्याची तिला मुळींच उपेक्षा करितां येत नाहीं. तेव्हां या ज्ञानवृक्षाचें फळ न चाखण्याबद्दल आपल्या ' प्रेमाच्या पर-मेश्वरा ' नें केलेली आज्ञा आपण मानिली नाहीं हें योग्यच झालें. विचारांची येथवर मजल आल्यानंतर कधीं कधीं तिच्या संशयाची धांव यापुढेंही जाई. आपणास हरिहररावांच्या अंतरंगाची जी माहिती आहे तिच्या बळावर ' कौंतेया ' नेंच त्यांचा गुन्हा केला असला पाहिजे असा आपण तर्क बांधतो. पण वस्तुस्थिति त्याच्या उलट असण्याचाही संभव आहे. हरिहररावांनींच त्याचा अपराध केला असून तो त्याचा सूड उगवील या भीतीनें त्यास राजद्रोहाच्या आरोपावर तुरुंगांत डांबून ठेवण्याचा त्यांचा विचार नसेल कशावरून ? ' कौंतेया ' चा आपणास

प्रत्यक्ष अनुभव जरी नसला तरी त्याच्या लेखांवरून आलेला अनुभव त्यास सर्वथा अनुकुल असाच आहे. आपणासारख्या नवशिक्या कवयित्रीस, कथालेखिकेस त्याजकडून जें उत्तर मिळालें त्यावरून त्याचा स्वभाव निर्मत्सरच दिसून येतो. त्यानें हरिहररावांच्या कादंबरींवर केलेली टीकाही निर्मत्सर बुद्धीनेंच केली असली पाहिजे त्याच्या अंगीं मत्सराचा किंवा द्वेषाचा गंधही नसावा. असता तर तो या टीकेवरच संतुष्ट राहून स्वस्थ बसला नसता. त्यानें आपल्या प्रतिपक्ष्याच्या यच्चयावत् लेखावर व पुस्तकांवर प्रतिकूल टीकांचा वर्षाव करून त्याला त्राहि भगवान् करून सोडिलें असतें. त्याच्या निर्मळ व प्रांजल मनाच्या मानानें हरिहररावांचें मन किती तरी क्षुद्र व दीर्घद्वेषी दिसतें. पण या विचारांचा उदय तिच्या मनांत होतो न होतो तोंच तिच्या हरिहररावांवरील प्रेमाच्या लोंढ्यांत त्यांचा पूर्ण लोप होऊन जाई. आपण त्याजविषयींच्या अनुदार विचारांना क्षणभर तरी मनांत थारा दिला याबद्दल तिला लाज वाटावयास लागून त्यांचा वचपा काढण्याकरितांच कीं काय, तिचें प्रेम अधिकच जोरानें उचंबळत असे. अखेरीस लोकोत्तर पुरुषांच्या अंगींही कांहींना कांही तरी व्यंग दिसून येतेंच, तेव्हां हरिहररावांच्या अंगीं ‘ कौंतेया ’ बद्दलच्या द्वेषाचें वैगुण्य असल्यास नवल काय ? त्या द्वेषाच्या भरांत त्यांच्या हातून एखादें अविचाराचें कृत्य होऊं नये म्हणून त्यांस प्रेमळ पत्नीची फार जरूर आहे.'' या विचारांत तिच्या चिंतनाचे नेहमीं पर्यवसान होई.

हरिहररावास सोडून अमृतरावांच्या घरीं परत येतांच तिनें त्यांना तिकडील इत्थंभूत वर्तमान कळविलें. तिकडून निघून येण्यास काय कारण झालें हें सांगतांना तिला आडपडद्यानें का होईना, उभयतांच्या प्रेमाची कहाणीही सांगावी लागली. तिनें लेखनांत केलेल्या प्रगतीबद्दल त्यांनीं पूर्ण समाधान व्यक्त केलें. हरिहररावांच्या प्रेमास त्यांची मुळींच प्रतिकूलता दिसली नाहीं. उलट त्यांनीं मुक्त हस्तानें दिलेल्या विद्यादानाबद्दल स्वपाणिदान हीच योग्य गुरुदक्षिणा झाली असती असेंहि त्यांनीं हसत हंसत म्हटलें. तें ऐकून तिला अत्यंत आश्चर्य वाटलें; पण त्याबरोबर निरतिशय आनंदही झाला.

ती हरिहररावांकडे रहावयास जाण्यापूर्वीच तिला ‘ कौंतेय ’ कोण याबद्दल जिज्ञासा वाटत होती, आणि त्याचें व हरिहररावांचें हाडवैर कळल्यापासून ती कळसास पोंचली होती. तिनें ती तृप्त करून घेण्याकरितां अमृतरावांस उलटसुलट प्रश्नांनीं पुष्कळ छेडून पाहिलें. पण ते तिला मुळींच दाद देईनात. ते म्हणाले, “ संपादकीय रहस्यें अत्यंत पवित्र मानली पाहिजेत ‘ कौंतेयानें ’ ‘ चंद्रिके ’ स लेखनसाहाय्य करण्याचें जें अभिवचन दिलें तें त्याचें खरें नांव गुप्त ठेवण्याच्या अटीवरच दिलें. तें नांव फोडल्यास वचनभंगाचा दोष जसा पदरीं येणार आहे त्याप्रमाणें लेखनसाहाय्यास मुकावें लागून ‘ चंद्रिके ’ चें अपरिमित नुकसानही होणार आहे. ”

“ संपादकीय रहस्य फोडावयाचें नाहीं हा नियम तुम्हीं माझ्यासंबंधानेंही तितक्याच दक्षतेनें पाळिला का ? ”

“ अर्थातच. ”

“ मग माझ्या कवितेचा व लेखांचा लेखक स्त्रीजातीचा आहे हें ‘ कौंतेयां ’ ना नेमकें कसें कळलें ? ”

“ तें सांगणें म्हणजे सुद्धां संपादकीय रहस्याचा स्फोटच करण्यासारखें आहे. सबब मला तें सांगतां येत नाहीं. ” असें त्यांचें निर्वाणीचें उत्तर आलें तेव्हां ती निरुत्तर होऊन गप्प बसली.

हरिहररावांची मूळची नेमस्त वृत्ति जशी आपणावरील प्रेमामुळें जहाल बनत गेली तशी आपली मूळची जहाल वृत्ति त्यांजवरील प्रेमामुळें नकळत नेमस्त झाल्याचें चंद्रिकेच्या लक्षांत आलें. हरिहररावांची गांठ पडण्यापूर्वीं ती ‘ प्रकाशां ’तील त्यांचे लेख जितक्या हौसेनें वाचीत असे त्यापेक्षां शतपट अधिक हौसेनें ती आतां वाचूं लागली. पण आतां त्यांतील पूर्वीची जादू उरली नसून त्यांत विस्खळितपणा, कृत्रिमपणा, शब्दांचें पोकळ अवडंबर यांची उत्तरोत्तर भर होत असल्याचें तिच्या नजरेस आलें; व या अवनतीची बहुतेक जबाबदारी आपणावर आहे असें वाटून तिचें मन तिला खाऊं लागलें. त्यांच्या लेखांत त्यांची सांप्रतची दुरवस्थाच प्रतिबिंबित झालेली होती. आपण

त्यांच्याशीं विवाह करून त्यांना सुखांत ठेविलें असतें तर त्यांच्या लेखांस तेज चढून आपणास एक अत्यंत उपयुक्त सार्वजनिक कामगिरी केल्याचें श्रेय मिळवितां आलें असतें. आपला परिचय होण्यापूर्वी त्यांचे लेख उत्तम असतच; पण तो परिचय झाल्यापासून उभयतांचा वियोग होईपर्यंत त्यांनीं जे लेख लिहिले त्यांवर आपल्या सहवासापासून मिळणाऱ्या स्फूर्तीची छाप असल्यामुळें ते त्यांहूनहि सरस उतरले. आतां आपणाबरोबर ती स्फूर्तिही निघून गेल्यामुळें त्यांचे लेख निस्तेज, निर्जीव व निर्बल उतरू लागले तर नवल काय? या विचारांनीं तिचें मन खिन्न होत असे.

हरिहररावांच्या प्रतिस्पर्ध्याच्या लेखांत मात्र अलीकडे विलक्षण तेजस्विता व प्रखरता भासू लागली होती गोऱ्यांनीं ' काळया अदमी 'वर केलेल्या अत्याचावरून उपस्थित झालेल्या कांहीं फौजदारी खटल्यांत गोऱ्या न्यायाधीशांनीं अपराध्यांस निर्दोष म्हणून सोडून देऊन जो पक्षपात दाखविला होता त्याजवर ' कौंतेया 'नें एका लेखांत अत्यंत खरमरीत टीका केली होती. दुसऱ्या लेखांत आगगाडीनें प्रवास करणाऱ्या हिंदु उतारूशीं कांहीं गोऱ्या उतारूंचें किती उद्दामपणाचें वर्तन असतें याचें क्षोभजनक चित्र काढिलें होतें. तिसऱ्या एका लेखांत रस्त्यानें चालणाऱ्या प्रत्येक एतद्देशीयानें आपणास लवून मजुरा केला पाहिजे अशी अपेक्षा करणाऱ्या अमलदारांची हजेरी घेतली होती देशांतील क्रांतिकारक चळवळींचे खरे जनक जहाल पुढारी नसून हे बेजबाबदार गोरे लोकच होत, असें आणखी एका लेखांत निरुत्तर रीतीनें सिद्ध केलें होतें. या लेखांनीं सरकारांत व जनतेंत फार खळबळ सुरू झाली. या स्वैर व बेजबाबदार लेखणीस कायद्याचा लगाम जरूर घातला पाहिजे असें सरकारनें ठरविलें; व असा निस्पृह देशभक्त कायद्याच्या वाग्जालांत अडकल्यास सरकारच्या विरोधास न जुमानतां त्याजविषयींचा आदर व्यक्त करावयाचा असा जनतेचा निश्चय ठरला. ' कौंतेया ' बद्दल बारकाईनें शोध चालला असल्याबद्दल व अनेक घरांची झडती होत असल्याबद्दल रोज नव्या नव्या कंड्या उठूं लागल्या. अमृतरावांस बोलाबण्यांत येऊन त्यांजकडून ' कौंतेया 'चें खरें नांव काढण्याचे शिक-

स्तीचें प्रयत्न झाले पण ते त्यांस बधण्याचा रंग दिसेना. याच संधानास एक गोरा सोजीर दारूनें बेहोष होऊन रस्त्यानें जात असतां त्यानें केलेल्या एका हिंदु स्त्रियेच्या अपमानाबद्दल त्याला भोंवतालच्या लोकांनीं बेदम मारिलें. या गोष्टीचा आणि 'कौंतेया'च्या लेखांचा संबंध जोडण्यांत येऊन अमृतरांवावर राजद्रोहाचा खटला करण्यांत येणार आहे अशी एक भुमका उठली, व तिच्या मागोमाग अमृतरावांवर लवकरच वारंट निघणार असल्याबद्दलही एक बाजारगप्प पसरली. पण सरकारी वातावरण पूर्ण शांततेचें असल्यामुळें त्या गप्पा निराधार ठरल्या. ती शांतता वादळापूर्वीचीच होती हें पुढें लोकांच्या निदर्शनास आलें.

पहांटेची गुलाबी थंडी व साखरझोंप यांचा मिलाफ गुलकंदाच्या आस्वादाइतकाच मधुर असतो चंद्रिका व बाबू या माधुर्याचा अनुभव घेत आपापल्या बिछान्यावर पडलीं होतीं. इतक्यांत अमृतरावांच्या खोलींत कांहीं गडबड चालल्याचा चंद्रिकेस भास झाला. ती घाईघाईनें उठून त्या खोलींत जाते तों तिच्या नजरेस एक भयंकर देखावा दिसला. खोलीच्या मध्यभागीं एक गोरा पोलिस अंमदार चार पोलिसांसह उभा असून अमृतरावांस एक हुकमाचा कागद दाखवीत होता. हुकूम वाचतांच अमृतराव शांतपणें म्हणाले, "मी मुकाट्यानें आपल्या स्वाधीन होण्यास तयार आहें. पण निघण्यापूर्वी माझ्या मुलीची भेट होऊं दिल्यास उपकार होतील." अंमलदार सभ्य, उदार व स्त्रीदाक्षिण्यपूर्ण असा जातिवंत इंग्रज होता. तो त्या गोष्टीस अनुमति दर्शवून बाजूस उभी असलेल्या चंद्रिकेशीं बोलण्यास अमृतरावांस सवड देण्याकरितां जरा दूर झाला.अमृतराव तिला हलक्या स्वरांत म्हणाले, "मला 'कौंतेया'च्या लेखांवरून पकडण्यांत आलें आहे पण मी प्राण गेला तरी आपण होऊन त्याचें नांव फोडणार नाहीं. त्या लेखांचा फायदा जसा मला मिळाला तसें त्यांजबद्दलचें शासनही मलाच मिळालें पाहिजे. पुरी शिक्षा भोगल्या शिवाय माझी सुटका होणें शक्य नाहीं. माझ्यामागें संपादकीय व इतर व्यवस्था ठेवण्यास तूं पूर्णपणें समर्थ आहेस ही एक ईश्वराची कृपाच समजली पाहिजे."

" पण बाबा, ' कौंतेय ' तुम्हांला तुरुंगांत फार दिवस राहूं देतील असें वाटतें का ? "

"तो सरकारच्या स्वाधीन होणें लोकहिताच्या दृष्टीनें मुळींच इष्ट नाहीं. त्याच्या हातून देशसेवा आजन्म व अखंड होणेंच श्रेयस्कर आहे तो सरकारच्या स्वाधीन झाला तरी सरकार मला सोडून देईल असें नाहीं. तुरुंगात एकाच्या ऐवजीं दोघे पाठवून त्यास आपल्या लोकप्रिय मासिकाचें अपरिमित नुकसान मात्र करितां येईल ' कौंतेय ' शहाणा व दूरदर्शी आहे. एकंदर परिणामांचा विचार करून तो कदाचित् पुढें येणारही नाहीं."

" पुढें आले नाहींत तर मी त्यांची गणना अत्यंत नीच वर्गात करीन. "

" बाळ, हें तू स्वार्थांध होऊन केवळ माझ्या सुटकेच्या दृष्टीनें बोलत आहेस. देशहिताच्या व्यापक दृष्टीनें विचार कर, म्हणजे माझ्यासारखेंच तुझेंही मत पडेल."

" बरें, बाबा, तुमच्या बचावाची व्यवस्था काय करावयाची ? "

" त्याची मीं आगाऊच तर्तूद केली आहे. तूं नुसती ' चंद्रिका ' मासिकाची व्यवस्था पहा म्हणजे झालें."

इतक्यांत अंमलदारानें अमृतरावांस निघण्याचा इशारा केला. त्याबरोबर त्यांनीं चंद्रिकेचा मानेनेंच निरोप घेऊन अंमलदाराच्या मागोमाग चालण्यास सुरुवात केली. दारासमोर घोड्यांची गाडी उभी होती, तिच्यांत कैदी व प्रमुख अंमलदार बसतात ती तुरुंगाकडे भरधांव रवाना झाली.

---

# प्रकरण १० वें

अमृतरावांस ज्या दिवशीं पहांटेस अटक करण्यांत आली त्या दिवशीं मुंबईतील राजकीय वातावरण क्षुब्ध झाल्यामुळें तेथें घटकेघटकेस नाना प्रकारच्या कंड्या उठत होत्या.

प्रथम अमृतरावांनीं स्वतःच 'कौंतेय' असल्याची कबूली दिली अशा अर्थाची एक गप्प उठली. पण 'कौंतेया'चें नांव न सांगण्याचा अमृतरावांचा निश्चय कायम आहे अशी एक बातमी मागाहून आल्यामुळें ती फार वेळ टिकली नाहीं. इतक्यांत 'कौंतेया'चे हाडवैरी हरिहरराव यांजकडून त्याच्या शोधास आवश्यक असणारीं साधनें गोळा करण्याचा सरकारचा आटोकाट प्रयत्न चालला असून त्या प्रयत्नास अजून फारसें यश मिळालें नाहीं अशी एक भुमका नाशिकहून आलेल्या तारेवरून उठून लोकांत फारच खळबळ सुरू झाली. लोकमत हरिहररावांस अत्यंत अनुकूल होतें. तथापि सरकारच्या आमिषास बळी न पडण्याइतका खंबीरपणा त्यांच्या अंगीं आहे कीं काय याबद्दल लोकांतही मतभेद होता. एक पक्ष म्हणूं लागला कीं, "सुधारकांस व मवाळांस अनेक सुधारणा सरकारच्या मदतीनें पार पाडाव्या लागतात, व त्याकरिता एकाद्या प्रसंगीं सरकारास मदत करणेंही भाग पडतें; आणि हरिहरराव त्या वर्गास अपवाद नाहींत. 'कौंतेया'च्या जागीं दुसरा कोणी असता तर त्याच्या बंधनास कदाचित् त्यांनीं हातभार लाविला नसता पण 'कौंतेय' जाणूनबुजून त्यांचा हितशत्रु. त्यांच्या उत्कर्षोन्मुख अवस्थेंत त्यानें त्यांजवर गुप्त प्रहार करून त्यांस वाङ्मयजगांतून उठविण्याचा प्रयत्न केला होता. अशा मनुष्यास पकडून देऊन सरकारच्या सूडाबरोबर स्वतःचा खाजगी सूडही उगविण्याची सोन्यासारखी संधि चालत आली असता ती त्यांनीं कां दवडावी?" दुसऱ्या पक्षाचें म्हणणें पडलें कीं, 'कौंतेय' हरिहररावांच्या विरुद्ध पक्षाचा असला तरी त्यानें देशाचा स्वाभिमान जागृत करून व सरकारी अंमलदाराचे अन्याय चव्हाट्यावर आणून जी लोकसेवा बजाविली आहे तिचें महत्त्व हरिहररावांस पूर्णपणें अवगत आहे. ती सेवा देशापासून हिरावून घेणें म्हणजे देशांतील एक प्रचंड शक्ति नष्ट करून त्याचें अपरिमित नुकसान करण्यासारखें आहे याची त्यांस जाणीव आहे. त्यांस समाजसुधारणेच्या कामीं जरी सरकारची मदत घ्यावी लागत असली व राजकीय सुधारणेच्या कार्यांतही त्याच्याशीं शक्य तेथें सहकारिता करण्याचेंच व्रत त्यांनीं अंगीकारिलें असलें तरी राष्ट्रीय व प्रागतिक या उभयतांचें अंतिम

ध्येय स्वदेशहित हें एकच असल्यामुळें जेथें स्वदेशीय व परदेशीय हितसंबंधांत लढा पडतो तेथें सरकारास साहाय्य न करितां शक्य तर विरोधच करावयाचा हें खऱ्या देशभक्ताचें कर्तव्य त्यांच्या ठायीं चांगलें बिंबलें आहे. 'कौंतेया 'नें केलेला खाजगी अपराध कितीही घोर असला तरी आतां फारच शिळा झालेला आहे. त्याचें शल्य हरिहररावांच्या मनांत अजून सलत आहे असें मानावयास त्यांच्या पदरीं सर्पाचा खुनशीपणाच बांधावा लागेल. तसा खुनशीपणा त्यांच्यांत संभवत असला तरी आपला खाजगी द्वेष सरकारास मदत करून व देशहितावर निखारा ठेवून उगविण्याचा नीचपणा तरी त्यांच्यांत खास नाहीं. यांपैकीं कोणता पक्ष खरा ठरणार याचा अंदाज करितां येण्यास पुरेशी माहिती त्या दिवशीं न मिळाल्यामुळें लोकमताचीं दोन्ही पारडीं संशयाच्या चंचल वातावरणांत खालींवर हेलकावत राहिलीं.

दुसरें दिवशीं उजाडतांच जिकडे तिकडे "सरकारनें देऊ केलेल्या एका बड्या पदवीचा हरिहररावांनीं अव्हेर केला." अशी एक वार्ता उठून तिनें त्यांस अनुकूल असलेल्या पक्षाचें पारडें बरेंच जड केलें. ताबडतोब एक सार्वजनिक सभा भरविण्यांत येऊन त्यांनीं दाखविलेल्या असामान्य निस्पृहतेबद्दल त्याचें अभिनंदन करणारा एक ठराव मंजूर करण्यांत आला. पण सभासद सभागृहाच्या बाहेर येतात तोंच "सरकार अमृतरावांस बिनशर्त सोडण्यास तयार असल्यास खऱ्या अपराध्यास पकडून देण्यास आपण तयार आहोंत." असा हरिहररावांनीं सरकारकडे निरोप पाठविल्याची बातमी कानांवर आली. मग काय विचारतां त्याच सभागृहांत त्याच व्यासपीठावर त्याच वक्त्यांनीं त्याच सभासदांसमोर तसेच हातवारे करून हरिहररावांवर निंदाव्यजक ठराव करण्याची आवश्यकता प्रतिपादून तो ठराव मंजूरही करवून घेतला. सभा बरखास्त होऊन सभासद पुन्हां मोकळयां हवेंत येतात तो पूर्वींच्या सर्व बातम्यांहून विलक्षण अशी एक नवीन बातमी त्यांच्या कानांवर आली. "हरिहरराव स्वतःच 'कौंतेय' म्हणून सरकारच्या स्वाधीन झाले आहेत." हीच ती बातमी होय. हरिहरराव आतां आपल्या प्रतिस्पर्ध्यास मुद्यापत्त्यानिशीं सरकारच्या हवालीं करणार अशीं प्रत्येकजण

अपेक्षा करीत असतां त्याच प्रतिस्पर्ध्याचा अपराध आपल्या माथीं घेऊन त्यास लाजेनें मेल्याहून मेल्यासारखें वाटावयास लावणें यापेक्षां उदात्त सूड दुसरा कोणता असणार? अपकारानें मारण्यापेक्षां उपकारानें मारणें अनतपटीनें श्रेष्ठ असतें या बोधाचा याहून परिणामकारक वस्तु-पाठ दुसरा कोणता असू शकणार? शत्रूनें केलेल्या अपराधाबद्दल त्यावर सूड उगविणें ही प्रवृत्ति सामान्य जनांमध्यें दिसून येते. तो अपराध विसरून त्याबद्दल पूर्ण क्षमा करणें हें उच्च कोटीच्या मनुष्यांसच शक्य असतें. पण अपराध्याशीं स्वतःचें पूर्ण तादात्म्य कल्पून त्यानें इतरांस केलेल्या अपकाराचें प्रायश्चित्त स्वतः भोगण्यास तयार होणें हें केवळ दैवी वृत्तीचेंच लक्षण होय. अखिल मानवजातीच्या पातकांचा भार स्वशिरीं घेऊन तत्प्रीत्यर्थ सुळीं जाणाऱ्या देवपुत्रास शोभण्यासारखेंच तें कृत्य आहे यांत शंका नाहीं. हरिहररावांच्या आत्मयज्ञाच्या मुळाशीं 'कौंतेया'स उपकृत करण्याची इच्छा नसून त्यांचे जुने स्नेही अमृतराव यास संकटमुक्त करण्याची तळमळ हीच असली पाहिजे अशी जनतें-तील मानवी स्वभावाच्या कांहीं मार्मिक परीक्षकांची अटकळ होती. अमृतराव व हरिहरराव यांजमध्यें दहा वर्षांपूर्वी अत्यत जिव्हाळयाचा स्नेह होता ही गोष्ट सुप्रसिद्ध होती. त्या स्नेहावर एका आगंतुक कारणामुळें औदासीन्याची धूळ सांचली होती. पण अमृतरावांवर आलेल्या संकटाच्या काहुरानें ती धूळ नाहींशी होऊन हरिहररावांच्या पूर्व स्नेहानें एकदम उचल खाऊन त्यांच्या साहाय्यास धावून जाण्याची त्यास प्रेरणा केली असली पाहिजे. ही अटकळ खरी असली तरी तिजमुळें हरिहररावाचा थोरपणा फारसा कमी होण्यासारखा नव्हता. 'कौंतेय' हा जनतेचा अत्यंत आवडता लेखक व नेता असल्यामुळें त्याजवर हरिहररावांकडून अहेतुपूर्वक घडलेल्या या उपकृतीचाही तिज-वर प्रचंड परिणाम झाला. "हरिहररावांचा जयजयकार असो." अशा आरोळ्या रस्तोरस्तीं ऐकूं येऊ लागल्या. त्यांजप्रीत्यर्थ जंगी जाहीर-सभा भरविण्याचा विचारही घाटत होता. पण आपण पुन्हां सभा-गृहात शिरून व्यासपीठावर उभे राहिल्यास, हरिहररावाची तुरुंगांत जितक्या तांतडीनें रवानगी करण्यांत आली तितक्याच तांतडीनें आपली

पागलखान्यांत होईल असें प्रमुख वक्त्यांस सकारण भय वाटूनच कीं काय, तो विचार अमलांत आला नाहीं बाकी हरिहररावांबद्दल वाटत असलेला अत्यादर व्यक्त करण्याचा दुसरा एकही मार्ग अनुसरावयाचा जनतेनें शिल्लक ठेविला नाहीं. त्यांच्या सन्मानार्थ वृतपत्रांचे खास अंक काढण्यांत आले, त्यांच्या फोटोची जंगी मिरवणूक काढण्यांत आली; त्यांच्या मुक्ततेसाठीं देवालयांतून प्रार्थना करण्यांत आ या.

याप्रमाणें हरिहरराव जगद्रूपी रंगभूमीवरील एका अत्यंत चित्तवेधक नाटकाचे नायक बनून समाजरूपी प्रेक्षकवृंदाकडून उत्तरोत्तर चढत्या प्रमाणावर वहावा मिळवीत होते. परंतु प्रेक्षकवृंदाची जिज्ञासा अजून तृप्त झाली नव्हती. त्याच्या मतें नाटकाचा पाचवा अंक अजून व्हावयाचाच होता. खरा 'कौंतेय' आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या औदार्याहून आपलें औदार्य कोणत्याही प्रकारें कमी नाहीं हें सिद्ध करण्याकरितां प्रकट होऊन त्याची सुटका करीपर्यंत प्रेक्षकवृंदाच्या जिज्ञासेस पडलेला ताण कमी होण्यासारखा नव्हता. हरिहररावांनीं घेतलेलें 'कौंतेया'चें सोंग त्यांस कितीही भूषणावह असलें तरी तें न्यायासनापुढें येणाऱ्या भरभक्कम पुराव्यापुढें मुळींच टिकण्यासारखें नव्हतें. 'कौंतेय' व हरिहरराव एक ही गोष्ट कोणासही खरी वाटण्यासारखी नव्हती. त्यांजमधील अंतर उत्तर-दक्षिणध्रुवांमधील अंतराइतकें तीव्र होतें एक जनतेचा कैवारी तर दुसरा सरकारचा सहकारी. एकाची भूतकालावर तर दुसऱ्याची भावी कालावर मदार. एकास पूर्वजांच्या सद्गुणांचा व पूर्व संस्कृतीच्या श्रेष्ठतेचा पूर्ण अभिमान तर दुसऱ्यास त्याच पूर्वजांच्या हल्लींच्या वंशजांमधील व त्याच संस्कृतीच्या विद्यमान अवशेषांमधील दोषांची पूर्ण जाणीव. स्वमतप्रसाराचें एकाचें प्रमुख साधन जाज्वल्य आवेश तर दुसऱ्याचें नाजूक विनोद. एकाचें प्रसिद्धीचें साधन जहालांचें मुखमासिक 'चद्रिका' तर दुसऱ्याचें प्रागतिकांचें मुखपत्र 'प्रकाश' 'चंद्रिकें'त टीका आल्यापासून गेल्या दहा वर्षांत हरिहरराव आपल्या पूर्वीच्या स्नेह्याच्या—अमृतरावांच्या—घराची पायरी चढले नव्हते, याचें कारण अमृतरावांचा 'कौंतेयां'शीं असलेला संबंध हेंच होतें. याप्रमाणें त्यांचा 'कौंतेयां'शीं असलेला तीव्र विरोध कोणत्याही हात-

चलाखीनें लोकांच्या व न्यायमूर्तींच्या दृष्टीआड करितां येईल अशी अपेक्षा करणें वेडेपणाचें होतें, व जोंपर्यंत तो विरोध कायम होता तोंपर्यंत त्यांनीं स्वतःवर ओढून घेतलेल्या आपत्तीच्या बळावर अमृतरावांची सुटका करूं पाहणेंही व्यर्थ होतें.

हरिहररावांशीं जनतेचा जो परिचय होता त्यापेक्षां चंद्रिकेचा परिचय अधिक दीर्घ व सूक्ष्म होता यामुळें ती वार्तारूप वायुलहरींमीं जनसमुद्रांत उद्भवलेल्या क्षोभाच्या प्रत्येक लाटेबरोबर इतस्ततः वहात गेली नाहीं हरिहररावांच्या व अमृतरावांच्या अनेक भाषणांवरून, विशेषतः अखेरच्या चिरस्मरणीय प्रसंगीं अमृतरावांच्या तोंडून बाहेर पडलेल्या उद्गारांवरून ते व 'कौंतेय' भिन्न असल्याबद्दल तिची खात्री झाली होती. 'कौंतेया' चें खरें नांव त्यांजकडून हरतऱ्हेनें काढण्यासबंधाचे सरकारचे प्रयत्न तिच्या कानांवर आले तेव्हां तिला त्या प्रयत्नांच्या परिणामाबद्दल धास्ती वाटूं लागली. तिजवरील प्रेमानें 'कौंतेया' विषयींच्या द्वेषावर मिळविलेला विजय अजून कायम असेल कीं आपण निघून येतांच त्या द्वेषानें आपलें वर्चस्व पुन्हां परत मिळविलें असेल याबद्दल तिला दारुण चिंता वाटूं लागली. या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांना योग्य मार्ग दाखवून त्यावर निश्चल राखण्याच्या कामीं आपला किती उपयोग झाला असता या विचारानें तिला सारखी तळमळ लागली. यानतर हरिहररावांनीं सरकारच्या पदवीचा अव्हेर केल्याचें तिच्या कानांवर आलें तेव्हां तिला आपल्या वल्लभाचा अभिमान वाटावयास लागून तिचें त्यांजवरील प्रेम वृद्धिंगत झालें. पण लागलीच पुढें हरिहरराव अमृतरावांची बिनशर्त सुटका होण्याच्या अटीवर आपल्या शत्रूस सरकारच्या स्वाधीन करण्याच्या तयारींत आहेत हें वर्तमान तिला कळलें तेव्हां तिला पराकाष्ठेचें दुःख झालें. अमृतरावांची मुक्तता करण्याच्या इच्छेच्या मुळाशीं त्यांजविषयींचा जागृत झालेला जुना स्नेह नसून त्यांच्या मुलीवरचें ताजें पण निराश प्रेमच आहे ही अज्ञ जनतेस माहीत नसलेली गोष्ट तिला माहीत होती. आपल्या थोर प्रतिस्पर्ध्यास पकडून देण्याचें नीच कृत्य आपल्या वल्लभाकडून आपणास पितृमुक्ततेमुळें होणाऱ्या संतोषाप्रीत्यर्थच होत आहे हा विचार तिला

वेड लावण्यासारखा होता. त्याच्या भरांत तिनें तावडतोब नाशकास जाऊन आपल्या प्रियकरास त्या कृत्यापासून परावृत्त करावयाचाही निश्चय केला. पण त्याच्या मागोमाग बाबूस एकटा सोडून जाणें जितकें अशक्य आहे तितकेंच सरकारी अधिकाऱ्यांची नजर चुकवून हरिहर-रावांची भेट घेणेंही आहे हा विचार येऊन तिला कल्पनावैफल्यापासून होणाऱ्या तीव्र तळमळीचा अनुभव घेत स्वस्थ बसावें लागलें. तो अनुभव तिला फार वेळ ध्यावा लागला नाहीं. कारण हरिहरराव 'कौंतेय' म्हणून सरकारच्या स्वाधीन झाल्याची हकीकत लवकरच कळून तिनें तिला आश्चर्यानें स्तिमित केलें, त्यांच्या या कृत्याचा अर्थ तरी काय? खाजगी द्वेषानें प्रेरित होऊन शत्रूस पकडून देणें हें अधमपणाच्या दरीचें खालचें टोंक असलें तर वल्लभेच्या प्रेमाकरितां शत्रूचें कृत्य आपलेंच म्हणून सरकारच्या भयंकर रोषास पात्र होणें हें उच्च प्रतीच्या आत्मसमर्पणाचें शिखर होतें. त्या अधःपातापासून आपल्हा वल्लभाचा बचाव करणें जसें आपलें कर्तव्य तसेंच या आत्म-यज्ञापासून करणें हेंही आहे. आणि त्यानें आपण होऊन जर हा आत्मघातकी मार्ग सोडून दिला नाहीं तर अमृतरावांकडून खऱ्या 'कौंतेया'स उजेडांत आणून या तोतया 'कौंतेया'चें उदार कपट जगाच्या व न्यायदेवतेच्या निदर्शनास आणावयाचें असा तिनें स्वतःशीं निर्धार केला.

हरिहररावांनीं आपणच 'कौंतेय' असल्याबद्दल केलेल्या बतावणी-चा विरुद्ध पुराव्यापुढें मुळींच निभाव लागणार नाहीं असा जनतेचा तर्क होता. स्वतः चंद्रिकेस आलेल्या अनुभवाचा त्या बतावणीस कित-पत पाठिंबा मिळण्यासारखा आहे याचा ती स्वस्थपणें विचार करूं लागली, तेव्हां त्या अनुभवांतील कांहीं गूढांचा हरिहरराव व 'कौंतेय' यांच्या एकत्वाची कल्पना करूनच समाधानकारक उलगडा होण्या-सारखा आहे असें तिच्या लक्षांत येऊन ती कल्पना खरी मानण्याकडे तिची प्रवृत्ति होऊं लागली. आपली कविता, गोष्ट व परीक्षण भिन्न भिन्न टोपणनांवांनीं प्रसिद्ध झाली असतां त्यांचा लेखक एकच व स्त्रीजातीचा असल्याचें ज्ञान 'कौंतेया'स कसें झालें याचें आपणास

आतांपर्यंत गूढच वाटत होतें. पण उभयतांचें तादात्म्य गृहीत धरल्यास त्यांत कोणतें गूढ राहिलें ? वास्तविक पाहतां ते लेख लेखिकेच्याच हातून उतरले असल्याचें ज्ञान बाबा व हरिहरराव या दोघांसच काय तें होतें, आणि अमृतराव 'कौंतेय' नाहींत हें कळतांच आपणास हरिहररावांचाच संशय यावयास पाहिजे होता. त्यांच्यांशीं झालेल्या अखेरच्या संभाषणांत त्यांनीं 'कौंतेय' ही व्यक्ति बाबांहून भिन्न असल्याची स्पष्ट सूचना केली होती, पण तिजहूनही स्पष्ट सूचना आपणास बाबांकडून मिळाली. आपल्या लेखांच्या कर्तृत्वाचें संपादकीय रहस्य कोणापाशींही न फोडल्याबद्दल निक्षून सांगून तें रहस्य 'कौंतेया'स कसें समजलें याचा उलगडा करणें म्हणजेही संपादकीय रहस्याचा स्फोट करण्यासारखेंच आहे असें जें त्यानीं म्हटलें त्याचा अर्थ हरिहरराव हेच 'कौंतेय' असाच होत होता. पण उभयताच्या हाडवैराबद्दल आपली जी चुकीची समजूत होऊन बसली होती तिनें त्यासंबंधानें संशयाची छायाही आपल्या मनावर पडूं दिली नाहीं. असो. स्वतःच्या मुखानें आपल्या शिष्यिणीचे दोषाविष्करण व 'कौंतेया'च्या मुखानें तिचें गुणवर्णन करण्याची हरिहररावांची पद्धत स्वतःच्या नांवानें लिहिलेल्या लेखानीं समाजाचा रोष ओढून घेऊन 'कौंतेया'च्या नावानें लिहिलेल्या लेखांनीं त्याचा स्वाभिमान जागृत करण्याच्या त्यांच्या पद्धतीशीं पूर्णपणें सदृश्य आहे. 'कौंतेया'नें केलली अमर्याद स्तुति बाबानींच केली असा जर त्यावेळीं आपला गैरसमज झाला नसता तर तिच्यांत पितृप्रेमापेक्षां प्रेमानें वेडावलेल्या वल्लभाचीच छटा आपणास दिसली असती. 'कौंतेया' च्या एकाही लेखांत सामाजिक सुधारणेचा उपहास केलेला नाहीं, यावरून तो अंतर्यामीं कट्टा सुधारक असल्याचें अनुमान निघतें; व तें अनुमानही उभयतांच्या तादात्म्यासच पोषक आहे आपण त्यास सामाजिक सुधारणेची सेवा करण्याची पत्रद्वारें विनंति केली असतां त्यानें ती मान्य करण्याच्या मार्गांत जी अडचण दाखविली तीच हरिहररावांनीं राजकीय विषयावर जहाल लेख लिहिण्याच्या मार्गांत दाखविली होती. राजकीय व सामाजिक भूमिका पृथक् ठेवावयाचीं हरिहररावांनीं जीं कारणें दाखविलीं त्यांत आत्मानुभवाचें तेज चमकत होतें.

'कौंतेया 'नें आपल्या अडचणींचें स्पष्टीकरण केलें असतें तर तींच कारणें दाखविलीं असनीं यांत संशय नाहीं. टोपणनांवानें लिहिणाऱ्या लेखकास होणाऱ्या लाभांचें हरिहररावांनीं जें शब्दचित्र वठविलें तें कल्पनेनें रचिलें आहे असें त्यावेळीं आपणांस जरी वाटलें तरी तें प्रत्यक्ष अनुभवावरूनच उतरलें असावें असें हल्लीं आटोक्यांत असलेल्या साधनांवरून वाटल्यावांचून रहात नाहीं. आपण खऱ्या नांवानें सामाजिक सुधारणेस अनुकूल लेख लिहिण्याची 'कौंतेया 'स व टोपणनांवानें राजकीय विषयावर जहाल लेख लिहिण्याची हरिहररावांस अशा ज्या सूचना केल्या त्या मान्य करून कृतींत उतरविण्याचें दोघांनींही कबूल केलें, व त्याचें श्रेय आपण अज्ञानानें स्वतःकडेच घेतलें. त्या सूचना करण्याची कल्पना आपणास वास्तविकपणें हरिहररावांच्या विवेचनावरून सुचली असून त्या त्यांजकडून पूर्वीच अमलांत आलेल्या होत्या. हरिहरराव खाजगी संभाषणांत जहाल मतें बोलून दाखवीत, ती केवळ आपला संतोष राखण्याकरितां एक बतावणी आहे असें आपणास त्या वेळीं अहंभावामुळें वाटलें. पण तीं मतें प्रामाणिकपणाचीं असून त्यांजकडून त्यापूर्वीच लेखद्वारा प्रकटही झालीं होतीं. अहंकारानें आपली दृष्टि अंध झाल्यामुळें आपणाकडून आणखीही असेच प्रमाद झाले. 'कौंतेया ' च्या नांवानें प्रसिद्ध झालेली कादंबरी वास्तविकपणें हरिहररावांच्याच लेखणींतून उतरलेली असल्यामुळें आपण दाखविलेल्या दोषांचें त्यांना लीलेनें निरसन करितां आलें पण तें निरसन करून आपणास खूष करिता यावें म्हणूनच त्यांनीं आपले पूर्वग्रह बाजूस ठेवून त्या कादंबरीचा काळजीपूर्वक अभ्यास केला आहे असें आपण समजलों. या आढ्यतेनें जशी आपली दिशाभूल केली तशी त्यांच्या सद्गुणांच्या अज्ञानानेंही केली. त्यांचा स्वभाव इतका निगर्वी कीं दुसऱ्याच्या मुखानें होणारी स्वतःची स्तुति ऐकणें त्यांना अगदीं असह्य होई. ते स्वतःचे लेख जसे सामान्य समजत तसे 'कौंतेया'चेही समजत, याच्या बुडाशीं एका लेखकास दुसऱ्याच्या कीर्तीबद्दल वाटणारा मत्सर असावा असें आपणास वाटलें; पण तो केवळ त्यांच्या विनयाचा परिणाम होता. टोपणनांवानें किंवा निनांवी लेख लिहिणाराचा

हेतु त्यायोगें खऱ्या नांवानें लिहिणारापेक्षां अधिक आचारस्वातंत्र्य, सुरक्षितपणा, आनंद व कीर्ति मिळविण्याचा असतो असें जें त्यांनीं प्रतिपादन केलें त्याचाही उगम स्वतःची प्रत्येक गोष्ट क्षुद्र मानणाऱ्या त्यांच्या लीनतेंत किंवा 'कौंतेया'च्या खऱ्या स्वरूपाचें गोपन करण्याच्या त्यांच्या इच्छेंत असला पाहिजे त्यांनीं 'कौंतेया'च्या कादंबरींतील दोषांचें निराकरण केलें, पण गुणांचें आविष्करण केलें नाहीं याचेंही कारण त्यांची शालीनता हेंच असलें पाहिजे. आपण नेहमीं 'कौंतेया' चा जो कैवार घेत होतों त्यावरून व आपल्या गोष्टीच्या कथानकावरून आपलें 'कौंतेया' वरच खरें प्रेम असावें असें त्यांस वाटावयास लागून त्यांच्या मनांत स्वतःच्याच मानसपुत्रासंबंधानें मत्सराचा उदय झाला असावा, व तो दिवसेंदिवस वृद्धिंगत होत गेला असावा. बाबांवर खटला होऊन 'कौंतेया' चें खरें स्वरूप प्रकट होण्यासंबंधानें त्यांची कधीं कधीं जी प्रबळ इच्छा दिसून येई तिचा प्रादुर्भाव खुनशीपणा व दीर्घ द्वेष यांपासून होत असावा असें त्या वेळीं आपणाला वाटलें. पण ती इच्छा आपला गैरसमज दूर करण्याच्या तळमळीपासूनच निघाली होती याबद्दल आतां शंका वाटत नाहीं 'कौंतेय' या नांवाच्या व्युत्पत्तीचा प्रश्न उपस्थित झाला असतां हरिहररावांनीं तो सोडविण्याची जी टाळाटाळ केली व त्याचें खरें नांव सांगण्याची जी चुकवाचुकव केली तिचेंही रहस्य प्रतिस्पर्ध्याचा उद्वेगजनक विषय टाळण्याच्या इच्छेंत नसून 'कौंतेया' चें खरें स्वरूप लपविण्याच्या इच्छेंतच सांपडण्यासारखें आहे. आपण निघून आल्यावर 'प्रकाशां' तील लेख बेचव यावयास लागून 'कौंतेया' चे लेख फारच कडक येऊं लागले यावरून उभयतांच्या भिन्नत्वाबद्दलची आपली कल्पना दृढ झाली होती. पण आपल्या विरहांत हरिहररावांच्या अंगीं जो त्राशिकपणा उत्पन्न झाला असला पाहिजे त्यामुळेंच त्यांच्या पूर्वोक्त लेखांतील चित्ताकर्षक मवाळपणा मालवून उत्तरोक्त लेखांतील फाजील जहालपणा पालविला यांत विलक्षण वाटण्यासारखें कांहींच नाहीं. बाबांनीं आपणास लेखनकलेंतील उमेदवारी करण्यास हरिहररावांकडे पाठविलें, आपण त्यांची मुलगी हें कळल्यावर हरिहररावांनीं

कोणतीही हरकत न दाखवितां आपणाशीं विवाह करण्याची तयारी दर्शविली व बाबांनींही गुरुदक्षिणा म्हणून तरी आपण त्या विवाहास मान्यता द्यावी असें सुचविलें, यापूर्वी अस्वाभाविक वाटणाऱ्या प्रकारांची आतां नीट संगती लागते. असे विचार तिच्या मनांत कितितरी वेळ घोळत होते.

चंद्रिकेस स्वानुभवांतील एक एक गोष्ट आठवून तिची तादात्म्य-प्रमेयाच्या आधारानें जसजशी नीट संगती लागूं लागली. तसतशी तिची त्या तादाम्याबद्दल अधिकाधिक खात्री होऊं लागली. भिन्न आकारांचे व रगांचे मणि कांचेच्या नळींतून पाहिले असतां त्यांस जशीं सुंदर फुलांचीं प्रमाणशुद्ध रूपें प्राप्त होतात त्याप्रमाणें आजपर्यंत परस्परांशीं विसदृश व विसंगत वाटणाऱ्या प्रकारांकडे त्या प्रमेयाच्या दृष्टीनें पाहूं लागतांच तिला त्यांजमध्यें पूर्ण एकजिनसीपणा दिसूं लागला. हरिहररावांच्या रहस्यमय चरित्रांतील कांहीं भाग तिला अजून गूढ वाटत होते. पण त्या चरित्राचें संपूर्ण ज्ञान झाल्यावर त्यातील गूढताही नाहींशी होईल असा तिला विश्वास वाटूं लागला. हरिहररावांनीं आपल्या वाङ्मयप्रपंचाच्या सुरवातीस लिहिलेल्या सामाजिक कादंबरीवर ' कौंतेय ' या टोपण नांवानें जी टीका प्रसिद्ध झाली होती ती दुसऱ्या कोणीं लिहिली होती कीं त्यांनीं स्वतःच लिहिली होती ? त्यांनींच लिहिली असल्यास तिच्यांत दाखविलेले दोष त्यांनीं कादंबरींत राहूं कसे दिले ? त्यांनीं इतर टोपणनांवें सोडून ' कौंतेय ' हेंच टोपणनांव कां घेतलें ! त्यांनीं ' कौंतेया ' वर केलेला स्वार्थदृष्टीचा आरोप स्वतःविषयीं वाटत असलेल्या तुच्छताबुद्धीमुळें केला असें म्हणतां येईल. पण तोच आरोप त्यांनीं ' दीनकिंकरा ' सारख्या महात्म्यावर करण्याचें कारण काय असावें ? ते स्वतः व ' कौंतेय ' याजमधील अभेदाची समाजांत परिस्फुटता न करण्याचें कारण जहाल समाजसुधारक व जहाल राजकीय सुधारक या दोन्ही नात्यांनीं लिहिलेले लेख विफल होतील हें भय होतें हें मनास पटण्यासारखें आहे. पण त्यांच्याच तालमींत तयार झालेल्या दयितेपाशीं ती परिस्फुटता न करण्याचें कारण काय असावें ? त्यांनीं तिला मागणी घातली

तेव्हांच तिला आपल्या विश्वासांत घेऊन तें रहस्य सांगितलें असतें तर समाजाची दुहेरी सेवा व स्वतःचें कौटुंबिक सुख हीं दोन्ही साधून आजचा प्रसंगही टळला असता. त्या रहस्याचा परिस्फोट एका व्यक्तीपाशीं करण्याचें टाळल्यामुळें त्यांना परिणामीं त्याचा सार्वजनिक परिस्फोट करावा लागून त्या दुहेरी सेवेस व स्वसुखास मुकावें लागत आहे ! यांत त्यांनीं स्वार्थ व परमार्थ यांपैकीं काय साधिलें ? या गोष्टींचा खुलासा अमृतराव किंवा हरिहरराव यांच्या मुखानेंच होणें शक्य होतें.

चंद्रिका आजपर्यंत हरिहरराव व 'कौंतेय' यांस ऋण व धन विद्युल्लतांप्रमाणें परस्परविरोधी समजत आली होती. त्या दोघांमधील विरोध वास्तविक नसून भासमान आहे याबद्दल तिची खात्री होतांच एकाच विद्युद्यंत्राच्या ऋणधन विद्युल्लतांच्या तारा जुळविल्यानें जसा स्फोट होतो तसा तिच्या मनाला आश्चर्याचा धक्का बसून तें कांहीं वेळ स्तिमित झालें यांत नवल नाहीं. तिची विचारशक्ति परत आली तेव्हां तिला हरिहररावांसंबंधींच्या आपल्या भावनेंत विलक्षण फरक पडलेला दिसून आला. तिला त्यांजबद्दल जो आदर वाटत होता त्यांत 'कौंतेया'बद्दल वाटणाऱ्या आदराची भर पडली होती. प्रत्येकाबद्दल वाटणाऱ्या आदरांत पूर्वी शंकाकुशंकांचें जें किल्मिष होतें तें आतां पूर्णपणें नष्ट झालें होतें. हरिहररावांकडे वहाणाऱ्या तिच्या एकवटलेल्या आदराचा ओघ समुद्रास मिळूं पाहणाऱ्या गंगेच्या यमुनासंगमानें फुगलेल्या ओघाप्रमाणें प्रचंड, शुभ्र व पवित्र असा बनला होता. अशा बुद्धिमान्, विनयशील, सुस्वभावी, लोककल्याणकर्त्या, कनवाळू, उदार व प्रेमळ पुरुषावर आपल्या हेकेखोरपणामुळें केवढें संकट आलें आहे याची तिला योग्य जाणीव झाली, त्या वेळीं तिचें मन दुःखानें वेडें होण्याच्या बेतांत आलें. हरिहररावांवरील संकट तिला आपणावर ओढून घेतां आलें असतें तर तिनें तें आनंदानें ओढून घेतलें असतें. ती गोष्ट शक्य नसल्यामुळें पुढें काय काय भयंकर प्रसंग ओढवतात हें चिंतातुर, संशयग्रस्त पण निराश मनानें पहाणें तिला भाग होतें.

ज्या दिवशीं अमृतरावांस पकडलें त्याच दिवशीं त्यांच्या घराची व कार्यालयाची झडती घेण्यांत येऊन 'चंद्रिका' मासिकाचे अंक व इतर बरेच कागदपत्र जप्त करण्यांत आले. त्यानंतर हरिहरराव नाशिक येथें सरकारच्या स्वाधीन झाले तेव्हां अमृतरावांस तांतडीनें नाशकास नेण्यांत येऊन हरिहरराव व सरकार यांमध्यें ठरलेल्या कराराअन्वयें त्यांची बिनशर्त मुक्तता करण्यांत आली. तथापि ते आपल्या स्नेह्याच्या बचावाच्या तजविजीकरितां नाशिक येथेंच राहिले. त्यांस व हरिहररावांस भेटण्याची चंद्रिकेस अत्यंत उत्कंठा वाटत होती. पण अमृतरावांनीं मुक्तता होतांच तिला धाडिलेल्या पत्रामुळें तिला आपली उत्कंठा आवरून वृत्तपत्रांत येणाऱ्या बातम्यांवरच समाधान मानून घ्यावें लागलें. "हरिहररावांवर ओढवलेला प्रसंग बाबूच्या कानांवर जाणें इष्ट नाहीं तो नाशकास आल्यास तो प्रसंग त्यास कळणें अपरिहार्य होईल. त्याचा संभाळ करण्याची जबाबदारी तूं आपणाकडे घेतलेली असल्यामुळें त्यास मुंबईत ठेवून तूं एकटीच नाशकास येणेंही इष्ट नाहीं. सबब तूं त्याच्यासह तेथेंच राहून त्याच्या वडिलांची आपत्ति त्यास कळणार नाहीं अशाविषयीं खबरदारी घ्यावी. वृत्तपत्रांतल्या बातम्यांहून विशेष असें कळविण्यासारखें असल्यास मी कळवीनच." असा त्यांच्या पत्राचा मथितार्थ होता.

हरिहररावांस भेटण्याची बाबूची उत्कंठा अलीकडे फारच वाढली होती. त्यानें नाशकास जाण्याबद्दल चंद्रिकेच्या मागें सारखा तगादा लाविला होता, व ती कोणती ना कोणती तरी सबब दाखवून तें जाणें लांबणीवर टाकीत होती. अमृतरावांस पकडून नेल्याची गोष्ट तिनें त्याजपासून गुप्त ठेविली होती. 'बाबा बाहेरगांवीं गेले आहेत, ते परत आल्यावर आपण नाशकास जाऊं.' या आश्वासनाचें मधाचें बोट तिनें त्यास लावून ठेविलें होतें व त्या आशेवर त्यानें आपलें अधीर मन थोपवून धरिलें होतें. "बाई, आतां लौकरच बाबा भेटतील, नाहीं ?" असा त्यानें तिला अतुरतेनें प्रश्न केला म्हणजे ती होकारार्थी मान हलवी पण त्या वेळीं 'आपण या अर्भकास फसवीत आहोंत. हरिहरराव निर्दोष सुटण्याची मुळींच आशा नाहीं. त्यांना दीर्घ मुदतीची

शिक्षा झाल्यास बापलेकांची भेट न होतां दोघे परस्परांच्या विरहदुःखानें गत होण्याचाच विशेष संभव.' हा अंतःकरण पिळवटून टाकणारा विचार मनांत येऊन तिला बाबूबद्दल पराकाष्ठेची करुणा व हळहळ वाटे व त्यांच्या भरांत ती त्यास घट्ट पोटाशीं धरी.

हरिहररावांची चौकशी करण्याकरितां ज्या गोऱ्या न्यायधीशाची खास नेमणूक करण्यांत आली होती तो हरिहररावांचा चहाता होता. एका प्रागतिक पत्राचे बाणेदार संपादक म्हणून तो त्यांस ओळखीत असे. लोककल्याणाच्या कामीं सरकारशीं सहकारिता करण्यांत त्यांची जी तत्परता दिसून येई तिजमुळें त्याचा त्याजबद्दल अत्यंत अनुकूल ग्रह झाला होता. त्यानें एकदा त्यांस सरकारांतून एक बडी पदवी मिळवून देण्याबद्दल बरीच खटपट केली होती; व ती पदवी घेण्याचें त्यांनी आभारपूर्वक नाकारल्यापासून त्याचा तो ग्रह वृद्धिंगत झाला होता ते 'कौंतेया'चे वैरी आहेत ही जगजाहीर गोष्ट त्यासही माहीत होती, व 'कौंतेया'चें खरें नांव त्यांजकडून माहीत होण्याचा संभव असल्याबद्दल त्याजकडून सूचना झाल्यामुळेंच सरकारतर्फे त्यांच्याशीं त्या बाबतींत बोलणें सुरू झालें होतें. पूर्वी देऊं केलेल्या पदवीहून मोठ्या पदवीचें जें आमिष त्यांस या वेळीं दाखविण्यांत आलें होतें तेंही त्याच्याच प्रेरणेनें हरिहररावांच्या खटल्याकरितां अशा अंमलदाराची निवड करून सरकारनें जनतेची बरीच सहानुभूति संपादन केली होती. त्याचा पूर्वीचा आदर अजूनही कायम आहे कीं काय हें कळण्याचें मात्र कांहींच साधन नव्हतें, कारण तो मितभाषी असून त्याची मुद्राही नेहमीं निर्विकार दिसे.

हा राजद्रोहाचा खटला बऱ्याच महत्त्वाचा असल्यामुळें त्यांत सरकारतर्फे व आरोपीतर्फे उभे राहिलेले वकील आपल्या कायदेपांडित्यबद्दल, चाणाक्षपणाबद्दल व फौजदारी कामांतील हुशारीबद्दल सबंध मुंबई इलाख्यांत नांवाजलेले असेच होते. हरिहररावांच्या प्रागतिक व राष्ट्रीय या दोन्ही भूमिका या वेळीं एकत्रित झालेल्या असल्यामुळें त्यांस दोन्ही पक्षांकडून सारखीच मदत होत होती.

आरोपीतर्फे जामीनकीवर सुटका होण्याबद्दल अर्ज दाखल करण्यांत आला. त्यांजबद्दल वाटेल त्या रकमेस जामीन रहाण्यास त्यांचे अनेक संपन्न स्नेही पुढें आले.परंतु लोकमत प्रक्षुब्ध झालें असल्यामुळें आरोपी सोडल्यास दगा होण्याचा संभव आहे या सबबीवर तो अर्ज नामंजूर करण्यांत आला. न्यायाधीश व आरोपी यांजमधील पूर्व संबंध जनतेस माहीत असल्यामुळें ही एक न्यायनिष्ठुरपणाची व कडकपणाची बतावणी आहे असाच तिनें कयास केला. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांकडून हरिहररावांच्या सुखसोयींकडे पूर्ण लक्ष्य पुरविण्यांत येत असल्यामुळें नामंजुरीच्या हुकमानें त्यांची फारशी गैरसोयही होण्यासारखी नव्हती. हुकुमावर अपील करून न्यायाधीशास चिडविण्यांत मतलब नाहीं, सरकारतर्फेचा सर्व पुरावा तयार असल्यामुळें खटल्याची तहकुबी होऊन विनाकारण खोळंबा होण्याचा संभव, असा विचार करून अपील न करण्याचेंच हरिहररावांच्या सल्लागारांनीं ठरविलें.

खटला चालवयाचा त्या दिवशीं न्यायमंदिरांत प्रेक्षकांची नुसती खेंच झाली होती. प्रागतिक व राष्ट्रीय या दोन्ही पक्षांचे पुरस्कर्ते दूरदूरच्या ठिकाणांहून मुद्दाम हा खटला पहाण्याकरितां गोळा झाले होते. त्यांपैकीं कांहींजणांस हरिहरराव व 'कौंतेय' हे खरोखरच एक आहेत कीं हरिहररावांची कबुली ही अमृतरावांस वांचविण्याकरितां काढलेली शक्कल आहे हें जाणण्याची अतोनात उत्कंठा वाटत होती. हरिहररावांस शिक्षा झाल्यास आपला पक्ष एका उत्तम लेखकाच्या सेवेस मुकेल अशी कांहींजणांस भीति वाटत होती. ग्रामस्थांपैकीं ज्यांना ज्यांना त्यांच्या सौजन्याची, चारित्र्याची, औदार्याची व परोपकाराची माहिती होती असे लोक त्यांजविषयींच्या सहानुभूतीनें एकत्र जमले होते व ते निर्दोष सुटावे म्हणून मनांतून देवाचा धांवा करीत होते. कांहींजण हा थोर पुरुष संकटांत कसें वर्तन करितो हें पाहण्याच्या इच्छेनेंच केवळ आले होते. प्रेक्षकांचे हेतु याप्रमाणें जरी वेगवेगळे असले तरी त्या सर्वांना आरोपीबद्दल सहानुभूति वाटत असल्याचें उघड होत होतें.

आरंभीं चौकशी करणाऱ्या पोलीस अंमलदारांच्या साक्षी झाल्या. त्यानंतर खटल्यांतील अत्यंत महत्त्वाचे साक्षीदार अमृतराव यांचें नांव

पुकारण्यांत आलें. त्याबरोबर सर्व प्रेक्षकांचे डोळे न्यायमंदिराच्या दरवाज्याकडे वेधले गेले. अमृतराव मंद गतीनें व खिन्न मुद्रेनें आंत आले. स्वतःच्या उपकारकर्त्या स्नेह्याच्या विरुद्ध साक्ष देणें त्यांना प्राणसंकट वाटत असावेंसें दिसत होतें शपथ देण्याचा विधि रीतसर आटोपल्यावर त्यांची तपासणी, उलटतपासणी व फेरतपासणी झाली. त्या वेळीं तेथें जमलेल्या विविध योग्यतेच्या, भिन्न हेतूंच्या व निरनिराळ्या मनोधर्मांच्या लोकांची निःस्तब्धतेंत पूर्ण एकवाक्यता दिसत होती. साक्षीदाराच्या मुखानें निघणारी विलक्षण हकीकत जो तो आपले कान व अवधान एकाग्र करून ऐकत होता. त्या हकीकतींतून प्रश्नोत्तरांमुळें उत्पन्न झालेला त्रुटितपणा, क्रमविपर्यास व संदिग्धपणा काढून टाकून आणि तिजमधील अपूर्णता भरून काढून ती स्पष्ट व संगतवार रीतीनें खालीं दिली आहे.

हरिहररावांचे वडील विद्याधरपंत व अमृतराव मुंबईंत शेजारींच रहात असत. हरिहरराव हे आपल्या वडिलांचे एकुलते एक चिरंजीव. सामाजिक बाबतींत विद्याधरपंतांचा ओढा समाजसुधारणेकडे असून अमृतराव पुराणप्रिय असत. राजकीय बाबतींत अर्थातच विद्याधरपंत प्रागतिक व अमृतराव जहाल असत. तथापि दोघेहि मनमिळाऊ असल्यामुळें त्यांजमध्यें खटका होण्याचा प्रसंग कधीं आला नाहीं. अमृतरावांचें विद्याधरपंतांकडे नेहेमीं येणें जाणें असे. त्या उभयतांमध्यें चर्चा होई तेव्हां हरिहर ती सावधान चित्तानें ऐकत बसे. त्या चर्चेचा त्या दोघांवर जरी कांहींच परिणाम होत नसे तरी हरिहरावर झाल्यावांचून राहिला नाहीं. प्रजाजनांच्या दुर्दशेनें त्याच्या अंतःकरणास जसा पीळ पडूं लागला तसा विधवांच्या व अस्पृश्यांच्या हालअपेष्टांनींही पडूं लागला; व प्रजेच्या समान हक्कांबद्दल त्यास जशी आस्था वाटूं लागली तशी स्त्रियांच्या व मागासलेल्या वर्गांच्या हक्कांबद्दलही वाटूं लागली. तो फार बुद्धिमान व तरतरीत असल्यामुळें त्यानें लौकरच अमृतरावांचें लक्ष्य आपणाकडे आकर्षून घेतलें. त्याजमध्यें सौजन्य, सत्यवादित्व, न्यायप्रियता, निश्चयीपणा, सहिष्णुता इत्यादि इतरही गुण दिसून आल्यामुळें त्यांचा त्याजवर फारच लोभ जडला. मराठी भाषेवर व वाङ्मयावर हरिहराचे

त्या बालवयांत सुद्धां निःसीम प्रेम जडण्यास अमृतरावांची शिकवणच कारणीभूत झाली. अमृतरावांचें वाचन दांडगें असून त्यांचा प्राचीन व अर्वाचीन मराठी वाङ्मयाशीं मार्मिक परिचय होता. त्याचा समाजास लाभ करून देण्याकरितां त्यांनीं 'चंद्रिका' नांवाचें मासिक काढिलें होतें. पण त्यांच्यांत रसिकता व मार्मिकता ज्या प्रमाणांत वसत होतीं त्या प्रमाणांत कल्पकता व भाषाप्रभुत्व वसत नव्हतीं, यामुळें त्यांचे लेख चित्ताकर्षक नसत, व त्यांच्या मासिकाचा खपही विशेष नसे त्याच्यासारखी गंभीर, विधायक टीका इतर मासिकांतून क्वचित्‌च दिसून येई. चुरचुरीत, विघातक टीका मात्र त्याच्या लेखणींतून कधीं उतरत नसे. किंबहुना तशी टीका परिणामकारक रीतीनें लिहिण्यास जरूर असणारें साहित्यच त्यांच्यापाशीं नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. त्यांनीं हरिहराच्या अभिरुचीस बालपणापासूनच योग्य वळण लाविलें तो जे गद्यपद्यात्मक लेख लिहून आणी त्यांत दिसणाऱ्या अभिनव कल्पनांवरून तो पुढें नामांकित लेखक होईल असें भविष्य त्यांनीं त्याच वेळीं वर्तविलें. पण कल्पकता या धनात्मक गुणाइतकीच निर्दोषत्व या ऋणात्मक गुणाचीही आदर्शभूत वाङ्मयास आवश्यकता असते असें त्यांचें मत असल्यामुळें ते त्या लेखातील दोष त्या होतकरू बाल-लेखकास निर्भीडपणें दाखवीत असत. त्याबरोबरच त्याचा हिरमोड होऊन त्याच्या फोंफावणाऱ्या प्रतिभेचा संकोच होऊं नये याविषयीं ते खबरदारी घेत. यामुळें त्याची लेखनसरणी निर्दोष व जोमदार होत गेली. आपले अपरिपक्व लेख जगापुढें माडण्याची अप्रौढ लेखकास जी उतावीळ असते मी हरिहरासही असे. आपले लेख 'चंद्रिकें'त प्रसिद्ध व्हावे असें त्यास वाटे. पण ती त्याची इच्छा अमृतराव आवरून धरीत असत. नुक्तेंच जन्मलेल्या बालकाप्रमाणें वाङ्मयही कांहीं दिवस अंधारांत राहणेंच इष्ट असतें लेखकानें आपले अर्धकच्चे विचारच समाजापुढें मांडिल्यास ते त्याजकडून टीकारूपी तव्यावर जळून कोळ होत तोपर्यंत भाजण्यांत येतात; व त्यांनीं त्याच्या तोंडास फांसलेली काळोखी धुवून काढण्यास त्यास अनेक वर्षांचे परिश्रम खर्चीं घालावे लागतात. उलट पक्षीं वाङ्मयप्रेमी स्नेह्यांच्या खाजगी टीकां-

तून तावून सुलाखून निघालेलें वाङ्मय प्रसिद्ध झाल्यावर टीकाग्नींत कितीही होरपळून निघालें तरी त्याचें तेज कमी होण्याऐवजीं वाढतच जातें या गोष्टी हरिहराच्या मनावर ठसविण्याचा अमृतराव आपणा-कडून बराच प्रयत्न करीत. पण त्याच्या अधीर मनाला त्या फारश पटत नसत. हळू हळू तो आपले लेख अमृतरावांस दाखवीनासा झाला. वाढत्या अभ्यासामुळें लेख लिहिण्यास त्यास फुरसदच होत नाहीं असा साहाजिकच त्यांचा समज झाला. यानंतर लौकरच हरिहर विश्वविद्या-पीठाची प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाला, त्या वेळीं तो अमृतरावास भेटाव-यास गेला असतां त्याची विद्यार्थिदशा संपपर्यंत त्यास मुळींच त्रास द्यावयाचा नाही. पण त्याची अखेरची परीक्षा पसार होतांच त्यास ' चंद्रिका ' मासिकाचा सहकारी संपादक करावयाचें असा विचार त्यांनी त्याजपाशीं बोलून दाखविला. त्यावेळीं त्यांची एकुलती एक व मातृहीन मुलगी चंद्रिका पांच वर्षांची होती. "तुम्हां उभयतांच्या वयांमध्यें फार अंतर नसतें तर त्या 'चंद्रिके'बरोबरच या चंद्रिकेलाही मीं तुमच्याच गळयांत बांधिलें असतें." असें अमृतराव या प्रसंगीं थट्टेनें बोलून गेले. अमृतरावांच्या या प्रसंगींच्या बोलण्याचा कटाक्ष आपणास विद्यार्थि दशेनंतर संपादकत्वात भागीदार करावयाचे यावर नसून विद्यार्थिदशेंत आपले लेख 'चंद्रिकें'त घ्यावयाचे नाहींत यावरच विशेष आहे असें हरिहराच्या मनानें घेतलें व तेव्हांपासून त्यानें अमृतरावांच्या घरीं जाणें येणें अजीबाद टाकिलें. त्याच्या वडिलांची याच सुमारास नाशिकास बदली होऊन तो स्वतःही पुण्याच्या एका कॉलेजांत शिकावयास निघून गेल्यामुळें त्याच्या मनांतील अढी अमृतरावांच्या लक्षांत आली नाहीं

विद्यालयांत असतां हरिहराचा मराठी भाषेवरील व्यासंग चालूच होता. पण त्यानें त्याच्या अभ्यासांत व्यत्यय मात्र मुळींच आला नाहीं. शर्यतींत एकादा पाणीदार घोडा मार्गांतील सारे खंदक व कुंपणें सपाट्यासरशीं ओलांडून सर्वांच्या आधीं संकेतस्थान गांठतो त्याप्रमाणें त्यानें प्रत्येक परीक्षेंत पहिल्याच खेपेस यश मिळवीत व अनेक बक्षिसें व शिष्यवृत्ति पटकावीत ज्ञानगिरीचें अत्युच्च शिखर अल्पावधींतच गांठलें. त्यापूर्वींच त्याचा विवाह होऊन त्याच्या कुटुंबांत एका माण

साची भर पडली होती. पण हा लाभ सहन न होऊनच कीं काय, दैवानें त्याजवरील मातापितरांचें छत्र हिरावून त्याची अपरिमित हानिही केली होती.

इतर पदवीधरांच्याप्रमाणें न्यायखात्यांत किंवा वकिलीच्या धंद्यांत पडण्याचा त्याचा कधींच विचार नव्हता. 'चंद्रिका' मासिकाचा सहकारी संपादक होऊन त्या मासिकास ऊर्जितावस्थेस आणावयाचें हीच त्याची महत्वाकांक्षा होती. त्या मासिकाची अलीकडे फारच दैन्यावस्था झाली होती. त्याच्या जन्मापासून लोटलेल्या दहा वर्षांत अनेक नवीं नवीं मासिकें निघून त्यांनीं त्याच्यापुढें आघाडी मारिली होती. त्यांच्याशीं स्पर्धा करितां करितां अमृतराव टेंकीला आले होते. त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं योजिलेल्या युक्त्या त्यांनींही अमलांत आणून पाहिल्या. पण त्या युक्त्या संपादकाच्या थोर दर्जास कमीपणा आणणाऱ्या आहेत असें त्यांचें मत असल्यामुळें त्या जशा मनःपूर्वक करावयास पाहिजे होत्या तशा त्यांजकडून झाल्या नाहींत. यामुळें त्यांस इतर मासिककर्त्यांच्या बरोबरीनें खर्च येऊन यश मात्र अल्पांशानेंही मिळालें नाहीं. हरिहरराव शेवटच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले हें कळतांच त्यांनीं त्यांस काकुळतीनें पत्र लिहून आपल्या साह्यास धांऊन येण्याची विनंति केली. हरिहररावांचा त्यांजवरील राग हा वेळपर्यंत मावळल्यासारखा झाला होता, तो या पत्रानें पार नाहींसा केला. अमृतरावांकडून पत्र येण्याची ते वाटच पहात होते. आपण संपादकाची जबाबदारी शिरावर घेण्यास किती योग्य झालों आहोंत याची चुणूक दाखवून आपल्या वाङ्मयगुरूस आश्चर्यचकित करण्याकरितां त्यांनीं परीक्षा व निकाल यांमध्यें मिळालेल्या अवकाशांत एक सामाजिक कादंबरी लिहून काढिली होती; व तिच्या छपाईचें कामही संपवीत आणिलें होतें. अमृतरावांचें पत्र आल्यावर तें काम संपवून व त्या कादंबरीस त्यांच्या नांवाची अर्पणपत्रिका जोडून त्यांनीं ती आपल्या मान्यतादर्शक पत्रासोबत त्यांजकडे पाठवून दिली. त्या कादंबरीचा चोहोंकडे अपूर्व जयजयकार झाला. पण त्यानें हरिहररावांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यांस आपल्या गुरूची पसंती पाहिजे होती, व त्यांचे डोळे अमृतरावांच्या पत्राकडे

लागले होते. कांहीं दिवसांनीं तें पत्र आलें. त्यांत त्यांनीं आपल्या शिष्यानें मिळविलेल्या लेखननैपुण्याबद्दल व कीर्तीबद्दल त्याचें मनः-पूर्वक अभिनंदन केलें होतें, पण कादंबरी छापण्यापूर्वी आपणास न दाखविल्याबद्दल त्यास दोषही दिला होता तिच्यांत कोणते व केवढे मोठे दोष राहिले आहेत हें त्यांनी पूर्वीइतक्याच निर्भीडपणानें हरिहर-रावांच्या नजरेस आणिलें होतें. ते दोष असतांही कादंबरीनें इतकी लोकप्रियता मिळविली याचें कारण लेखकाची प्रतिभा व त्यानें मराठी भाषेवर केलेले परिश्रम होत लेखक 'चंद्रिके' चा सहकारी संपादक झाल्यास तिला आजपर्यंत कोणत्याही युक्तीनें मिळालें नाहीं इतकें यश अत्यंत अल्प अवधींत मिळेल, तो पुढें मागें आपणास येऊन मिळणार याच आशेवर तें मासिक आपण आजपर्यंत जगविलें आहे व तें त्याच्या स्वाधीन करून विश्रांति घेण्यास आपण तयार आहोंत असेंही अमृत-रावांनीं त्या पत्रांत लिहिलें होतें.

पत्र मिळालें त्याच दिवशीं हरिहरराव मुंबईस अमृतरावांस भेटण्या-करितां निघाले. त्यांजमध्यें झालेला संवाद संक्षेपानें खालीं दिला आहे.

हरि०—'चंद्रिके'चा सपादक झाल्यास मला समाजसुधारणेच्या बाजूनें लेख लिहितां येणार नाहींत.

अमृ०—'चंद्रिके'चें धोरण राष्ट्रीय आहे, तेव्हां तें ओघानें आलेंच.

हरि०—पण मला राजकीय सुधारणेबद्दल जितकी आस्था वाटते तितकीच सामाजिक सुधारणेबद्दलही वाटते. एकीला मी व्यक्त स्वरूप द्यावें आणि दुसरी तशीच मनांतल्या मनांत जिरूं द्यावी असें का आपलें म्हणणें आहे ?

अमृ०—दोहोंपैकीं कोणत्या तरी एका सुधारणेला तुम्हांला सर्वस्वीं वाहून घेतलें पाहिजे. तुम्ही दोघींचा पुरस्कार कराल तर तुमच्या मनाला समाधान वाटेल हें खरें, पण तुमच्या राजकीय काय किंवा सामाजिक काय, लेखांचा समाजावर मुळींच परिणाम होणार नाहीं. समाजाचे प्रागतिक व राष्ट्रीय असे दोन अगदीं भिन्न व पृथक् भाग पडले आहेत, व त्यांना आपापल्या पक्षांचींच नियतकालिकें पाहिजे

असतात हा माझा गेल्या दहा वर्षांचा अनुभव आहे राष्ट्रीयप्रागतिक अशी द्विविध स्वरूपाची व्यक्ति समाजाला जलमाणसाप्रमाणें अशक्य तरी वाटते किंवा वडवाघळाप्रमाणें अपशकुनी तरी वाटते.

हरि०—पक्षाभिमान न धरतां स्वतंत्रपणें केवळ सत्यान्वेषण करूं पाहणारा एकही इसम सांपडणार नाहीं असें म्हणतां ?

अमृ०—तुम्ही समोर असतां मी तसें कसें म्हणेन ? पण अशा माणसांचें प्रमाण फारच कमी असतें. सामान्य मनुष्याला आपलें मत सत्यच वाटत असतें. त्या मतांत बदल करून त्याचें मनःस्वास्थ्य बिघडविणाऱ्या वाङ्मयापेक्षां त्या मताला पुष्टि देऊन तें स्वास्थ्य कायम ठेवणारें वाङ्मयच त्यास पसंत असतें. पूर्वोक्त वाङ्मयानें त्याच्या आत्मप्रौढीस धक्का बसतो, व उत्तरोक्त वाङ्मयानें ती कायम रहाते हेंहि कारण त्याच्या आवडीनावडीच्या मुळाशीं असतें.

हरि०—मला तर अशा लोकांकरितां लेख लिहिण्यापेक्षां सत्यैकपक्षपाती वाचकांकरितां लिहिणेंच पसत आहे.

अमृ०—अशा पांचदहा वाचकांकरितां नियतकालिक काढण्याची तरी काय जरूर आहे ? त्यांचें समाधान खाजगी पत्रव्यवहारानें सुद्धां होऊं शकेल.

हरि०—मग दोहोंपैकीं एका पक्षातर्फे तरी लिहिलें पाहिजे किंवा कोणत्याच पक्षातर्फे लिहितां कामा नये असें आपलें म्हणणें ?

अमृ०—छेः छेः ! तसें कसें म्हणतां येईल ? इतकीं वर्षें लेखनावर परिश्रम घेतले, ते फुकटच दवडावयाचे कीं काय ? तुमच्या लेखांचा सामाजिक किंवा राजकीय दृष्टीनें उपयोग झाला नाहीं तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें खास होईल.

हरि०—म्हणजे मी गतभर्तृकांचा केशरूपी अलंकार हिरावून घेण्याच्या विरुद्ध लेख लिहिला कीं वाचक माझ्या वाक्यांतील अलंकाराची तारीफ करणार, मी समाजांतील व्यंगें दाखवूं लागलों कीं, ते माझ्या शब्दांतील व्यंग्यार्थ हुडकून काढणार, मी प्रजेच्या समान

हक्कांची तरफदारी करूं लागलों कीं, ते माझ्या वाक्यांच्या समतोलपणावर खूष होणार असेंच कीं नाहीं आपलें म्हणणें? सुंदर रूपाची स्तुति करण्याऐवजीं सुंदर वेषाची करण्यासारखेंच हें आहे. कागद, छपाई, बांधणी यांच्या प्रशंसेपेक्षां मी तिला अधिक किंमत देत नाहीं.

अमृ०—दुसऱ्याचा वेष आपल्या अंगावर चढवितां येतो, पण रूप चढवितां येत नाहीं. त्याप्रमाणें दुसऱ्याची भाषा आपणास उचलतां येते, पण मतें उचलतां येत नाहींत. मतांचे धागेदोरे आत्म्याच्या मर्मापर्यंत भिडलेले असतात, यामुळें त्यांजबद्दल मनुष्यास आपलेपणा वाटतो. तसा भाषेबद्दल वाटत नाहीं; व म्हणून भाषेचा जसा निर्विकार दृष्टीनें विचार करितां येतो तसा मतांचा करितां येत नाहीं.

हरि०—म्हणून मलाही माझ्या मतांचा सर्वांशीं किंवा अंशतः त्याग करितां येत नाहीं. त्यांचा त्याग करणें म्हणजे आत्म्याची उपासमार करणेंच होईल. प्रागतिक पक्षाच्या संतोषाखातर पाहिजे तर निराळें नियतकालिक काढण्यास मी तयार आहें. त्याच्या व 'चंद्रिके'च्या मध्यस्थीनें मला माझे उभयविध विचार प्रदर्शित करितां येतील.

अमृ०—तरी सुद्धां दोन्ही प्रकारचे लेख तुमच्या एकट्याच्याच नावानें प्रसिद्ध होणें इष्ट नाहीं.

हरि०—बरें, मीं आपले नेमस्तपणाचे विचार 'चंद्रिकें'तच टोपणनांवानें प्रसिद्ध केले तर ?

अमृ०—छेः छेः ! परस्परविरुद्ध मतांचा उगम एक आहे हें जसें समाजास कळतां कामा नये तसें त्यांच्या प्रसिद्धीचें स्थान एक आहे हेंही कळतां कामा नये.

हरि०—तर मग 'चंद्रिकें'त माझीं राष्ट्रीय मतें टोपणनांवानें व माझ्या स्वतःच्या नियतकालिकांत माझीं प्रागतिक मतें खऱ्या नांवानें प्रकट करणें अपरिहार्य आहे असेंच म्हटलें पाहिजे.

अमृ०—या योजनेनें तुमच्या लोकप्रियतेचा फायदा तुमच्या स्वतःच्या नियतकालिकास जसा मिळेल तसा 'चंद्रिके'स मिळणार नाहीं.

हरिः—माझी लोकप्रियता माझ्या कादंबरीमुळेंच उत्पन्न झाली आहे. 'चंद्रिके'त टोपणनांवानें येणाऱ्या माझ्या पहिल्या लेखाचा विषय ती कादंबरीच असेल तर त्या टोपणनांवास, त्याखालीं येणाऱ्या लेखांस व 'चंद्रिके'स तितकीच लोकप्रियता मिळावयास हरकत नाहीं.

अमृ०—म्हणजे ? मी नाहीं समजलों.

हरि०—उद्यां मी तो लेख तयार करूनच आणतों. म्हणजे माझ्या म्हणण्याचें निराळें स्पष्टीकरण करण्याचें कारण उरणार नाही.

त्या दिवशीं रात्रभर जागून हरिहररावांनीं स्वतःच्या कादंबरीवरच एक प्रतिकूल टीका लिहिली. तिच्यांत अमृतरावांनीं आपल्या पत्रांत कळविलेल्या दोषांचीच विस्तारानें व झणझणीत भाषेंत चर्चा केली होती. कादंबरी लेखकाचा त्या टीकेंत इतका उपहास व पाणउतारा केला होता कीं कादंबरीकार व टीकाकार एकच आहेत याचा वाचकांस संशय येणें शक्यच नव्हतें. ती टीका घेऊन ते अमृतरावांकडे गेले ती वाचून अमृतराव म्हणाले, "या टीकेनें 'चंद्रिके'स लोकप्रियता संपादन करितां येईल यांत संशय नाहीं पण तिनें तुमची स्वतःची कीर्ति दूषित होईल याची काय वाट ? ही धडधडीत आत्महत्या आहे ही टीका मी प्रसिद्ध करणें म्हणजे मी सुद्धां आपला आत्मनाश करून घेणेंच आहे. कर्त्यानें आपली कादंबरी थोरपणानें ज्या स्नेह्यास अर्पण केली आहे तो आपल्या मासिकांत अशी टीका कधीं तरी प्रसिद्ध करील का ? ती प्रसिद्ध करणें म्हणजे त्यानें स्वतःचा नीचपणा जाहीर करण्यासारखें होणार आहे. मी या गोष्टीला कधींच मान्यता देणार नाहीं. मग माझ्या हट्टाच्या पायीं 'चंद्रिका' रसातळाला गेली तरी पर्वा नाहीं. स्वतःचा योगक्षेम नीट चालावा म्हणून मी तुमच्या कीर्तीचे असे धिंडवडे काढूं ? ते एखाद्या स्वार्थसाधूस साधेल. मला कालत्रयींही साधणार नाहीं.

हरि०—पण येथें स्वार्थाचा संबंधच मुळीं येत नाहीं. स्वार्थाकरितां नव्हे तर मित्रकार्याकरितां व समाजहिताकरितां आपण हा लेख छापावा अशी माझी विनंति आहे. त्यानें माझी कीर्ति

मलिन न होतां निष्कलंक राहील, आणि समाजाचा व माझा असा दोघांचाही संतोष राहील. मला समाजानें दुटप्पी न म्हणतां माझी दुहेरी सेवा मान्य करून घ्यावी अशी मजप्रमाणेंच आपलीही इच्छा असेल तर मी व 'कौंतेय' या दोन व्यक्ति भिन्न आहेत असा समाजाचा समज कायम ठेवण्याच्या कामीं आपण मला मदत केली पाहिजे.

अमृ०—हा 'कौंतेय' कोण ?

हरि०—तें माझें टोपणनाव.

अमृ०—अस्सें ! आणि समाजाचा तो समज कायम ठेवण्यासाठीं मीही तुमच्याशीं शत्रुत्व असल्याची बतावणी केली पाहिजे तर ?

हरि०—बरोबर ताडलेंत. आपण तशी बतावणी केली तर माझें रहस्य फुटण्याचें भय मुळींच राहणार नाहीं. आपणांस अर्पण केलेल्या कादंबरीवर आपण आपल्याच मासिकांत प्रतिकूल टीका येऊं दिली हें त्या शत्रुत्वाचे उघड उघड कारण दिसत असतां ती बतावणी खोटी वाटण्याचें थोडेंही कारण रहाणार नाही. त्या बतावणीच्या सपादणीकरितां आपल्या जुन्या ऋणानुबंधावर पाणी सोडण्यालाही आपण उभयतांनीं तयार झालें पाहिजे. मी हें सारें केवळ स्वार्थदृष्टीनें सुचवीत आहें. आपण त्यास समति दिल्यास तो मात्र अपूर्व स्वार्थत्याग होणार आहे.

अमृ०—एकादी गोष्ट मनावर घेतल्यावर ती अर्धवट सोडून देणें रास्त होणार नाहीं हरिहरराव, तुमच्या चारित्र्यास पूर्णता यावी म्हणून मी स्वतःच्या सुखांत अपूर्णता राहूं देण्यास तयार आहें. माझ्या 'चद्रिके'चेंही त्यांत कल्याण आहे, त्याअर्थी माझ्या हिताच्या दृष्टीनेंही तें इष्टच आहे. पण आपलें रहस्य यशस्वी रीतीनें गुप्त ठेवावयाचें असेल तर परस्परशत्रुत्वाच्या या ढोंगाशिवाय इतरही उपाय योजावे लागतील.

हरि०—अर्थातच. मी 'कौंतेया'चे लेख स्वतःच्या हातानें लिहून टपालाच्या खांबांतही स्वतःच टाकीत जाईन. त्या लेखांकरितां मी मोडी लिपी उपयोगांत आणून इतर लेखांकरितां व पत्रव्यवहाराकरितां बाळ-

बोध लिपी वापरीत जाईन. माझें आपणांस एकही खाजगी पत्र येणार नाहीं, व आपलेंही मला येऊं नये.

अमृ०—चंद्रिकेच्या लग्नाची कुंकुमपत्रिकाही पाठवायाची नाहीं का?

हरि०—न पाठविलेली बरी

अमृ०—बरें, तुमच्या लेखांची स्वतंत्र आवृत्ति काढण्याचा योग आल्यास तिचें उत्पन्न तुमच्याकडे पाठविण्याची कशी काय व्यवस्था करावयाची?

हरि०—तें मजकडे पाठवावयाचेंच नाहीं मुळीं. तें उत्पन्न 'दीन-किंकर' हें टोपणनांव धारण करणाऱ्या व आपलें खरें नांव गुप्त ठेवू पाहणाऱ्या एका इसमाची ठेव आहे असें समजून आपण तिचा विनियोग स्त्रिया व अस्पृश्य यांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ करावयाचा.

अमृ०—इतका कडेकोट बंदोबस्त केल्यावर रहस्य फुटण्याची भीति उरणार नाहीं खरीच. तर मग परस्परांशीं मोकळेपणानें बोलण्याचा हा शेवटचाच प्रसंग म्हणावयाचा?

हरि०—ईश्वराची इच्छा असेल तर आपणास आपल्या रहस्याचा स्फोट करणें भाग पडून पूर्वीचे प्रेमाचे संबंध उजळ माथ्यानें ठेवण्याला मोकळीकही मिळेल. नाहीं कोणीं सांगावें?

अमृ०—रहस्याची परिस्फुटता करण्यासारखें असें कोणतें कारण उपस्थित होणार?

हरि०—माझ्या लेखांवरून बेअब्रूचा किंवा राजद्रोहाचा खटलाच उपस्थित झाला तर?

अमृ०—तर त्याची सारी जबाबदारी मजवर राहील.

हरि०—नाहीं नाहीं. आपण माझ्या लेखांत बालाग्रही फरक करणार नाहीं याच अटीवर मी आपणांस 'कौंतेया'चे लेख देणार आहें. अर्थात् त्यांची जबाबदारीही आपणांवर पडणें न्याय्य होणार नाहीं.

अमृ०—पण ज्या समाजहिताकरितां आपण या रहस्याचें डोळ्यांत तेल घालून रक्षण करणार त्याच्याच दृष्टीनें तुमच्यासारख्या तरुण व

प्रतिभासंपन्न लेखक कैदेंत पडून निकामी होण्यापेक्षां माझ्यासारखा निरुपयोगी म्हातारा पकडला जाणें श्रेयस्कर होणार नाहीं का ?

हरि०--माझ्या लेखांची सारी योग्यता माझ्या लेखणीच्या स्वैर-पणावर अवलंबून राहणार आहे. त्या लेखांचे परिणाम माझ्या पितृ-तुल्य गुरूला भोगावे लागणार आहेत या विचाराचा लगाम त्या लेखणीला असल्यावर तिच्या गतीची स्वैरता राहणार कशी ? आणि तिच्या मुखांतून राष्ट्राला जागें करून त्यांत चैतन्य ओतणारी, त्याचें अंग थरारून सोडणारी, त्याचा स्वाभिमान डवचणारी व त्याच्या भावना उचंबळवून सोडणारी अशी भाषा निघण्याची आशा तरी कशी कराव-याची ? छेः, तें कांहीं उपयोगी नाहीं आपण माझे दुसरे हट्ट पुरविले तसा हाही हट्ट पुरा केला पाहिजे. 'कौंतेय' आपल्या खऱ्या नांवानें प्रकट होतांच आपण रहस्यस्फोट करण्याला तयार झालें पाहिजे.

अमृ०:—या साऱ्या लांबच्या गोष्टी आहेत. त्याचा विचार इत-क्यांतच कशाला पाहिजे ?

हरि०:—राष्ट्रीय पक्षाच्या संपादकाच्या डोक्यावर लोकमताच्या भीतीच्या क्षीण ततूवर आधारलेली सरकारी अवकृपेची अवजड तरवार सारखी लटकत असते हें आपणांस माहीत आहेच. तो तंतु त्या तर-वारीच्या वजनानें केव्हां तुटेल याचा कोणीं नेम सांगावा ?

अमृ०:—तुमचें म्हणणें खरें आहे. तुमच्या याही अटीला माझी कबूली आहे. मात्र त्या तरवारीचें वजन तंतूच्या सामर्थ्यापलीकडे वाढवि-ण्याइतकी लोहचुंबकाची आकर्षकता तुम्ही आपल्या लेखांत शक्य तोंवर आणूं नये, असाहि इशारा तुम्हांला त्याबरोबरच मला दिला पाहिजे.

उभयतांमधील संकेताप्रमाणें टीका 'कौंतेय' या टोपणनांवामें चंद्रि-कें' त प्रसिद्ध झाली कादंबरीनें साक्षर समाजांत जशी खळबळ उडवून दिली होती तशीच टीकेनेंही उडवून दिली. टीकेच्या प्रसिद्धीनंतर प्रत्येक महिन्यास तिच्याइतकेंच तेजस्वी लेख त्याच टोपणनांवानें त्या मासिकांत यावयास लागून तें झपाट्यानें पुढें येऊं लागले व थोड्याच काळांत मराठी

मासिकांत अग्रगण्य होऊन बसले. लेखकांच्या दुर्भिक्षासाठीं प्रसिद्ध असलेल्या महाराष्ट्रांत एकाऐवजीं दोन सामर्थ्यवान् लेखक उदित झालेले पाहून सर्व पक्षांच्या सुशिक्षित वाचकांस फार आनंद झाला. नेमस्त पक्षांतील हरिहररावांच्या तोडीचा लेखक लाभल्यामुळें राष्ट्रीयांना विशेष समाधान वाटलें. 'कौंतेया' च्या लेखांत समाजसुधारणेचा पुरस्कार जरी केलेला नसला तरी तिला प्रतिकूलही कांहीं येत नसे. यामुळें त्या लेखांनीं प्रागतिकास असमाधान वाटण्याचें कारण नव्हतें. उलट अशा प्रतिस्पर्ध्याशीं स्पर्धा करावी लागल्यामुळें हरिहररावांच्या लेखणीस गंज न चढतां तिचें तेज कायम राही हा त्या पक्षास एक लाभच वाटे. सारांश, 'कौंतेया' च्या उत्कर्षानें कांहीं मत्सरी लेखकांशिवाय इतरांस समाधानच वाटलें. मत्सरी लेखकांच्या दृष्टीनेंही एक लेखक डोईजड होण्यापेक्षां दोन तुल्यबल लेखक निर्माण होणें ही इष्टापत्तिच होती.

हरिहररावांनीं आपल्या प्रागतिक मतांस वाट करून देण्याकरितां जें वृत्तपत्र काढिलें त्यानें जरी 'चंद्रिके' च्याइतकी लोकमान्यता संपादिली नाहीं तरी त्याचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत गेला. प्रथम प्रथम त्यांना विरुद्ध पक्षाच्या प्रतिकूल टीकेचा बराच मारा सहन करावा लागला. पण कोणत्याही टीकेनें न ढळणारें त्यांचें सौजन्य व अपकारासही उपकारानें मारणारें त्यांचें औदार्य समाजाच्या प्रत्ययास येऊं लागलें तसतसा त्याचा विरोध नाहींसा व्हावयास लागून त्याचें स्थान आदरानें घेतलें. खटल्याच्या वेळीं त्या आदराची परमावधि झालेली होती.

अमृतरावांची साक्ष होत असतां प्रेक्षकांच्या तोंडांतून मधूनमधून हरिहररावांच्या प्रशंसेचे उद्गार बाहेर पडत होते. त्यांस न्यायाधीशानें मुळींच हरकत घेतली नाहीं यामुळें तो आरोपीस अनुकूल आहे हा प्रेक्षकांचा ग्रह दृढ झाला।

सरकारतर्फेचा सर्व पुरावा आटोपल्यावर आरोपीचा जबाब घेण्यांत आला. हरिहररावांनीं "आपण पूर्णपणें निरपराधी आहों. आपली टीका सरकारास उद्देशून नसून त्याच्या बेजबाबदार अधिकाऱ्यांस उद्देशून होती. आपण 'चंद्रिके' त प्रसिद्ध झालेले प्रस्तुत लेख लिहिले त्याच

सुमारास 'प्रकाशां' त प्रसिद्ध करण्याकरितांही लेख लिहिले; व त्यांच्या स्वरूपावरून आपला उद्देश राजद्रोहाचा फैलाव करण्याचा नव्हता हें उघड होत आहे." असें सांगितलें. त्यावर न्यायाधीशामध्यें व त्यांजमध्यें कांहीं प्रश्नोत्तरें झालीं; तीं अशीं:—

न्याया०:—'चंद्रिकें' तील व 'प्रकाशां' तील तुमच्या लेखांमध्यें कांहींच विरोध नाहीं काय ?

हरि०—मुळींच नाहीं. आपणांस एक शब्दही विसंगतपणाचा आढळणार नाहीं.

न्याया:०—तुमचें वर्तन दुटप्पी नव्हतें असें तुमचें म्हणणें आहे काय ?

हरि:०—होय. माझें वर्तन दुटप्पी नसून दुहेरी होतें. 'प्रकाशा' चा संपादक व 'चंद्रिकें' तील लेखक या दोन भूमिकांपैकीं वाटेल त्या भूमिकेचा मीं आपल्या सोईखातर—व सोईप्रमाणें कधींच उपयोग केला नाहीं. दोघींचा उपयोग मीं त्यांचा परस्परांस विरोध होणार नाहीं अशा रीतीनें व एक समयावच्छेदेंकरून केला. दोघींचें तादात्म्य समाजाच्या पचनीं पडण्यासारखें असतें तर मीं तें केव्हांच जाहीर केलें असतें.

येथें कांहीं उतावळ्या प्रेक्षकांच्या तोंडून ' शाबास ! ' ' वाहवा ! ' असे गौरवदर्शक उद्गार निघाले. पण न्यायाधीशाचें चित्त पूर्ववत् निर्विकारच राहिलें.

न्याया०—तुम्हीं स्थानिक संस्थांकरितां सरकारकडून देणग्या मिळविल्या कीं नाहीं ?

हरि०—मिळविल्या. पण देणग्यांचा पैसा प्रजेपासूनच कराच्या रूपानें मिळालेला असल्यामुळें त्याजवर वास्तविक प्रजेचाच हक्क होता.

न्याया०—सरकारी पदव्यांकरितां हपापलेल्या लोकांची तुम्हीं ' कौंतेय ' या नांवाखालीं प्रसिद्ध केलेल्या लेखांत निर्भर्त्सना केली आहे कीं नाहीं ?

हरि०—जे लोक आपलें महत्त्व वाढविण्याकरितां किंवा तशाच

एखाद्या स्वार्थी हेतूनें पदव्यांच्या मागें लागतात व त्याकरितां कोणतेंही नीच काम करण्याला माघार घेत नाहींत त्यांजवरच माझ्या टीकेचा कटाक्ष होता; व ही गोष्ट मीं आपल्या लेखांत स्पष्ट केली आहे. एखाद्या पुरुषाच्या गुणांवर किंवा सत्कृत्यांवर खूष होऊन जर सरकारनें त्यास पदवी बहाल केली तर तिचा स्वीकार करण्यांत त्याजकडे कोणताही कमीपणा येत नाहीं. उलट पक्षीं त्याजकडून एखादें हीनपणाचें कृत्य करवून घेण्याकरितां जर त्याला पदवीचें आमिष दाखविलें तर त्यानें तिचा अव्हेरच केला पाहिजे. बक्षीस व लांच यांत जें अंतर तेंच या दोन प्रकारांत आहे.

न्याया०—तुम्हीं स्वतः पदव्या घेण्याचें दोनदा नाकारिलें तें सरकारबद्दल तुच्छता दाखविण्याकरितांच कीं नाहीं ?

हरि०—मुळींच नाहीं. मी व ‘ कौंतेय ’ एक याचें ज्ञान असतां सरकारनें जर मला पदव्या देऊं केल्या असत्या तर मीं त्या अवश्य स्वीकारल्या असत्या. त्या ज्ञानाच्या अभावीं त्यांचा स्वीकार करणें हें त्याच्या अज्ञानाचा नीचपणानें फायदा घेण्यासारखें झालें असतें. तें ज्ञान असता त्यानें पदवी देऊं केली असती कीं काय हे त्याच्या हल्लींच्या वर्तनावरून सहज कळण्यासारखें आहे.

न्याया०—संस्थांकरितां देणग्या घेताना जर तुम्हांस हरकत वाटली नाहीं तर पदव्या घेतांना कां वाटावी ?

हरि०—देणग्यांचा पैसा जसा हक्कानें प्रजेचा होता तशा पदव्या नव्हत्या. पुष्कळदां पदव्या प्रजेस असंमत असणाऱ्या कृत्यांबद्दलच देण्यात येतात.

आरोपीवर राजद्रोहाबद्दल रीतसर आरोप ठेवण्यांत आला. त्यानें बऱ्याच प्रेक्षकांची निराशा झाली. पण आरोप मुळींच ठेवण्यांत न येण्यापेक्षां तो ठेवण्यांत येऊन आरोपी निर्दोष सुटणें हेंच एकंदरींत इष्ट असतें असें जेव्हां त्यांच्या कायदेपंडित सल्लागांकडून त्यांस कळलें तेव्हां त्यांचें पूर्ण समाधान झालें.

यानंतर आरोपीच्या पुराव्याकरितां खटला तहकूब करण्यांत आला.

हरिहररावांस बचावाचा पुरावा फारसा द्यावयाचा नसल्याकारणानें त्यासाठीं पुढचाच दिवस मुक्रर करण्यात आला. त्यादिवशीं आरोपी-तर्फे प्रथम ' प्रकाश ' कार्यालयाच्या व्यवस्थापकाची साक्ष झाली. तिच्यांत त्यानें त्या वृत्तपत्रांतील सारे संपादकीय व स्फुट लेख हरिहर-रावांचेच असल्याचें शपथेवर सांगितलें. ' चंद्रिकें ' तील आक्षेपार्ह लेख ज्या दिवशीं लिहिले त्याच दिवशीं ' प्रकाशा ' करितां लिहिलेल्या लेखांत इंग्रज लोकांच्या सत्यवादित्व, सरळपणा, देशाभिमान, न्याय-प्रियता, विद्यालालसा, चिकाटी इत्यादि अनेक सद्गुणांचें वर्णन केलें असून त्यांचें अनुकरण करण्याची हिंदी लोकांस कळकळीची शिफारस केली होती. त्याच्या उलट ' चंद्रिकें ' तील लेखात स्वदेशात सद्गुणी म्हणून नांवाजलेल्या इंग्रज वीरांचें व मुत्सद्यांचें हिंदुस्थानातील बाद-शाही व ऐषआरामी वातावरणांत कसें अधःपतन होतें याचें क्षोभजनक चित्र रेखाटलें होतें. दोन्हीं शब्दचित्रें वस्तुस्थितीस धरूनच होतीं.

यानंतर सरकारी वकिलाचें भाषण झालें खटल्यांत दिसून आलेल्या हरिहररावांच्या संभावित पण बाणेदार वर्तनाचा त्याजवर बराच परि-णाम झालेला असल्यामुळें त्याजकडून फिर्यादीची बाजू जशी कसोशीनें मांडण्यांत येणें जरूर होतें तशी मांडण्यांत आली नाहीं. त्याच्या भाषणाकडे न्यायाधीशाचेंही विशेष लक्ष्य असल्याचें दिसलें नाहीं. आरोपीच्या वकिलास आपल्या सुशील अशिलाबद्दल जी कळकळ वाटत होती ती त्याच्या वक्तृत्वपूर्ण भाषणांत प्रतिबिंबित झाली होती. त्या भाषणाकडे न्यायाधीशाचें पूर्ण अवधान असून मधून मधून तो आपल्या शंकांचें त्याजकडून समाधानही करवून घेत होता. आरोपीच्या वकिलास व प्रेक्षकांस आतां आरोपीच्या सुटकेबद्दल मुळींच शंका उरली नाहीं.

दुसऱ्याच दिवशीं खटल्याचा निकाल व्हावयाचा होता. न्यायाधीशानें तो सबंध दिवस फैसल लिहिण्यांत घालविला फैसल्यांत हरिहररावांवरील आरोपाचें पूर्ण खंडन व त्यांच्या सद्गुणांचें वर्णन येणें अपरिहार्य असल्या-मुळें त्यास इतका वेळ लागणें साहजिकच आहे असा लोकांचा समज झाला. तथापि त्यांच्या जिवांची सारखी घालमेल चालली होती फैसल

सुनावण्यांत आला त्या वेळीं न्यायमंदिरांत जिज्ञासूंची अतोनात गर्दी झाली होती. पण तेथें चिटपांखरूही नसतां जितकी शांतता राही तितकी शांतता निकाल ऐकतांना त्यांजमध्यें नांदत होती. न्यायाधीशानें आपल्या फैसल्ल्यांत आरभीं आरोपीच्या बुद्धिमत्तेची बरीच तारीफ केली असून त्या बुद्धिमत्तेला नीतिमत्तेची जोड मिळालेली नसल्याबद्दल खेद प्रदर्शित केला होता. त्यापुढें त्यानें आजपर्यंत प्रजेच्याप्रमाणें सरकारच्याही डोळयांत किती शिताफीनें धूळ फेंकिली होती याचें वर्णन करून त्यानें प्रस्तुत खटल्याच्या बचावाची तयारी गेल्या दहा वर्षांपासून चालविली असल्याबद्दल त्याच्या धूर्तपणाबद्दल आश्चर्य प्रकट केलें होतें. त्याचे मागाहून प्रत्येक मनुष्यावर लोकमताचें दडपण असल्यामुळें त्यानें खऱ्या नांवानें प्रगट केलेलीं मतें बहुधा तो ज्या समाजांत मिसळत असतो त्या समाजाचीं असून खोट्या नांवानें प्रकट केलेलीं मतें मात्र त्याचीं स्वतःचीं असतात हा सिद्धांत स्थापन केला असून हरिहररावांचा सामाजिक सुधारणेबद्दलचा आदर हा निव्वळ त्यांनीं आपल्या जहाल मतांचें गोपन करण्यासाठीं घेतलेला बुरखा होता असें विधान केलें होतें. अखेरीस सरकार ही अमूर्त संस्था सरकारी अधिकाऱ्यांच्या मूर्त स्वरूपांहून निराळी नसून ते तिचीं व्यक्त स्वरूपें व प्रतिनिधि होत व त्यांचा द्रोह तो राजद्रोहच होय, आणि ज्याअर्थी त्यांविरुद्ध आरोपीनें मनसोक्त व बेजबाबदारीचीं विधानें केली आहेत त्याअर्थी त्यानें उघड उघड राजद्रोहाचा गुन्हा केला आहे असा निष्कर्ष काढिला असून त्या गुन्ह्याबद्दल त्यास दोन वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा दिली होती.

निकाल अशा प्रकारचा होणार अशी प्रेक्षकांस कल्पना नसल्यामुळें तो ऐकून ते कांहीं वेळ आश्चर्यमूढ होऊन गेले. नंतर हरिहररावांचें निर्दोष किंबहुना प्रशंसनीय वर्तन व त्याबद्दल त्यांस मिळालेली भयंकर शिक्षा, न्यायाधीशानें बाह्यात्कारीं धारण केलेली शांत वृत्ति व त्याच्या अंतर्यामीं चाललेली सूड उगविण्याची तळमळ आणि त्याचें स्वार्थमूलक व हरिहररावांचें परार्थमूलक कपट यांमधील त्रिविध विरोध लक्ष्यांत येऊन त्यांच्या मनांत तीव्र संताप उत्पन्न झाला. त्या संतापाची तार उत्तरोत्तर चढावयास लागून तो लवकरच त्यांच्या आटोक्याबाहेर गेला

व 'धिःकार ! धिःकार !' अशा उद्गारांच्या रूपानें बाहेर पडूं लागला. पण ते उद्गार ऐकण्यास त्या संतापाचा विषय तेथें होता कुठें ? निकाल सांगतांच त्यानें मागल्या पायींच पोबारा केला होता. फैसल्याच्या नकला मिळून आरोपीस तावडतोब अपील करण्यास सवड सांपडूं नये या नीच हेतूनेंच निकाल कोर्ट उठण्याच्या संधीस देण्यांत आला ही गोष्ट लक्ष्यांत आल्यावर प्रेक्षकांच्या संतापाग्नींत तेल पडल्यासारखें झालें, व ते पोलिसांवर हल्ला करून हरिहररावांची सुटका करण्याच्या तयारीला लागले. पण इतक्यांत हरिहररावांनीं उच्च व गंभीर स्वरांत " माझा न्यायदेवतेवर पूर्ण विश्वास आहे. अपिलांत मी निर्दोषी सुटण्याची खात्री आहे सबब लोकांनीं कोणताही अत्याचार करू नये." या शब्दांनीं त्यांचें निवारण केलें. तेव्हां ते सारे आपला संताप गिळून आपापल्या घरीं परत जाण्याच्या मार्गाला लागले.

---

# प्रकरण १२ वें

ज्या दिवशीं सध्याकाळीं खटल्याचा निकाल लागला त्या दिवसाची रात्र चंद्रिकेनें तीव्र तळमळींत जागून काढिली बिचारा बाबू मात्र आपण आतां लवकरच नाशकाला जाऊन हरिहररावांची भेट घेणार या विचारानें आनंदित होऊन स्वस्थ झोंपीं गेला होता. दुसरा दिवस उजाडण्यापूर्वींच चंद्रिकेच्या हातीं अमृतरावांची तार आली. तिच्यांत ' दोन वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा झाली आहे. अपिलाची व जामीनअर्जाची तजवीज होत आहे. काळजी करू नये.' असा मजकूर होता त्यापूर्वीं तिला नाशकाहून आलेलीं पत्रें आशाजनक असल्यामुळें या बातमीनें तिच्या शरीराला व मनाला जोराचा धक्का बसल्यासारखें झालें. ती मटकन् खालींच बसली. जरा भानावर येतांच हरिहररावांच्या भयंकर स्थितीचें चित्र तिच्या मनासमोर उभें राहिलें, व त्या स्थितीस आपणच कारण झालों हा विचार येऊन तिचें मन पश्चात्तापानें पोळूं लागलें. इतक्यांत तिची नजर जवळच्या पलंगावर झोंपेंत वडिलांच्या भेटीचें सुखस्वप्न पहात असलेल्या बाबूकडे गेली, व तिला

रडण्याचा अनावर हुंदका आला रडण्याच्या आवाजानें बाबू जागा होईल या भीतीनें ती किती तरी वेळ मूक रुदन करीत बसली होती. इतक्यांत टपालवाला येऊन त्यानें तिला दोन पत्रें दिलीं. त्यापैकीं एक अमृतरावांचें असून त्यांत तारेंतील मजकूरच जरा विस्तारानें दिला होता. दुसरें पाकीट जरा मोठें व जड होतें. तें आतुरतेनें उघडून पहातां त्यांत एक पत्र व लहान पाकीट आढळून आलें. पत्र 'प्रकाश' कार्यालयाच्या व्यवस्थापकाचें होतें. सोबतचें पाकीट हरिहररावांनीं सरकारच्या स्वाधीन होण्यापूर्वीं आपल्या ताब्यात दिलें असून खटल्याचा निकाल प्रतिकूल झाला तरच तें रवाना करण्याबद्दल आपणास सांगितलें होतें, व निकाल प्रतिकूल झाल्यामुळेंच तें आतां पाठविण्यात येत आहे असा त्यांत मजकूर होता. त्यासोबतच्या पाकिटांतील पत्र खुद्द हरिहररावांचें होतें. त्यांतील मजकूर येणेंप्रपमाणें होताः--

"हें पत्र मी खटला सुरू होण्यापूर्वीं लिहित आहें. तें तुमच्या हातीं पडेल तेव्हां खटल्याचा माझ्याविरुद्ध निकाल होऊन मी तुरुंगांत शिक्षा भोगीत पडलों असेन. मी सरकारच्या स्वाधीन होण्यापूर्वी अमृतरावांची बिनशर्त सुटका होण्याची तजवीज करीत आहें.त्यांची खटल्यांत जी साक्ष होईल तिजवरून मी व 'कौंतेय' एकच असून माझ्या हातून दुहेरी सेवा होण्याकरितां उभयतांचें तादात्म्य गुप्त ठेवण्याचें त्यांनीं मजपाशीं कबूल केलें होतें ही गोष्ट उघड होईल. त्या वेळीं तें रहस्य कोणत्याही स्वार्थाकरितां न फोडण्याची मींही शपथ घेतली. आपल्या विवाहास ती शपथ आड येतेशीं दिसतांच मला ती शपथ घेतल्याचा पश्चात्ताप झाला. पण ती मोडण्यास मी मोकळा नव्हतों. मला रहस्याचा स्फोट एकाच शर्तीवर करणें शक्य होतें.ती शर्त म्हणजे 'कौंतेया'च्या लेखांवरून बेअब्रूचा किंवा राजद्रोहाचा खटला होणें ही होय. ती शर्त पुरी झाल्यास आपला विवाह होणें शक्य नाहीं असें मी तुम्हांस कां म्हटलें याचा आतां पूर्ण उलगडा होईल. ती शर्त पार पडली आहे; आणि तुमचा व माझा विवाह एका कोर्टानें तरी अशक्य कोटींत ढकलला आहे. कनिष्ठ कोर्टाचा ठराव अपील कोर्टानें कायम केला तर शिक्षा भोगून

तुमच्याशीं विवाहबद्ध होण्याला मी जिवंत राहीन असें मला वाटत नाहीं. अपिलांत तो ठराव फिरून मी निर्दोष सुटलों तर तुमच्याशीं चतुर्भुज होण्याची गोड शिक्षा भोगण्याला मी आनंदानें सादर होईन. तो ठराव कायम होऊन आपण परस्परांच्या सहवासास कायमचीं मुकलों तरी आपण स्वार्थासाठीं वचनभंग न करितां प्रतिज्ञापालनासाठीं स्वार्थास तिलांजलि दिली हें समाधान आपणास अखेरपर्यंत राहील. आपल्या कृत्याचा मला मुळींच पश्चात्ताप होत नसून उलट संतोष वाटत आहे. तुम्हींही माझ्या कर्मभोगास स्वतः कारण झाल्याची खोटीच टोंचणी मनास लावून घेऊन खेद करूं नये अशी माझी इच्छा आहे ती तुम्ही पूर्ण केल्यास माझा संतोष द्विगुणित होईल. चि. बाबूस तुमच्याजवळ ठेव म्हणून ठेविलें आहे. तुम्ही स्वतःच्या मुलाचें जसें रक्षण केलें असतें तसेंच त्याचेंही कराल ही माझी खात्री आहे तो तुम्हांला माझें विस्मरण पडूं देणार नाहीं. तुमचें विस्मरण मला क्षणभरही पडणें शक्य नाहीं. यापुढें भोगाव्या लागणाऱ्या नरकवासांत मला किंचित् सुखसमाधान मिळणें शक्य असल्यास तें तुमच्या स्मरणानेंच मिळेल याउप्पर भवितव्यांत काय काय घडणार आहे हें त्या सर्वसाक्षी परमेश्वरासच माहीत. त्यावर विश्वास ठेवून आपणास काळ कंठिला पाहिजे,

तुमचा स्मृतिविषय झालेला
हरिहर विद्याधर जोशी.

पत्र संपताच चंद्रिकेला दुःखाचा उमाळा आला, व तिच्या डोळ्यावाटे अश्रूंच्या धारा वाहू लागल्या. पण त्यांना स्वैरपणें वाहू दिल्यास बाबूस खऱ्या प्रकाराचा संशय येईल ही भीति वाटून तिनें ते आवरून धरिले, व डोळे पुसून ती नुक्ताच अंथरुणावर उठून आळोखेपिळोखे देत बसलेल्या बाबूजवळ जाऊन बसली. बाबूनें जागा होतांच एकवार घाईघाईनें चोहोंकडे पाहिलें व एक निराशेचा सुस्कारा सोडिला. स्वप्नांत आपली व हरिहररावांची भेट झाली असून आपण त्यांच्यांशीं मोकळेपणानें बोलत बसलों होतों असें त्यानें सांगितलें तेव्हां तिला त्या सुस्काऱ्याचा अर्थ कळला.

यानंतर दुसरेच दिवशीं बाबूचें स्वप्न अकल्पित रीतीनें खरें ठरलें. त्या दिवशीं दूपारीं चंद्रिका व बाबू खिडकीपाशीं हरिहररावांच्या आठवणी काढून बोलत बसलीं असतां एकाएकीं त्यांस खुद्द हरिहररावच अमृतरावांसह उघड्या गाडींतून घराकडे येतांना दिसले. मनास एकाद्या गोष्टीचा अतिशय ध्यास लागला म्हणजे तिचा स्वप्नांत भास होतो. तसा जागृतावस्थेंतही होतो तसाच प्रकार आपणा उभयतांसंबंधानें झाला कीं काय अशी तिला एक क्षणभर शंका आली. पण हरिहररावांभोंवतालच्या तरुणांच्या प्रचंड जयजयकारानें त्या शंकेचा पुरा मोड केला. हरिहररावांनीं आपल्या तरुण स्नेह्यांस निरोप दिल्यानंतर ते अमृतरावांसह घरांत आले. अमृतरावांनीं घाईघाईनें सांगितलेल्या हकीकतीवरून कनिष्ठ कोर्टाच्या ठरावावर हायकोर्टांत अपील दाखल झालें असून तूर्त हरिहररावांची जामिनावर सुटका झाली आहे असें चंद्रिकेस कळलें. पण तिला त्या बातमीचा पूर्ण आस्वाद घेण्यास सवड मिळण्यासारखी नव्हती. कारण हरिहररावांस शिक्षा झाल्यापासून त्यांनीं किंवा अमृतरावांनीं घांसभर अन्न किंवा घोंटभर पाणीही घेतलें नव्हतें; व उभयतांच्या उपोषणाच्या पारण्याची तिला ताबडतोब तयारी करावयाची होती. सबब हरिहररावांकडे एक प्रेमाचा व आनदाचा कटाक्ष फेंकून ती तांतडीनें त्या तयारीला लागली. त्यापूर्वींच बाबू हरिहररावांच्या कमरेस विळखा घालून त्यांच्याशीं प्रेमाच्या गोष्टी करीत उभा होता. हरिहरराव व अमृतराव एकत्र बसण्याचा, बोलण्याचा व जेवण्याचा योग दहा वर्षांनीं आला होता. तेव्हां त्यास किती गोडी आली असेल याची कल्पना वाचकांवरच सोंपविलेली बरी.

यानंतर थोड्याच दिवसांत खटल्याच्या अपीलाची हायकोर्टांत सुनावणी झाली; व आरंभींच जामिनकीचा अर्ज मंजूर होऊन जो शुभ शकुन झाला होता तो अपिलांत पूर्ण यश येऊन खरा ठरला. न्यायमूर्तींनीं आपल्या निवाड्यांत खालच्या कोर्टाचा प्रत्येक मुद्दा खोडून काढिला होता. "दुहेरी भूमिका घेण्यांत हरिहररावांचा हेतु केवळ शक्य तितकी देशसेवा करण्याचा होता; त्यामध्यें पुढील संकटाची आगाऊ तरतूद करणाऱ्या स्वार्थी दीर्घसूत्रीपणाचा अंशही नव्हता;

राष्ट्रीय बाण्याचे लेख स्वतःच्या नांवानें लिहून त्यांना जी लोकप्रियता मिळवितां आली असती तिजवर पाणी सोडून सामाजिक सुधारणेचा लोकांस असंमत व कंटकमय असलेला मार्ग स्वीकारण्यांत त्यांची देश-सेवेबद्दलची तीव्र कळकळ, विलक्षण निस्पृहता व अपूर्व स्वार्थत्याग दिसून आला आहे; प्रसंग येईल त्याप्रमाणें सरकारची किंवा प्रजेची बाजू घेऊन आपल्या पोळीवर तूप ओढण्याचा नीचपणा करण्याऐवजीं त्यांनीं सरकारच्या पदव्यांकडे व प्रजेच्या जयजयकाराकडे सारखेंच दुर्लक्ष करून आपलें लोककल्याणाचें दुहेरी व्रत एकसमयावच्छेदेंकरून दहा वर्षें अखंड चालविलें यांत त्यांच्या बुद्धिवैभवाप्रमाणें नैतिक वर्चस्वही उत्तम प्रकारें प्रकट झालें आहे; अशा महात्म्याचा सरकारनें सत्कार केल्यास तो स्वतः सरकारासच भूषणावह होणार आहे; सत्काराऐवजीं छळ केल्यास मात्र सरकार साधुपुरुषाच्या छळानें जनतेंत पसरणाऱ्या तीव्र असंतोषाचें धनी होऊन राजद्रोहाचा फैलाव केल्याच्या दोषास पात्र ठरणार आहे; राजद्रोहाचे खरे उत्पादक चळवळे नसून बेजबाबदार अधिकारीच आहेत या आरोपीच्या मताप्रमाणें आमचेंही मत आहे; व त्यांच्या उच्छृंखल वर्तनावरील नियतकालिकांतील टीकेचें नियंत्रण काढून घेतल्यास इंग्रजी राज्य व बेबंदपाच्छाई यांत मुळींच अंतर राहणार नाहीं." हें त्यांच्या निवाड्याचें सार होतें. या निवाड्यानें प्रजेचा वर डोकें करूं पाहणारा असंतोष नाहींसा केला, तिचा राज्यकर्त्यांच्या न्यायीपणावरील विश्वास दृढ केला व मुद्रणस्वातंत्र्यावरील जुलमी दडपण दूर केलें. निकाल ऐकण्यास जमलेले प्रेक्षक बादशहाचा व हरिहररावांचा जयजयकार करीत स्वस्थानीं परत गेले.

न्यायमूर्तींनीं केलेली सूचना अमलांत आणण्यास सरकारनें यापुढें मुळींच दिरंगाई केली नाहीं. त्यानें हरिहररावांस पूर्वी देऊं केलेल्या पदव्यांपेक्षांहि एक मोठी पदवी अर्पण केली, व तिचा त्यांनीं साभार स्वीकार केला. त्या पदवीनें त्यांस मिंधेपणा किंवा ओशाळंगत वाटण्याचें कारण नव्हतें. त्यांनीं आपली द्विविध लोकसेवा पूर्वीइतक्याच जोमानें पुढेंही चालविली. फरक इतकाच कीं, 'चंद्रिकें'तील लेख ते यापुढें 'कौंतेय' या टोपणनावानें न देतां स्वतःच्याच नांवानें देऊं

लागले. पण त्यामुळें त्यांच्या लोकप्रियतेंत किंवा लेखांच्या प्रभावांत अंतर पडण्याचें कारण उरलें नाहीं

त्यांना पदवीचा स्वीकार करितांना झाला त्याच्या शतपट आनंद चंद्रिकेचा स्विकार करतांना झाला. पूर्वी पदवीचा स्विकार करण्याच्या मार्गांत त्यांना सरकारचें वस्तुस्थितिविषयक अज्ञान जसें आड आलें होतें; त्याप्रमाणें चंद्रिकेचें पाणिग्रहण करण्याच्या मार्गांत तिचें रहस्य-विषयक अज्ञान आड आलें होतें. आतां सरकारच्या अज्ञानाप्रमाणें तिचें अज्ञान दूर झालें होतें; व त्यामुळें उभयतांच्या विवाहास कोण-तीच आडकाठी राहिली नव्हती. सरकारी पदवीच्या व चंद्रिकेच्या प्राप्तीमधील साम्य येथेंच संपलें. त्यांपासून व्हावयाच्या लाभांत महदं-तर होतें. पदवीच्या लाभानें त्यांच्या नांवामागील परिवार वाढला, पण त्यांच्या कीर्तींत भर पडली नाहीं. उलट चंद्रिकेच्या लाभानें त्यांस अर्धांगीं व त्यांच्या मुलास आई मिळवून दिली, व त्यांच्या घरांतील उदासीनता नष्ट केली. त्यानें त्यांच्या सुखांत भर घालून त्यांची लोक-सेवा करण्याचा हुरुप वाढविला. त्यानें त्यांच्या मदतीस एक निष्णात लेखिका देऊन त्यांचा वाङ्मयसेवेबद्दलचा उत्साह द्विगुणित केला. आतां 'चंद्रिका' व 'प्रकाश' या नियतकालिकांचीं निरनिराळीं कार्या-लयें असण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. दोहींचें एकच कार्यालय होऊन त्यावर 'चंद्रिका–प्रकाश' कार्यालय या जोड नांवाची पाटी झळकूं लागली. अमृतरावांच्या शिरावरील संपादकीय जबाबदारीचा भार पूर्णपणें उतरल्यामुळें ते आतां प्रसंगविशेषीं जांवयास व मुलीस आपल्या अनुभवाचा फायदा देत त्यांच्या सहवासांत सुखानें कालक्रमण करूं लागले. त्यांचें बाबूवरील प्रेम आजाच्या नातवावरील प्रेमासारखेंच वेडें व तितकेंच उत्कट होतें. बाबू चंद्रिकेचा सावत्र मुलगा व म्हणून त्यांचा नातू जसा होता तसा शिष्यपरंपरेच्या नात्यानें त्यांचे शिष्य हरिहरराव यांच्या शिष्यिणीचा शिष्य म्हणजे त्यांचा पणताशिष्य होता. यामुळें त्यांच्या प्रेमांत दोन पिढ्यांचें प्रेम एकवटलेलें होतें. बाबूच्या भावी सावत्रभावाचें नामकरण त्यांनीं 'जयंत' असें आधींच करून ठेविलें.

अमृतरावांच्या साक्षीनें चंद्रिकेच्या उरल्यासुरल्या शंकांपैकीं बहुतेक

दूर केल्या होत्या. पण त्यापैकीं दोन तीन अजूनही टिकाव धरून राहिल्या होत्या. आपल्या शंकेखोरपणामुळें हरिहररावांवर केवढें अरिष्ट ओढवलें होतें-याचें स्मरण होऊन तिला त्या शंकांचें त्यांजकडून समाधान करून घेण्याचें बरेच दिवस धैर्य झालें नाहीं. एके दिवशीं हरिहररावांनींच तो विषय काढिला. ते म्हणाले "लग्नापूर्वीच सगळ्या शंका फेडून घेण्याचा आपला हट्ट तुम्हीं अखेरीस शेवटाला नेला तर! पण मीही कांहीं कमी हट्टी नाहीं. मीं आपल्या मुखानें एकाही शंकेचें निरसन केलें नाहीं. समग्र शंकासमाधानाचें काम तुमच्या वडिलांकडेच सोंपविलें. त्यांच्या साक्षींत महत्त्वाची एकही बाब आल्यावाचून राहू नये म्हणून प्रत्येक बाजूच्या वकिलानें त्यांची अगदीं कसून साक्ष घेतली, व खटला अत्यंत गंभीर स्वरूपाचा असल्यामुळें वृत्तपत्रातून त्या साक्षीचा शब्दन-शब्द छापून आला. तेव्हां शंकांस जागा कुठून राहणार?"

चंद्रि०--पण टोपणनांवानें लिहिण्याच्या कल्पनेचे मूळ उत्पादक आपणच होतां. बाबानीं त्या गोष्टीला नाखुषीनेंच संमति दिली. तेव्हां अजूनही अशा कांहीं गोष्टी असू शकतील कीं ज्यांची माहिती त्यांना नसून आपणांलाच आहे. शिवाय मी नाशकास राहावयास आल्या-नंतरच्या प्रकारांची माहिती बाबांना नसून आपणांलाच आहे.

हरि०--आणि तुम्हांलाही पण.

चंद्रि०--मला फक्त मुद्रा, आविर्भाव, अंगविक्षेप इत्यादि बाह्यांगां-चेंच ज्ञान होतें. पण तें किती भ्रामक होतें हें पुढें पुरतेंच निदर्शनाला आलें. आपलें खरें अंतरंग आपणा स्वतःसच माहीत होतें.

हरि०--माझ्या अंतरंगाचा असा कोणता कोपरा अजून तुमच्या नजरेखालून जावयाचा राहिला आहे तें कळूं तरी द्या. आजपर्यंत त्याजवर प्रकाश पडला नसेल तर आतां तरी पडला पाहिजे. त्याशिवाय पतिपत्नींचें तादात्म्य पूर्ण होणार नाहीं.

चंद्रि०--आपणांप्रमाणें दुहेरी जीवनाचा अनुभव आजपर्यंत एकास तरी मिळाला असेल कीं काय याची शंका वाटते. आपल्या स्वतःच्या लेखांइतकेच सुंदर लेख आपल्या मानसपुत्राच्या नांवानें प्रसिद्ध कराव-

याचे, त्यांजमुळें होणारी कीर्ति त्याच्या वांट्यास जाऊं द्यावयाची, त्याच्या कीर्तीच्या मानानें स्वतःची कीर्ति मलिन दिसली तरी त्याचा विषाद न मानितां उत्तरोत्तर त्याच्या कीर्तींत भर टाकण्यास झटावयाचें, मधून मधून तो आपला प्रतिस्पर्धी आहे असा बहाणा करावयाचा हें सारें अत्यंत दुर्घट असलें पाहिजे.

हरि०––तुमचें दर्शन होण्यापूर्वीं माझी दुहेरी भूमिका पार पाडणें फारसें कठिण नव्हतें. लहानपणीं पत्त्यांचा किंवा बुद्धिबळाचा डाव खेळण्याला जोडीदार गडी न मिळाल्यास डावाच्या दोन्ही बाजू खेळण्याची मला संवय झाली होती. विद्यालयांत शिकत असतां कोणत्याही पक्षाचें सारख्याच आवेशानें मंडन व खंडन करण्याची कलाही मला अवगत झाली होती. त्यामुळें 'प्रकाशा'तील व 'चंद्रिके'तील सोंगें बरींच वर्षें मजकडून बिनबोभाट पार पडली. कीर्तीचा किंवा लोकप्रियतेचा मला कधींच फारसा हव्यास नव्हता. म्हणून माझ्या वांट्याची कीर्ति व लोकप्रियता माझ्याच मानसपुत्राच्या वांट्यास गेलेली पाहून मला वैषम्य वाटण्याचें कारण नव्हतें. माझ्या आयुःक्रमांत तुमचा प्रवेश झाला तेव्हांपासून मात्र सारा प्रकार बदलला आणि माझ्या खऱ्या अडचणींना सुरुवात झाली मी तुमच्यासमोर प्रथम प्रथम 'कौंतेया'बद्दल जो द्वेष दाखवीत होतों तो पूर्ववत् केवळ दिशाभूल करून स्वतःच्या रहस्याचें रक्षण करण्याकरितां धारण केलेला मुखवटा होता. पण अभिनय यशस्वी रीतीनें करितां येण्यास मनाची जी समता लागते ती बिघडण्यासारखी हळूहळू परिस्थिति उत्पन्न होऊं लागली. तुमच्या शारीरिक व आत्मिक सौंदर्यानें मला वेडावून सोडिलें होतें.परंतु जोंपर्यंत आपणामध्यें गुरुशिष्यसंबंध होता तोंपर्यंत तुमच्यापाशीं प्रेमयाचना करणें तर राहोच, पण प्रेमाची छायाही दिसूं देणें अनिष्ट होतें. म्हणून मनांतून प्रेमाच्या उकळया फुटत असतांही त्या दाबून मला बाह्यात्कारीं तुमच्याशीं गंभीरपणें किंबहुना कठोरपणेंही वागावें लागे. तुमच्या गुणांविषयींचा आदर व्यक्त करून मनाची तळमळ शमविण्याकरितां मला 'कौंतेया'च्या भूमिकेकडे धांव घ्यावी लागे. त्याच्या मुखानें बाहेर पडणारे प्रशंसोद्गार तुमच्या अवलोकनांत येत,

तेव्हां तुमचा साहजिकच ' कौंतेया'बद्दल पक्षपात होऊं लागला. तें पाहून माझ्या मनांत मत्सरानें संचार केला. मीं निर्माण केलेला हा भस्मासूर अखेरीस माझ्याच डोक्यावर हात ठेवणार कीं काय अशी मला धास्ती उत्पन्न झाली. ' कौंतेय ' म्हणजे माझेंच दुसरें रूप आहे असें सिद्ध करून त्याजविषयींचा तुमचा पक्षपात स्वतःकडे ओढून घेण्यास मला माझी शपथ आड येत होती. अर्थात् ' कौंतेया'ची मनसोक्त निंदा करण्याचा उरलेला एकच मार्ग मला स्वीकारावा लागला. पण त्यामुळें तुमचें मन ' कौंतेया ' विरुद्ध बिथरण्याऐवजीं मजविरुद्धच बिथरूं लागलें. हें पाहून माझा मत्सर अनावर झाला. शिकाऱ्यानें साऱ्या पळवाटा बंद केल्यावर श्वापदाच्या अंगीं निष्फल संतापापासून जी उग्रता व बेपर्वाई येते तिचा माझ्या ठायीं उद्भव झाला. ' कौंतेया '-वर खटला होऊन तरी तुमचें मन मजविषयीं पूर्ववत् शुद्ध होवो अशी त्या निष्फळ संतापाच्या व उग्र बेपर्वाईच्या भरांत मला दांडगी इच्छा होई, व ती माझ्या मुद्रेवर व उद्गारांत दिसून येऊन मी एक अमानुष वृत्तीचा राक्षस आहे, असा तुमचा मजबद्दल समज होऊन बसला. बरें, ती इच्छा अमलांत आणण्यासही मी मोकळा नव्हतों. कारण योग्य कारणाशिवाय कडक लेख लिहून स्वतःवर संकट ओढून घ्यावयाचें नाहीं असें मी अमृतरावांस वचन देऊन चुकलों होतों. माझी स्थिति यापेक्षांही दुर्धर होण्याचें कारण असें कीं, यशस्वी प्रतिस्पर्धी म्हणून ज्याचा मी मनःपूर्वक द्वेष करीत होतों, ज्याच्या टोपणनांवाचा मुखवटा दूर करून दंभस्फोट करण्याची, मला तहान लागली होती, त्याच ' कौंतेया' च्या नांवानें मला देशहिताकरितां आपलें शक्तिवर्चस्व खर्च करून शक्य तितके सुंदर व ओजस्वी लेख लिहावे लागत; इतकेंच नाहीं, तर माझ्या वल्लभेच्या चरणीं वहावयाचीं स्तुतिसुमनें सुद्धां मला त्याच्याच हातानें अर्पण करावीं लागत. आणि हें सारें माझ्या लेखांचें व स्तुतीचें पर्यवसान तुमचें ' कौंतेया'स अनुकूल व मला प्रतिकूल मत बनण्यांत होणार आहे हें पक्कें ठाऊक असतां ! दैवदुर्विपाकाची मजल यापलीकडे जाणें शक्य आहे असें मला वाटत नाहीं.

चंद्रि०—आपण ' चांद्रिकें ' त प्रसिद्ध केलेल्या अभिप्रायांत माझ्या

लेखाच्या कर्तृत्वाबद्दल जें अनुमान देत होतां त्याचें कारण काय ? तें अनुमान आपण ज्या प्रमाणांवर आधारीत होतां तीं इतकी लेचींपेचीं असत. कीं लेख स्त्रीच्या हातचे आहेत हें ज्ञान आपणांस स्वतंत्रपणें झालें असून त्या ज्ञानाचा खरा उगम झांकण्याकरिता आपण तीं प्रमाणें त्या अनुमानास चिकटविली आहेत हें कोणासही कळण्यासारखें होतें. अशा आधारांसह तें अनुमान देऊन आपण आपलें रहस्य ओळखण्याचें एक अचुक साधन माझ्या हातीं देत आहांत ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत आलीच असेल ?

हरि०—कवितेवरील अभिप्रायांतील त्या अनुमानास विषयाचा व भाषेचा आधार पुरेसा होता; व तसें मीं तुम्हांस बोलूनही दाखविलें होतें. तो अभिप्राय आणि माझ्या व ' कौंतेया ' च्या हाडवैराबद्दलचा तुमचा पूर्वग्रह यांमुळें तुमचा संशय मजकडे न वळतां अमृतरावांकडे वळला आहे असें जेव्हां मला त्याच प्रसंगीं दिसून आलें तेव्हां मी तें अनुमान पुढील अभिप्रायांत अधिकाधिक निःशंकपणें मांडूं लागलों

चंद्रि०—पण स्वतःच्याच गळयात येणारें तें अनुमान व त्यास पोषक म्हणून दिलेलीं पण वास्तविक चिकटविलेलीं ती प्रमाणें मुळींच न देतां आपण माझ्या लेखांचें अनुकूल परीक्षण कर्तृनिरपेक्ष केलें असतें तर मला किंवा दुसऱ्या कोणास आपल्या रहस्याचा सुगावा लागण्याचा संभवही उरला नसता असें नाहीं का आपणांला वाटत ?

हरि०—तें खरें आहे. पण माझ्या मनःस्थितींत तसें परीक्षण लिहिणें शक्य नव्हतें. वल्लभेस अप्रिय उपदेश करावा लागून संकोचामुळें किंवा वहावत जाण्याच्या भीतीमुळें तिच्या गुणांची तोंडावर स्तुति करावयास न मिळाल्याकारणानें तळमळणारा वल्लभ बंदिजनाप्रमाणें पडद्याआडून तिची मनाप्रमाणें स्तुति करूं लागला तर त्यानें ती करितांना चित्तासमोर तिची सुंदर मूर्ति उभी करू नये असा निर्बंध करणें निष्ठुरपणाचें नसतें का झालें ? तो निर्बंध त्यानें पाळिला असता तर त्यास त्या अभिप्रायांत आपलें चैतन्य ओततां न येऊन तो बेचव

ठरला असता, आणि त्यानें त्याचेंही समाधान झालें नसतें व वल्लभे-चेंही झालें नसतें.

चंद्रि०–आणि वल्लभाच्या मत्सरालाही जागा राहिली नसती.

हरि०–ती परिस्थितिच अशी चमत्कारिक होती कीं ' कौंतेया 'च्या मुखानें तुमची स्तुति केली नाही तरी मला असमाधान व्हावें व केली तरी व्हावें.

चंद्रि०—आणि तो सारा माझ्या अज्ञानाचा परिणाम !

हरि०—आतां तरी अगदीं निःशंक झालात की अजूनही एखादी शंका मनांत सलत आहे ?

चंद्रि०—इतर टोपणनांवें सोडून आपण ' कौंतेय ' हें नांव घेण्याचें कारण काय असावें ? मी एकदां आपणांला हा प्रश्न केला होता पण आपण त्या वेळी उत्तर देण्याची टाळाटाळच केली.

हरि०–यांतही कांही गूढ नाहीं. ' कौंतेय ' म्हणजे कुंतीचा पुत्र अर्जुन.

चंद्रि०–पण अर्जुन या नांवाचा तरी आपणांशीं काय संबंध ?

हरि०—कां बरें ? अर्जुनाच्या स्त्रीचें जें नांव तेंच माझ्याही पहिल्या स्त्रीचें होतें ' सुभद्रापति ' किंवा ' सौभद्र ' म्हणावयाचें तें ' कौंतेय' म्हटलें इतकेंच.

चंद्रि०—अस्सें ! बरें, स्वतःची व ' कौंतेया'ची अशा दोन भूमिका पृथक् ठेवण्याची कल्पना आपणांला आपल्या नांवावरूनच सुचली असावी हा माझा तर्क कितपत खरा आहे ?

हरि०—हा तर्क चाणाक्षपणाचा आहे यांत शंका नाहीं. विश्वाचा पालक हरि व संहारक हर यांचें अनुक्रमें प्रागतिक व राष्ट्रीय यांच्याशी बरेंच साम्य आहे यांत संशय नाहीं. वैष्णव व शैव यांस आपल्या दैवतांमध्यें जो विरोध वाटत असतो तसाच या दोन पक्षांतही आहे. परंतु तो विरोध भासमान असून त्या दैवतांचें ' हरेश्च हृदयं

विष्णुर्विष्णुश्च हृदयं हरः ' यांत वर्णिलेल्या तादात्म्याप्रमाणें पूर्ण ऐक्य आहे ही जाणीव माझ्यासारख्या एखाद्याच व्यक्तीस असते. त्या दोन दैवतांच्या नांवांनीं घटित असेंच माझें नांव असावें हा केवळ यदृच्छायोग आहे. त्या नांवाकडून मला सूचना झालीच असेल तर ती मला नकळतच झाली असली पाहिजे.

यानंतर हरिहररावांस आणखी एकादी शंका विचारण्याकरितांच कीं काय, चंद्रिकेचे ओंठ किंचित् हलले. तें पाहून हरिहररावांच्या ओंठांचेंही स्फुरण झालें. पण त्यांतून एकही शब्द बाहेर पडला नाहीं. यावरून त्यांनीं तिचें तोंड उद्गारांहून निराळयाच साधनानें बंद केलें असलें पाहिजे हें उघड झालें.

समाप्त